






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






Maharashtra Sahitya Patrika Regd. No. 6398/57



चित्र बसवंत, पुणे

**म. म. दत्तो वामन पोतदार**

**जन्मशताब्दी वर्ष आदरांजली**

**जन्म : ५ ऑगस्ट १८९०] [मृत्यू : ६ ऑक्टोबर १९७९**

मुद्रक - प्रकाशक - राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ४११ ०३०. फोन — ४४ २९ ६३

अनुक्रमणिका

# साहित्य अकादेमी महत्त्वपूर्ण प्रकाशने

- **लोकांचे राज्य** / लेखक : वीरेंद्रकुमार भट्टाचार्य, अनुवादिका : शांता शेळके — 85/–
- **जा ओलांडुनी** (कन्नड कादंबरी) / लेखक : सन्तेशिवरा लिंगण्णैया भैरप्पा, अनुवादिका : सौ. उमा कुळकर्णी — 80/–
- **श्री. दा. पानवलकर यांची कथा** / संपादक : म. द. हातकणंगलेकर — 70/–
- **दि. बा. मोकाशी यांची कथा** / संपादक : अरविंद गोखले — 60/–
- **राजवाडे लेखसंग्रह** / संपादक : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — 75/–
- **आगरकर लेखसंग्रह** / संपादक : ग. प्र. प्रधान — 25/–
- **केतकर लेखसंग्रह** / संपादक : य. दि. फडके — 18/–
- **निवडक पु. भा. भावे** / संपादक : वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे आणि राम शेवाळकर — 45/–
- **विनोबा सारस्वत** / संपादक : राम शेवाळकर — 45/–
- **निवडक ना. सी. फडके** / संपादक : इंदिरा संत आणि प्रल्हाद वडेर — 45/–
- **श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** / लेखक : मनोहर लक्ष्मण वऱ्हाडपांडे — 5/–
- **बाळ सीताराम मर्ढेकर** / लेखक : यशवंत मनोहर — 15/–
- **अलबेरूनीचा भारत** (खंड पहिला) / अनुवादक : यू. म. पठाण — 25/–

---




साहित्य अकादेमी — प्रादेशिक कार्यालय
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई ४०० ०१४ फोन - ४१३५७४४

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २५२– जानेवारी-मार्च १९९०

(म. रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत)

## १९८९ : साहित्य परिचय विशेषांक

**संपादक : शंकर सारडा**
संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव,
डॉ. वसंत सावंत, प्रा. चंद्रकुमार नलगे

**या अंकाची किंमत : १० रुपये**
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ४० रुपये)

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स १०१९, सदाशिव, पुणे ४११०३०
टाईपसेटिंग : प्रमोद वि. बापट, प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव पेठ, पुणे ३०.

अनुक्रमणिका

# साहित्य अकादेमी महत्त्वपूर्ण प्रकाशने



अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २५२– जानेवारी-मार्च १९९०

(म. रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत)

## १९८९ : साहित्य परिचय विशेषांक

**संपादक : शंकर सारडा**
संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव,
डॉ. वसंत सावंत, प्रा. चंद्रकुमार नलगे

**या अंकाची किंमत : १० रुपये**
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ४० रुपये)

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स १०१९, सदाशिव, पुणे ४११०३०
टाईपसेटिंग : प्रमोद वि. बापट, प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव पेठ, पुणे ३०.

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

संकीर्ण



काव्य



*

# संपादकीय

*मित्रहो,*

*१९८९ हे वर्ष जागतिक मराठी परिषद आणि कुसुमाग्रजांना मिळालेला ज्ञानपीठ पुरस्कार यांमुळे मराठी अस्मितेला सुखावणारे ठरले.*

*६३ वे मराठी साहित्य संमेलन पुणे येथे डॉ. यु. म. पठाण यांच्या अध्यक्षतेखाली दि. १९ ते २१ जानेवारी १९९० या दरम्यान भरत आहे. पुणे मराठी ग्रंथालयाने या संमेलनाचे निमंत्रण देऊन, आपल्या गेल्या ७८ वर्षांच्या अखंड साहित्यसेवेवर एक प्रकारे नवा तुराच खोवला आहे. ८५ हजार ग्रंथ, ४ हजार सदस्य, स्वतःची भव्य वास्तू असणारे हे ग्रंथालय पुण्यातील एक अग्रगण्य सांस्कृतिक प्रबोधन केंद्र आहे. स्वागताध्यक्ष आ. अण्णा जोशी, कार्यवाह मुकुंद अनगळ व मोहनराव दाते आणि त्यांचे सहकारी यांनी गेले दोन महिने या संमेलनासाठी अक्षरशः रात्रंदिवस काम चालवलेले आहे. महाराष्ट्राचे मुख्यमंत्री मा. शरदराव पवार यांनी उद्घाटक म्हणून येण्याचे मान्य केले आहे. लोकसत्तेचे संपादक माधवराव गडकरी यांनी, राजकीय व्यक्ती साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावर नकोत अशी भूमिका पुन्हा मांडल्याने श्री. पवार हे थोडे नाराज झाले असावेत, त्यामुळे उद्घाटनाला याने की नाही असा प्रश्न पडल्याचे त्यांनी पत्रकारांशी बोलताना स्पष्ट केले. आ. अण्णा जोशी हे स्वागताध्यक्ष असताना ना. शरद पवारांनी उद्घाटन केले तर ते खटकण्याचे कारण नाही. जागतिक मराठी परिषदेचे संयोजक, मराठी साहित्याचे आस्वादक आणि पुणे जिल्ह्यातील एक तडफदार कार्यकर्ते या दृष्टीने ना. शरद पवार यांनी उद्घाटन करणे उचितच ठरेल. तेव्हा त्यांनी ऐनवेळी मागे राहू नये अशी विनंती करावीशी वाटते. अर्थात् हे संपादकीय लिहीत असताना परिस्थिती थोडीफार संदिग्धच आहे हे खरे!*

*या संमेलनात अनेक परिसंवाद, प्रकट मुलाखती, काव्यवाचन व सांस्कृतिक कार्यक्रम ठेवण्यात आले आहेत. महाराष्ट्राच्या सर्व भागातील नामवंत साहित्यिक-वक्त्यांना पाचारण करण्यात आले आहे. त्यामुळे हे संमेलन वैचारिक*



अनुक्रमणिका

व सांस्कृतिक दृष्टीनेही संस्मरणीय होईल अशी खात्री वाटते.

**डॉ. पठाण–**

*डॉ. यु. म. पठाण यांची या संमेलनाच्या अध्यक्षपदी झालेली निवड ही अनेक दृष्टींनी स्वागतार्ह आहे. या सन्मानाचा लाभ मिळवणारे मराठवाड्यातील तसेच मुस्लीम समाजातील ते पहिलेच साहित्यिक होत. मराठी संतसाहित्याचा, महानुभाव वाङ्मयाचा आणि लोकसाहित्याचा त्यांचा विपुल व्यासंग, थक्क करणारा आहे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली २२ जणांनी पीएच.डी. संपादन केली आहे. वीस पुस्तके त्यांच्या नावावर आहेत. हस्तलिखितांचाही प्रचंड संग्रह आपल्या सोहार्दपूर्ण विश्वासाच्या बळावर केलेला आहे. त्यांच्या सौजन्यपूर्ण सभाचातुर्यामुळे हे संमेलन सुखरूप संपन्न होईल असा विश्वास वाटतो.*

**समालोचन विशेषांक**

*पत्रिकेचा हा अंक १९८९ मधील मराठी पुस्तकांवर लक्ष केंद्रित करण्याचे उद्दिष्ट समोर ठेवून काढला आहे. मराठीतील ३१ पुस्तकांचे परिचय या अंकात देण्यात आले आहेत. शिवाय आढावावजा लेखही. पृष्ठांच्या मर्यादेमुळे मजकूर हाताशी असूनही अधिक पुस्तकांचे परिचय या अंकात समाविष्ट करता आले नाहीत. सर्वच महत्त्वाच्या पुस्तकांचा या अंकात परामर्श घेता येणे हे अर्थातच शक्यही नाही. अनेक समीक्षक प्राध्यापकांना पत्रे पाठवून परिचय मागवण्यात आले. तसेच सर्वसामान्य वाचकांनाही त्यासाठी आवाहन करण्यात आले. गतवर्षीच्या अनुभवाचीच पुनरावृत्ती यंदाही झाली. शोधयात्रा, मस्तानी, नाथ हा माझा यावरील लेखन हे साप्ताहिक सकाळ व केसरीमध्ये पूर्वी प्रसिद्ध झालेले होते. ते साभार या अंकात घेतले आहे. इतरत्र वर्षभरात आलेले वेचक अभिप्राय पत्रिकेत पुन्हा छापल्यास नेमक्या ग्रंथप्रेमी वाचकांपर्यंत ते पोचतील. समीक्षकांनी या दृष्टीने सहकार्य करावे.*

*अशा परिचयपर लेखांना अनेक मर्यादा असतात. परंतु सर्वसाधारणपणे वाचनीय व महत्त्वपूर्ण पुस्तकांकडे चोखंदळ वाचकांचे लक्ष जावे-एवढा मर्यादित हेतू ठेवून हे काम केले जाते. हा हेतू सफल होण्यात अडचण नाही.*

*समीक्षात्मक लेखनाबाबत आज मराठीत बराच असंतोष आहे. समीक्षेच्या*

*नावावर खूपच ॲकॅडमिक स्वरूपाचे लेखने होते; त्यातले मूलसिद्धान्त हे नेहमीच वादग्रस्त व अपूर्ण, एकांगी व असमाधानकारक राहतात. समीक्षेची सगळी मूल्यसंकल्पना व परिभाषा पाश्चात्य समीक्षेच्या लाटांप्रमाणे येथे येऊन आदळते, आणि त्या संदर्भात येथील वाङ्‌मयाचे रूप शोधणे वा त्या चौकटीत आपले वाङ्‌मय बसवण्याचा खटाटोप करणे हा उद्योग अर्थातच वाचक वा लेखक यांपैकी कुणाचेच समाधान करू शकत नाही. वाचकांची अभिरुची आणि विद्यापीठांतून शिकवण्यात येणारी व म्हणून प्रतिष्ठित मानण्यात येणारी पुस्तके यांचा मेळ सहसा बसत नाही. विद्यापीठातील प्राध्यापकी समीक्षेची परस्परातच उदोउदो होत असल्याने सर्वसामान्य वाचकवर्गापर्यंत तिचा प्रभाव पोचत नाही. एखादा प्रभावशाली व्यक्तित्वाचा प्राध्यापक स्वतःच्या विचारांची चौकट आपल्या विद्यार्थ्यांवर कळतनकळत लादून, आपले स्कूल निर्माण करतो. परंतु दुसऱ्या विद्यापीठापर्यंत ती चौकटही पोचतेच असे नाही. या विशिष्ट चौकटींच्या व पाश्चात्य संकल्पनांच्या आधारे होणारी तथाकथित समीक्षा ही वाङ्‌मयाच्या सम्यक् आकलनाला मदतनीस ठरण्यापेक्षा प्रतिबंधकच ठरते. आपल्या विद्यापीठांच्या अभ्यासक्रमात प्राचीन गद्यपद्यावर फाजील भर दिला जात असल्याने, समकालीन वाङ्‌मयाबद्दलची आस्था विद्यार्थ्यांमध्ये निर्माण होत नाही. १९८९ मध्ये प्रसिद्ध झालेले एकही पुस्तक वर्षभरात न वाचणारा प्राध्यापक आपल्या विद्यार्थ्यांकडे फक्त परीक्षार्थी म्हणूनच बघतो, वाङ्‌मयाचा रसिक आस्वादक म्हणून त्याला विकसित करीत नाही ही वस्तुस्थिती नजरेआड कशी करता येईल? वाङ्‌मयातील श्रेष्ठ-कनिष्ठपण आज ठरते ते विद्यापीठांच्या मान्यतेमुळे; कारण विद्यार्थ्यांना ज्या पुस्तकांचा व लेखकांचा अभ्यास करावा लागतो तेच तेवढे खरे महत्त्वाचे पुस्तक वा लेखक असे स्वाभाविकपणेच वाटते. साहजिकच इतर पुस्तकांकडे व लेखकांकडे दुर्लक्ष होते. समीक्षेवर व वाङ्‌मयव्यवहारावर शैक्षणिक व अन्य संस्थांची जी भक्कम पकड आहे, तिचा गंभीरपणे विचार आपल्याकडे अजून झालेलाच नाही. मराठी वाङ्‌मयाच्या विकासाला त्यामुळे खीळ बसत आहे, अनके चांगल्या प्रतिभावंत लेखक-कवींची जन्मभर उपेक्षा होत आहे. जागरूक वाचकांनी व रसिकांनी या संदर्भात आपली मते प्रकट केली तर बरे होईल.*

**अभिनंदन**

*मराठीतील अग्रगण्य नाटककार वसंतराव कानेटकर यांची निवड या वर्षीच्या राम गणेश गडकरी पुरस्कारासाठी मराठी नाट्य परिषदेतर्फे करण्यात आली. गतवर्षी पु. ल. देशपांडे यांना हा सन्मान लाभला होता. गेली तीस वर्षे वसंतरावांची नाटके मराठी नाट्यरसिकांचे रंजन करीत आहेत. त्या नाटकांतील विविधता आणि प्रयोगक्षमता विलक्षण आहे. वसंतरावांच्या डोक्यात अजूनही दहाबारा नाटके घोळत आहेत. ती त्यांनी त्वरेने पूर्ण करावीत, असाच आग्रह सर्व मराठी रसिकांचा असेल.*

*साहित्य अकादमीचा पुरस्कार 'हरवलेले दिवस' (प्रभाकर ऊर्ध्वरेषे) या पुस्तकाला मिळाला.*

*महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीतर्फे श्री. श्रीपाद जोशी यांना राष्ट्रीय एकात्मता पुरस्कार मुंबई येथे १४ सप्टेंबर १९८९ रोजी मुख्यमंत्री ना. शरद पवार यांच्या हस्ते देण्यात आला. हा पुरस्कार दहा हजार रुपयांचा आहे.*

*नाच ग घुमा (माधवी देसाई), कालचक्र (जयवंत दळवी) व परिमला (केशव केळकर) या तीन कृतींना दमाणी पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात आले.*

*कविवर्य ना. घ. देशपांडे यांना गदिमा पुरस्कार प्रदान करण्यात आला.*

*पुन्हा झुळूक (मंगला गोडबोले) या पुस्तकाची निवड चिं. वि. जोशी पुरस्कारासाठी झाली. चेतश्री प्रकाशनचा मुक्ताई पुरस्कार बाबा आढाव यांना 'सत्यशोधनाची वाटचाल' साठी देण्यात आला. रामशास्त्री प्रभुणे (सदाशिव आठवले) या पुस्तकाला म. म. दत्तो वामन पोतदार पुरस्काराने गौरविण्यात आले.*

*लोककवी वामनराव कर्डक यांना शाहीर अमर शेख पुरस्कार देण्यात आला. आपल्या गीतरचनेने व रोमांचकारक गानशैलीने त्यांनी आंबडेकरी चळवळीला प्रबोधनाचे अधिष्ठान दिले.*

*औरंगाबादचे साहित्यिक व प्रकाशक बाबा भांड यांना बालवाङ्मयाच्या व नवसाक्षरसाहित्याच्या क्षेत्रातील कामगिरीबद्दल इंडियन इन्स्टिटयूट फॉर चाइल्ड वेल्फेअर या संस्थेच्या वतीने २५ हजार रुपयांचा पुरस्कार देण्यात आला.*

*या सर्वांचे हार्दिक अभिनंदन*

**शंकर सारडा**
**संपादक**

# पंचायती राज्य

सर्वांगीण विकास व आत्मनिर्भरता साधण्यासाठी
स्वातंत्र्य प्राप्तीनंतर पंचायती राज्य पद्धतीचा अवलंब
हे गांधीजींचे ध्येय होते. पंडित नेहरूंची ती आकांक्षा होती.
खरा बदल गावांतून अन् गावांतील लोकांद्वारेच घडून येईल,
बाहेरून लादता येणार नाही, असे पंडितजी सांगत.
त्यांच्या दृष्टीने पंचायती राज्य हे सर्वांगीण विकास व
आत्मनिर्भरता प्राप्त करून ग्रामीण भागाचा कायापालट घडविण्याचे
प्रभावी साधन होते. राष्ट्रपित्याचे ध्येय अन् नवभारताच्या निर्मात्याची
आकांक्षा ध्यानी ठेवून आणि आजवरचा अनुभव लक्षात घेऊन माजी पंतप्रधान
राजीव गांधी ह्यांनी लोकशाही प्रक्रिया कोट्यवधी ग्रामीण
बांधवांच्या दाराशी नेण्याच्या व आजवर उपेक्षित व मागास राहिलेल्या
दुर्बल घटकांना विकासाच्या संधी उपलब्ध करून देण्याच्या हेतूने
क्रांतिकारी पाऊल उचलले. विकासाची गंगा त्यांनी थेट
गावपातळीवर उतरविली
आपली सुघटित पंचायती राज्य व्यवस्था, श्रमशक्तीतून
ग्रामविकास साधणारी नवी रोजगार हमी योजना, जवाहर रोजगार
योजना अन् विशेष कृती योजना ह्यासारख्या मौलिक कार्यक्रमांद्वारे
महाराष्ट्र राज्य देशपातळीवरील ह्या प्रयत्नांना बळकटी देत आहे.

**कृतिशील शासन** **महाराष्ट्र शासन**

डीजीआयपीआर.

अनुक्रमणिका

# डॉ. यु. म. पठाण

## एक शांत, सुस्थित प्राध्यापक :

डॉ. व. दि. कुलकर्णी

डॉ. यु. म. पठाण यांचा– माझा परिचय तसा उशिराच झाला; म्हणजे पठाण औरंगाबादला गेल्यानंतर तो झाला. (१९६०). मी बार्शीचा, ते सोलापूरचे; तेव्हा हा परिचय आधी होणं शक्य होतं. सोलापूरच्या दयानंद कॉलेजचे एक स्कॉलर म्हणून त्यांचं नाव मी ऐकलं होतं. पंडित शेटे, शंकर पाटील, निर्मलकुमार फडकुले आणि यु. म. पठाण– या 'चौकुटा' संबंधीही वाङ्मयीन वर्तुळात बरंचसं कानी पडत होतं. पण पठाणांची भेट अशी झाली ती औरंगाबादलाच. पहिल्या भेटीतच ते अनेक वर्षांची ओळख असलेल्या स्नेह्यासारखे वाटले. शांत, सुस्थित, निश्चिंत, सुखी. त्यांचा बंगलाही शांत, सुस्थित. घरातले वातावरणही शांत, सुस्थित. सौ. नजमा भाबींचं शांत, मंद स्मित आणि आदबशीर स्वागत. काय थोडी घाई-गडबड असेल ती छोट्या नाझची!

पठाणांचं एकूण जीवनच शांत आणि सुस्थित. शिक्षण वेळच्या वेळी झालेलं. डॉ. तुळपुळे यांच्यासारखे गुरू लाभलेले. एम. ए. होताच दयानंद महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून अध्यापनाला सुरुवातही केलेली. मध्येच अध्यापनातली बी. टी. ही पदवीही हस्तगत करून ठेवलेली. पाच-सहा वर्षं सोलापूरला महाविद्यालयात काढताच औरंगाबादला विद्यापीठात– मराठी विभागात व्याख्याते म्हणून संधी लाभलेली. वयाच्या तिशीमध्ये मराठवाडा विद्यापीठात डॉ. पठाण व्याख्यात्याचे प्रपाठक झाले, प्रपाठकाचे प्राध्यापक आणि विभागप्रमुख झाले. अखंडपणे तीस वर्षं ते एका जागी राहून अध्ययन-अध्यापन, संशोधन-लेखन करीत राहिले. या जीवनात धर-सोड नाही, मोडतोड नाही. संथपणे एका दिशेनं चालू ठेवलेला हा प्रवास आहे. व्यावसायिक अडचणी-अडथळे प्रत्येकाच्याच वाट्यास येतात. त्याही आदब-शिष्टाचार न सोडता पठाणांनी दूर केल्या आणि आपलं विहित कार्य चालू ठेवलं. सहकाऱ्यांचं सहकार्य आणि स्नेह, तसंच विद्यार्थ्यांचं प्रेम त्यांना लाभलं. आज निवृत्तीच्या सीमारेषेजवळ ते आहेत; पण निवृत्तिरेषा जीवनप्रवाह थांबवू शकत नाही; तो थांबत नाही. अधिक स्वस्थतेनं आणि निर्वेधतेनं, स्वखुषीनं उलट तो चालूच राहतो. डॉ. यु. म. पठाण यांचा जन्म ९ मार्च, १९३० चा आज ते साठीत आहेत. तीन-चार महिन्यांत निवृत्त होतील.

डॉ. यु. म. पठाण हे मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक-संशोधक म्हणून मानले जातात. महानुभाव-गद्य आणि बखर-गद्य हे त्यांचे अभ्यासाचे विशेष विषय होत. 'मराठी

बखरींतील फार्सीचे स्वरूप' या विषयावर त्यांनी पीएच. डी. साठी प्रबंध लिहिला. (१९५८) बखर-वाङ्मयावरील फार्सी भाषेच्या परिणामाचं भाषाशास्त्रीय संशोधन या प्रबंधात मांडलं गेलं आहे. याला एक बृहत् शब्दसूची जोडण्यात आली आहे. डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या फार्शी-मराठी कोशातून शब्दांचे अर्थ जे दिले आहेत त्यांचा इथं डॉ. पठाण यांनी उपयोग करून घेतला आहे, हे खरं; पण त्या शब्दांच्या बखरींतील उपस्थिति-स्थलांचा निर्देश केल्यानं ही शब्दसूची अतिशय उपयुक्त ठरली आहे. पठाणांच्या या ग्रंथाला पुणे विद्यापीठाचं, सर्वोत्कृष्ट मराठी प्रबंधाचं डॉ. परांजपे पारितोषिक मिळालं; तसंच महाराष्ट्र-राज्य-पुरस्कारही प्राप्त झाला. पठाणांनी 'भाऊसाहेबांची बखर' व 'सभासदांची बखर' यांचं अध्यापनाच्या दृष्टीनं संपादन केलं आहे.

मराठी बखर-गद्याइतकाच, किंबहुना थोडा अधिकच, असा मराठी महानुभाव-गद्याचा अभ्यास डॉ. पठाणांनी केल्याचं दिसून येतं. 'लीळाचरित्र : एकांक', 'दृष्टान्तपाठ', 'स्मृतिस्थळ' या ग्रंथांची त्यांची संपादनं महानुभाव-पंथीयांच्या पसंतीस उतरली आहेत. 'महानुभाव-साहित्य-संशोधन'पर लेख त्यांनी संग्रहरूपानं प्रकाशित केले आहेत.

डॉ. पठाण यांना महानुभाव गद्य आणि बखर-गद्य यांत विशेष रस असला तरी तेच तेवढे त्यांचे अभ्यास विषय झालेले नाहीत. निरनिराळे धर्मपंथ आणि त्यांचे वाङ्मय यात ते उत्तरोत्तर अधिकाअधिक रमलेले दिसतात. औरंगाबादला गेल्यानंतर मराठवाड्याच्या भूमीत महानुभावांच्या बरोबर इतर अनेक धर्मसंप्रदायांचं साहित्य हस्तलिखितांच्या रूपानं विखुरलेलं आहे, हे त्यांच्या ध्यानी आलं. मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागात अशी हस्तलिखितं संकलित करण्याचं कार्य सुरू झालं. या हस्तलिखितांमध्ये आजवर प्रकाशात न आलेलं पण अतिशय महत्त्वाचं असं जे साहित्य पठाणांच्या दृष्टीस पडलं, त्याचा त्यांनी अभ्यास केला आणि संपादित रूपात ते प्रकाशित केलं. यापैकी महानुभावेतर धर्मपंथ आणि साहित्य यावरील लेखांचा संग्रह त्यांनी 'शोधणी' या नावानं प्रसिद्ध केला आहे.

'शोधणी' या लेखसंग्रहात मराठी-वाङ्मयाभ्यासकांना काही नवे ग्रंथकार, नवे काव्यरचना प्रकार, नवे धर्मपंथ यांचा परिचय घडून येतो. अज्ञानसिद्ध यांच्या नागेश संप्रदायाची, त्या संप्रदायातील संतांची आणि त्यांच्या साहित्याची माहिती साधार आणि सप्रमाण अशी इथं मिळते. मन्मथस्वामी या वीरशैव संताच्या साहित्याची सर्वांगीण ओळख इथं करून देण्यात आली आहे. स्वामी रामानंद यांचा मराठवाड्यामध्ये 'सम्पादणी' या नावाचा एक काव्यरचना प्रकार रूढ झाला होता. 'संपादणी करणं' म्हणजे सोंग घेणं. सोंग घेऊन हे काव्य दाखवलं-नटवलं जाई. (एकनाथी भारूडासारखं.) संपादणीचं आख्यान—नाट्यरूप डॉ. पठाणांनी सोदाहरण विशद केलं आहे. (रामानंदांच्या संपादणी-कवितेचा स्वतंत्र संग्रह संपादित व्हायला हवा.) उद्धव चिद्घनांचं चरित्रात्मक

लेखन आणि परमानंदांची अभंगरचना यांचंही विवेचन पठाणांनी केलं आहे.

मध्ययुगीन मराठी वाङ्मयातील हे मुख्य प्रवाह नाहीत की मूलभूत प्रेरक ग्रंथही नाहीत; पण वाङ्मयेतिहासाला परिपूर्णता येण्याच्या दृष्टीनं हे उपप्रवाह आणि ही लक्षणीय साहित्यनिर्मिती मोलाची ठरत असते. डॉ. पठाणांचं हे संशोधनपर लेखन या दृष्टीनं महत्त्वाचं ठरतं. डॉ. पठाणांनी मराठवाड्यातील जुन्या पोथ्यांचा आणि हस्तलिखितांचा धांडोळा घेतला आणि विद्यापीठात ते वाङ्मय-धन आणून त्याची एक व्यवस्था लावली आहे. सांकेतिक लिपीत झाकून-लपून राहिलेलं महानुभाव वाङ्मय महानुभाव-अभ्यासकांच्या साहाय्यानं उजेडात आणण्याचीही व्यवस्था केली आहे. वाङ्मयेतिहास-लेखनाच्या परिपूर्तीसाठी आवश्यक ती पूर्वतयारीच यामुळं झालेली आहे. डॉ. पठाण यांनी या हस्तलिखितांच्या संग्रहाधारे संबंधित मराठी वाङ्मयाचा परिचयात्मक इतिहास सिद्ध करावा, असं या प्रसंगी सुचवावंसं वाटतं.

डॉ. पठाण यांचा हिंदी वाङ्मयाचाही अभ्यास आहे. 'महाराष्ट्रातील महानुभाव साहित्यिकांच्या हिंदी साहित्याचे अध्ययन' या विषयावर त्यांनी हिंदीमधलीही पीएच. डी. पदवी मिळवली आहे (मराठवाडा विद्यापीठ, १९७०): 'आधुनिक हिंदी कहानियाँ', 'मराठी सन्तोंकी हिंदी वाणी, 'दास आनंदकृत सुदामचरित्र' ही त्यांची हिंदीतील पुस्तकं प्रकाशात आली आहेत. हिंदी वाङ्मयाच्या अभ्यासानं मनाला एक प्रकारे भारतीय परिमाण लाभतं; त्यातही संतवाङ्मयाचा ज्याचा विशेष अभ्यास असतो त्याला तर एकूणच 'भारतीय' संतसाहित्याचा आलोक प्राप्त होतो. पठाणांच्या बाबतीत हे घडलेलं आहे. पठाण हे मराठी बखर-गद्याचे किंवा महानुभाव गद्याचे अभ्यासक हे खरं, पण त्यापेक्षा संतसाहित्याचे अभ्यासक म्हणून ते अधिकतेनं ओळखले जातात. हिंदी-मराठी संतकाव्याचा अभ्यासक हा ज्ञानेश्वर-तुकाराम यांच्याबरोबर कबीर-तुलसीदास यांच्यासंबंधी बोलतो; नामदेव-जनाबाई बरोबर सूरदास-मीराबाईसंबंधी बोलतो... त्याच्या पाहण्यात भारतीय संतजीवन आणि संतसाहित्य एकसंधपणे येत राहतं आणि दृष्टीची ही व्यापकता एक प्रकारे उदार रसिकता घेऊन येते, यामुळं अशा व्यक्ती संतजीवन आणि काव्य यावरील बोलणं-लिहिणं महाराष्ट्र आणि महाराष्ट्राबाहेरही 'आपलंसं' वाटतं. पठाणांना ही आपुलकी, हा स्नेह उदंड मिळाला आहे. ते महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर मराठी व हिंदी साहित्य सभांतून बोलत आले आहेत.... वारंवार, अनेकदा! एका स्थळी पुनःपुन्हा!! वृत्तीनं सौम्य, मृदू आणि लाघवी असल्यानं त्यांना जागोजाग स्नेहीजन लाभले आहेत.

डॉ. पठाणांनी अनेक समित्यांवर–सरकारी, निमसरकारी, शैक्षणिक, सांस्कृतिक इत्यादी समित्यांवर– कामं केली आहेत. विदेशांतही त्यांनी 'भारतीय भाषा, साहित्य आणि संस्कृती' या विषयांवर व्याख्यानं दिली आहेत. डॉ. पठाणांचा हाच मुख्य विषय आहे. पठाण हे मराठीचे प्राध्यापक आहेत. त्यांचे २२ विद्यार्थी पीएच. डी. झाले आहेत. उद्या प्रगत अध्ययन केन्द्र व्हावे, इतकी मराठी विभागाची प्रगती त्यांनी करून ठेवली आहे.



अनुक्रमणिका

पण त्यांना विशेष रस वाटतो तो संतवाङ्मयामध्ये; व त्याच्या प्रचारार्थ ते अखंड फिरतात; बोलतात, लिहितात. "संतवाङ्मयाचा अभ्यास ही मी आपली जीवननिष्ठा मानली आहे," असं ते मोठ्या अभिमानानं सांगतात. "विविध रूपांत प्रकट होणाऱ्या संतवाङ्मयाला एकत्र बोधणारी मराठी संस्कृतीची मूस भव्य असून, या समृद्ध वारशाचं दर्शन संशोधनातून, ग्रंथांतून होण्याची गरज असते," हे ते परोपरीनं सांगतात. संत वाङ्मयाचा आणि विविध धर्म आणि धर्मपंथ यांच्या अभ्यासाचा आणि प्रेमाचा वारसा डॉ. पठाण यांना आपल्या वडलांकडून मिळाला. पितृपरंपरेनं आलेलं हे धर्मप्रेम त्यांनी सर्वजनांपर्यंत पोचवलं.

डॉ. पठाण यांचं संशोधन अटीतटीच, जाचक, जिकिरीचं नसतं. ते आग्रही, अभिनिवेशी नसतं. खूपसं आस्वादक असतं. 'नामदेवांच्या अभंगगाथेतलं' 'ज्ञानेश्वर चरित्र' पूर्णपणे नामदेवांचंच की आणखी कुणाचं?'– हा वाद, वाद म्हणून ते खेळत नाहीत. 'आदी', 'तीर्थावली' व 'समाधी' ही तिन्ही प्रकरणं कशी एकसंध आणि भावनात्मक चढत्या श्रेणीची आहेत हे ते दाखवून देतात व त्याचा कर्ता 'एकच' कसा असावा हे सांगून मोकळे होतात. मराठीत संशोधन क्षेत्रात एकेक दिग्गज आहेत. पठाण आपलं क्षेत्र निश्चित करून त्या क्षेत्रात जे जितकं करता येईल, ते तितकं करीत आले आहेत. हे संशोधन संतजीवन आणि संतकाव्य यासंबंधीचं मुखयत्वे असल्यानं त्यांच्या या विषयावरील लेखांना व भाषणांना रसाळपणाबरोबर पांडित्याचं वजनही प्राप्त झाल्याचं दिसून येतं. डॉ. पठाण यांची वाणी प्रासादिक आहे; भाषा सुबोध आणि ओघवती आहे. त्यांच्या भाषणात वेगवेगळे संदर्भ येतात, अनेक प्रकारची माहिती मिळते. तुलनेनं संतजीवन व संतवाङ्मयाचा आलोक येतो. वाङ्मयीन स्तरावरून मोठ्या जिव्हाळयानं त्यांचं हे कार्य चालतं. डॉ. पठाण हे आपल्या अभ्यासक्षेत्रातही शांत आणि सुस्थित आहेत.

सर्वांनाच असं शांत आणि सुस्थित जीवन लाभावं, असं डॉ. पठाणांना वाटतं. प्रक्षोभ व्हावा अशा घटना घडल्या तरी पठाणांनी आपला प्रक्षोभ कृतींनी किंवा शब्दांनीही कधी व्यक्त केल्याचं दिसून आलं नाही. मराठवाडा विद्यापीठाच्या कुलगुरुपदाच्या मोहातही ते पडले नाहीत. डी. लिट्. पदवी मिळाल्यानं त्यांच्या अंगी ताठा भरला नाही. त्यांच्या ललित लेखनात त्यांचं निसर्गप्रेम आणि मानवप्रेम अभिव्यक्त झालं आहे. माणसानं सुखी असावं हा संतसंदेश घेऊन ते सर्वत्र जात असतात.

औरंगाबादला विद्यापीठाच्या एका समितीच्या बैठकीसाठी मी गेलो होतो. ऐन वेळी मिळेल त्या निवासात, गावातील पैठण गेटजवळ उतरलो होतो. दुपारी बैठक झाली व संध्याकाळी मी गावात परतलो. बरोबर डॉ. पठाणही आले. त्यांनी आमचा 'निवास' पाहिला आणि क्षणभर ते गप्प उभे राहिले. इकडंतिकडं पाह्यलं आणि मला म्हणाले, "व. दि, माझ्या घरी चला राह्यला. इथं नको!" आमच्या निवासाचं धुळकट, धुरकट, कळकट, मळकट रूप मला दिसत नव्हतं असं नाही. पण लॉजच्या शोधात हिंडण्याचा मला हुरूप नव्हता. मी म्हटलं, "इथं वर्दळ नाही. एकान्त आहे. आजची रात्र तर काढायची आहे. उद्या

मुंबईला परतायचंच आहे!" पण पठाणांना माझं एकान्तसुख पाहवेना. त्यांनी रिक्षा आणवली आणि आपल्या बंगल्यावर मला नेलंही. छान वडदास्त ठेवली. म्हणजे अगदी घरच्यासारखं सारे जण वागले. एकत्र बसणं, गप्पागोष्टी करणं, खाणं... कुठं पडदा नाही की आडपडदा नाही. सौ. नजमाभाबी स्वतः पीएच. डी. आहेत. पठाणांचे वडील असिस्टंट कलेक्टर होते. पठाण भाग्यवान आहेत. कुणाच्या भाग्याचा हेवा न करणारे भाग्यवान आहेत. अ. भा. मराठी साहित्य-संमेलनाचं अध्यक्षस्थान लाभल्याचा आनंद आयुष्यातला सर्वोच्च आनंद मानणारे ते भाग्यवंत साहित्यिक आहेत. त्यांचं घर भाग्याचं आहे. तिथं येणाऱ्याचं खुलं स्वागत होतं. स्वागत-समिती डॉ. पठाणांचं स्वागत करील; डॉ. पठाण सर्वांचं सदैव खुलं स्वागत करीत राहतील!

(डॉ. व. दि. कुलकर्णी, सुहासिनी बी, तुळशीबागवाले कॉलनी, पर्वती, पुणे ९)

*

# शोधयात्रा : अरुण साधू

## आव्हान देणारी बौद्धिक, आध्यात्मिक झेप

शंकर सारडा

अरुण साधू यांची नवी कादंबरी 'शोधयात्रा'. त्यांच्या आजवरच्या कादंबऱ्यांवर कळस चढवणारी. चौकस पत्रकारितेच्या आणि चटपटीत थ्रिलरच्या अवस्थेतून बाहेर पडून अरुण साधू हे अवघड बिकट मार्गाने जाऊन स्वतःचे कलात्मक सर्वस्व पणाला लावायला सिद्ध झालेले आहेत हे दाखवणारी ही कादंबरी. सिंहासन, मुंबई दिनांक या कादंबऱ्यांनी प्रचलित राजकीय वातावरणाचा उभा-आडवा छेद घेऊन त्यामधील जीवघेणी थरारकता नेमकी पकडून वाचकांना स्तिमित केले. बहिष्कृत, त्रिशंकू या कादंबऱ्यांनी सामाजिक वास्तवाचे भेदक पण रेखीव भान दिले. कितीही घोषणा करा आणि सवलती द्या, भारतीय जनमानसाची आंतरिक मूल्यप्रणाली अढळ आणि कडेकोट आहे हे सूचित करणाऱ्या. विप्लवा, स्फोट यांमधल्या चटकदार वैज्ञानिक संकल्पनाही काहीशा थरारकच. या थरारकतेच्या बाहेर पडून अधिक व्यापक कालखंड आणि चित्रफलक हाताळणारी ही शोधयात्रा आहे. काळाचे आणि संदर्भाचे सम्यक् आकलन व चित्रण, उत्तम सर्वांगीण व्यक्तिरेखाटन, कुठल्याही दोन व्यक्तींमधील संघर्षाची सर्वंकष जाण आणि तुल्यबळ प्रतिस्पर्धी उभे करण्याची कलापूर्ण ताकद, ही अरुण साधूंची वैशिष्ट्ये 'शोधयात्रा'मध्ये एकवटलेली आहेत.

### तरुणसुलभ ध्येयवादाच्या मर्यादा

आज चाळिशीत असलेल्या प्रत्येक सुशिक्षित, ध्येयवादी, स्वप्नाळू, समाजपरिवर्तनवादी व्यक्तीची प्रातिनिधिक वाटचाल वाटावी, अशी ही कहाणी आहे. १९६० च्या सुमाराला महाविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या, सामाजिक समतेच्या आणि पारमार्थिकतेच्या विविध संकल्पनांनी भारलेल्या तरुणांच्या मनावर अधिराज्य गाजवणाऱ्या व्यक्ती आणि ध्येयवादी विचारप्रणाली, त्यानुसार पुढच्या पंचवीस वर्षांत विविध स्तरांवर चाललेली समाजपरिवर्तनाची कामे आणि त्यांचे यशापयश, भारतीय राजकारणात आणि समाजमूल्यात असणारे गुंतागुंतीचे ताणतणाव आणि या व्यापक संदर्भात तरुणसुलभ ध्येयवादी कल्पनांचा जाणवलेला अपुरेपणा वा फोलपणा, असा सगळा पट अरुण साधू यांनी शोधयात्रेत विस्तृत पणे मांडला आहे. त्यावरच्या सोंगट्या हलवण्यात त्यांनी दाखवलेली चतुराईही लक्षणीय आहे.



अनुक्रमणिका

तसे पाहिले तर ही अशी भिन्न भिन्न परिमाणे असूनही ही शोधयात्रा एका सरळ रेषेत जाणारी आहे. एखाद्या नदीच्या प्रवाहासारखी. तिला जागोजाग नद्या-नाले येऊन मिळतात, दूर जातात. मुख्य नदीचा प्रवाह मात्र अखंड वाहत राहतो. ही श्रीधर या तरुणाची आत्मस्वरूपाची शोधयात्रा आहे. व्यापक सामाजिक बांधिलकीच्या चौकटीत राहून, आपल्या जीवनाच्या मूळ उद्दिष्टाचा शोध घेणारी, अधिकाधिक आत्मलीन होत जाणारी ही शोधयात्रा आहे.

## नायकाची जडणघडण

हा श्रीधर कसा आहे?

लहानपणीच बाल ध्रुवाची गोष्ट ऐकून टेकडीवर तपश्चर्येला जाणारा. आईच्या सामान्य ज्ञानाचा अंत पाहणारे प्रश्न विचारणारा. तंत्रज्ञान-विज्ञानाच्या भोक्त्या वडिलांनाही भंडावून सोडणारा. कामगारांच्या दारिद्र्याने दुःखीकष्टी होणारा. ताऱ्यांच्या जन्माचा वेध घेणारा. परमेश्वर या संकल्पनेबद्दल अफाट आकर्षण असणारा. चौथीची पुस्तकं चुकून आणली गेली, ती तिसरीची पुस्तकं व्हावी म्हणून ध्यानजप करणारा आणि तशी ती न झाल्यामुळं भ्रमनिरास झालेला. नास्तिकतेकडे झुकू लागलेला. स्वभावतःच उदासीन, अबोल, एकाकी– एखादी गोष्ट ठरवली की करणारा.

वडील रेल्वेत इंजिनियर. वारंवार बदल्या. तशात मोठी बहीण वृंदा मृत्यू पावते. मृत्यूच्या जाणिवेचा अंदाजच येत नाही. त्याचा एक मित्र वर्मा एक डास मारून दाखवतो. 'हा मेला. देवाघरी गेला. त्याला आता जाळा–मारा– काही होणार नाही,' असे सांगून मृत्यूचे एक रूप त्याच्या मनावर ठसवतो. देवाचा शोध घेण्यासाठी टेकडीवर गेल्यावर पंचमहाभूतांचे त्या वेळी त्याला जाणवणारे रौद्र रूप साक्षात्कारासारखेच असते. नंतर तो ग्लानी येऊन पडतो. शोधपथकाला सापडतो. जगत हा त्याचा वर्गमित्र. त्यालाच काय ते हे रहस्य माहीत असते.

पाचगणीच्या एका निवासी शाळेत त्याला घालण्यात येते. भरपूर व्यायाम करून शरीर कमावतो. विज्ञानाच्या अभ्यासाने जगाचे नवे भान येते. तशातच आईच्या मरणाची बातमी येते. ती बातमी तो धीरोदात्तपणे ऐकून घेतो तेव्हा त्या शाळेचे प्रिन्सिपॉलही थक्क होऊन म्हणतात, "तू शूर मुलगा आहेस."

## प्रेमावाचून आकलन अशक्य

मॅट्रिक झाल्यावर पुण्याच्या कॉलेजमध्ये श्रीधर प्रवेश घेतो. कला शाखेत. पुण्यातले १९६५च्या दरम्यानचे वातावरण त्याच्या जिज्ञासेला वेगवेगळी परिमाणे देते. समाजवादी युवक क्रांती दलाचे काम करणारा बुद्धिप्रामाण्यवादी धनंजय, कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाने भारावलेला विश्वंभर, सामाजिक बांधिलकी मानणारी यशोधरा, रजनीश–

कृष्णमूर्तींच्या तत्त्वज्ञानाने भारावलेली शशी, यांचे नित्य चालणारे वादसंवाद; महर्षी विनोद, दत्ता बाळ, महेश योगी, रजनीश, सत्यसाईबाबा यांच्याबद्दलचे आकर्षण; जयंत नारळीकरांनी प्रकट केलेले विश्वाच्या उत्पत्तीचे गूढ रहस्य– या सर्वांचा प्रभाव श्रीधरला करियरिस्ट बनण्याऐवजी त्याची अध्यात्माची ओढ परिपुष्ट करतो. त्याचे वडील याच दरम्यान अपघातात मरण पावतात.

महर्षी विनोदांच्या गुरुपौर्णिमेच्या व्यासपूजेच्या वेळी धनंजय वायर खेचून त्यांना पाडतो. ते ओरडतात, पण नंतर सावरून घेतात. त्यामुळे भ्रमनिरास झालेली प्रा. गुणे यांची पत्नी आपला मानसिक तोल गमावून बसते आणि प्रा. गुणे आत्महत्या करतात. श्रीधर या हत्येबद्दल धनंजयला जबाबदार धरतो. अनेक लोकांना श्रद्धेचा आधार असतो. त्या श्रद्धेवरच हल्ला चढवला तर ती माणसे मानसिक धक्क्याने कोलमडून पडतात. बुवाबाजीचा दंभस्फोट करतानाही श्रद्धेची हाताळणी जपून करायला हवी. श्रद्धा ही एक शक्ती आहे, असे श्रीधरचे मत. प्रा. शास्त्रींना श्रीधर आपल्या शंका विचारतो. विज्ञानाच्या साहाय्यानेही ज्या गोष्टींचा थांग लागत नाही आणि विश्वाच्या भव्य पसाऱ्यात माणसाचा हा नगण्यपणा.... आपल्या अस्तित्वाला मग काय अर्थ आहे, या विचाराने येणारी भयाण अस्वस्थता. प्रा. शास्त्री त्याला सांगतात, "या प्रश्नांची उत्तरं तुझी तुलाच शोधून काढावी लागतील. मार्गही तुलाच शोधावा लागेल. कुणावर तरी प्रेम असलं तर आपली आकलनशक्ती वाढते. स्वतःच्या अनुभवातून व अस्तित्वातून हा शोध घ्यावा लागेल. अनुभव अस्तित्व विचारांच्या व बुद्धीच्याही पलीकडे असतो. त्यासाठी प्रेम हवं जगावर." प्रा. शास्त्री हे शिकवत चांगले असले तरी मुलींना नादी लावतात म्हणून विश्वंभर त्यांच्या तोंडाला डांबर फासतो आणि त्यांना कॉलेजचा राजीनामा द्यायला भाग पाडतो. ते अमेरिकेत प्राध्यापक होतात. पुढे एका तीर्थक्षेत्री श्रीधरला आपल्या अमेरिकन पत्नीसह भेटतात. त्या वेळी ते प्रेमाचेच तत्त्वज्ञान सांगतात.

### कृष्णमूर्ती आणि रजनीश

याच काळात कृष्णमूर्ती ऐकण्याची संधी श्रीधरला मिळते. त्यामुळे भयानक औदासीन्याचे सावट मनावर दाटते. ते जे सांगतात ते पटते, प्रभावित करते. पण त्यातले निखळ बौद्धिक सूत्र आपल्या आचरणाच्या आटोक्याबाहेरचे असते. रजनीशांची प्रवचनेही ऐकायला मिळतात. त्यांच्या मिष्ठास वाणीत जादू असते. त्यांचा अभ्यास आणि विद्वत्ता थक्क करते. त्यांच्या तेजस्वी डोळ्यांत लोकांना खेचून घेण्याची ताकद दिसते, तशीच किंचितशी विकृतीची झाकही. या माणसापासून आपल्याला काही मिळणार नाही अशी श्रीधरची खात्री पटते.

कृष्णमूर्तींबद्दल शशी म्हणते, "मला कृष्णमूर्तींचा अर्थ कळतो पण मनोमन उमगत नाही."

श्रीधरला वाटते, यांच्या भाषणाने अंगावर रोमांच उठतात. पण आपली अस्वस्थतेची मूळची दुखरी जाणीव कायम आहे. त्या जखमेवर कृष्णमूर्तींचं बोलणं सुखकारी मलम लावतंय. पण हे शब्द जर पचले नाहीत तर ती दुःखद जाणीव पुन्हा ठसठसून बाहेर येईल. कृष्णमूर्तीही आत्मशोधनाची निकड सांगतात. प्रेमाची महती गातात. पण त्यांची प्रेमाची संकल्पनाही विलक्षण असते.

### युद्ध : ना न्याय, ना तर्कसंगती

कृष्णमूर्तींच्या भाषणांनी आलेलं औदासीन्य गीतारहस्याच्या वाचनानं दूर होतं असा एक सूचक उल्लेखही यात येऊन जातो.

बी. ए.च्या वेळी श्रीधर कलकत्त्याला बंगाली निर्वासितांच्या छावणीत काही दिवस स्वयंसेवक म्हणून जातो. यशोधरा बस्तरमधील आदिवासींसाठी मदत गोळा करत असते. अन्यायाचं उच्चाटन हे मोठं ध्येय असताना वैयक्तिक आत्मशोधाची गरजच काय, हा तिचा प्रश्न. कम्युनिस्ट कार्यकर्त्यांची भाषण ऐकून श्रीधरला वाटतं, यांची श्रद्धाही अंधश्रद्धेच्या पातळीवरचीच आहे. बांगला देशाच्या युद्धातला अनुभव त्याचा मित्र जगत कळवतो, 'युद्ध ही भयानक गोष्ट आहे. घटनांमध्ये न्याय व तर्कशास्त्र नाही.' पुढे बिहारच्या दुष्काळग्रस्तांमध्ये सुंदरसिंगबरोबर श्रीधर काम करतो. पवनारला विनोबांची आणि आनंदवनात बाबा आमटे यांची गाठ घेतो. त्यांना भेटूनही त्याला समाधान होत नाही. (ही दोन थोर माणसं, पण स्वतःचा 'मी'पणा विसरू शकत नाहीत.)

शशीच्या प्रेमात बेभान होण्याचा आणि दारूच्या आहारी जाऊन सर्वकाही विसरण्याचा उन्मनी अनुभवही काही काळ घेतला जातो. त्यातून सावरल्यावर श्रीधर एक प्रवासी शिष्यवृत्ती ग्ळिवून भारतातील वेगवेगळया ठिकाणचे सामाजिक प्रकल्प पाहतो. यशोधरेबरोबर मुंबईला झोपडपट्टीत काम करतो. त्याच वेळी आणीबाणी जाहीर झालेली असते. यशोधराशी जवळीक साधण्याचे श्रीधरचे प्रयत्न ती धुडकावून लावते. विश्वंभर दुर्गम आदिवासी भागात काम करतो, तिथेही श्रीधर जातो. मध्य प्रदेश, बिहार, धनबादचे कोळसा खाण कामगार, कलकत्त्यातील झोपडपट्ट्या यांना भेटी देऊन तो आपला प्रबंध पूर्ण करतो. डॉक्टरेट मिळवतो. परंतु हा संबंध दौरा त्याच्या आध्यात्मिक आंतरिक साधनेचाच एक भाग असतो. केवळ ॲकॅडमिक नसतो.

### व्यवस्थापनात उच्चपद

शशी-यशोधरेच्या प्रेमात– सहवासात आपले झालेले अधःपतन– त्यातून सावरण्यासाठी श्रीधर जिद्दीने औद्योगिक स्पर्धेच्या बाजारात उतरतो. एका मध्यम दर्जाच्या कंपनीतील अधिकारपदावरून भारतातील अत्यंत मोठ्या कंपनीत नंबर दोनपर्यंत झेप घेतो. त्या कंपनीच्या सर्वच विभागांची पाहणी करून तो तिच्या व्यवस्थापनात

कार्यक्षमता आणतो. परदेशांशी व्यापार– व्यवहार वाढवतो. अनेक नवीन योजनांना सरकारकडून मंजुरी मिळवतो. त्याचे महत्त्व वाढत असते. अशा वेळी वर्मा या त्याच्या जुन्या मित्राचा व त्याचा पुन्हा संपर्कयेतो. शशीला देवता मानणारा वर्मा साधुसंतांच्या नादी लागलेला असतो. एक्झिक्युटिव्ह श्रीधर त्याची टिंगल उडवतो. वर्मा संभ्रमात पडतो. त्यातच तो आत्मघात करतो. दीर्घ काळ दाबून ठेवलेली श्रीधरची आत्मशोधनाची प्रेरणा उफाळून वर येते. त्या कंपनीतील प्रमुखांचे काही गैरव्यवहार प्रकट करून सर्वोच्च पद श्रीधरला मिळण्याची शक्यता असते. परंतु त्या खन्नाची पत्नी त्याला साकडे घालते. 'कसेही करून नवऱ्याला वाचवा,' म्हणते. 'लौकिक यश मिळवणं ही फार मोठी अनैतिक गोष्ट आहे' असे श्रीधरला वाटते. आणि श्रीधर पुन्हा आत्मशोधासाठी तसाच बाहेर पडतो. कुणालाही न सांगता.

### पुस्तकी उत्तरं माहीत आहेत

या कादंबरीचा आरंभ होतो तो श्रीधर ऑफिसमधून बाहेर पडतो येथून. (वर दिलेला कथाभाग हा अधूनमधून येत राहतो.) आधी मरीन ड्राइव्हवर भर पावसात तो भिजत राहतो. समुद्रात उडी मारण्याचाही कदाचित त्याचा बेत असेल; पण तो पक्का नसावा. नंतर टॅक्सीतून फेरफटका. चर्चगेटवर लोकलमध्ये शिरकाव. तेथून वसईकडच्या जंगलातील भ्रमंती. अर्धवट ग्लानी, अर्धवट चेतना. नंतर हिमालयाकडे जाण्यासाठी पकडलेली रेल्वे. प्रवासातले अनुभव. एका मुसलमान वृद्धाने आस्थेने चौकशी करून श्रद्धावंत माणूस कधीच पागल होत नाही असा व्यक्त केलेला विश्वास. एका बैराग्याने मादक द्रव्ये देऊन त्याचे पैसे घेऊन केलेला पोबारा. हरिद्वारला लक्ष्मीदास-माई या जोडप्याने आपल्या मठात दिलेला आश्रय. तिथे केलेली साधना, प्राणायाम, हठयोग, आध्यात्मिक चर्चा. लक्ष्मीदासना तो म्हणतो, "माझे प्रश्न आध्यात्मिक आहेत. अस्तित्वाचा अर्थ, या विश्वाच्या अस्तित्वाचा अर्थ, जीवनाचं प्रयोजन.... पुस्तकी उत्तरं मला माहीत आहेत, पण त्याचं अजून नीटसं आकलन झालेलं नाही..." लक्ष्मीदास त्याला म्हणतात, "मी काही मदत करू शकेन असं वाटत नाही. इथे पर्वतात पुष्कळ साधुपुरुष, योगी आणि सिद्ध जन राहतात म्हणे. पण मला असा खरा ज्ञानी अद्याप सापडला नाही. तुला सापडला तर विचार रस्ता." 'पूर्ण समाधानाप्रत क्वचितच कोणी व्यक्ती जिवंतपणे जाऊ शकते. आपण सामान्य माणसं. कायम असमाधानाशी तडजोड करण्यात यश आलं तरी त्यात समाधान मानावं,' असेही ते स्पष्ट करतात. खोट्या समाधानाचा सोपा मार्ग म्हणजे भक्ती, असे त्यांना वाटते.

याच मठातल्या माईच्या आंतरिक वेदनेची एका बेसावध क्षणी श्रीधरला ओळख होते. तिला मूलबाळ नसते. "एक बीज पेरून नवा जीव निर्माण करणे ही महान अशी निर्मितीची प्रक्रिया आहे. परमेश्वरानं ही सृष्टी निर्माण केली ती निर्माणाची सर्जनशीलता आणि ही सर्जनशीलता यांत काहीच फरक नाही. हीदेखील नव्या विश्वाची निर्मितीच. आपल्या

आयुष्याला भव्यदिव्य अर्थ देणारी. मी आजपर्यंत जगले ते याचसाठी." माईची इच्छा पूर्ण करून श्रीधर मठातून बाहेर पडतो.

एका अवघड कड्यावर ग्लानी येऊन पडलेल्या अवस्थेत त्याला पुन्हा साक्षात्काराचा अनुभव येतो. ओंकाराचा गूढ ध्वनी...तेजस्वी प्रकाशगोल...दिक्कालाला भेदून आदिम अस्तित्वाला साकार करणारा ओंकार...शरीर ही आत्मचैतन्यानं सळसळणारी तेजस्वी वस्तू...आश्चर्याची आणि आनंदाची सर्वांगावर रोमांच उठवणारी लाट...हा तर पुनर्जन्मच.

### मी तिचीच वाट पाहत होतो

याच टप्प्यावर अरुण साधूंमधील थ्रिलरवाला लेखक जागा होतो. श्रीधरला भारतीय लष्कराचे अधिकारी पकडतात. पाकचा गुप्तहेर तर नव्हे ना, या शंकेने. कारण तो अत्यंत अवघड दुर्गम कडा चढून आलेला असतो. श्रीधर स्वतःची पूर्वायुष्यातील ओळख न देता उडवाउडवीची उत्तरे देतो. त्यामुळे संशय बळावतो...अर्थात पुढे सर्व उलगडा होतो आणि श्रीधरची सुटका होते. त्याचा मित्र जगत हाच तिथे प्रमुख अधिकारी असतो. तो त्याला आपल्या घरी नेतो. आजवरच्या जीवनाच्या शोधयात्रेची उजळणी होते. जगतची प्रिय पत्नी सहा दिवसांपूर्वी त्याला सोडून गेलेली असते. तिला काहीही करून परत आणायचेच, असा त्याचा निर्धार असतो आणि शशी श्रीधरला घेऊन जाण्यासाठी येत आहे अशी बातमीही जगत देतो. तेव्हा श्रीधर म्हणतो, "मी तिचीच वाट पाहत होतो."

### सर्वांना ज्ञात असलेले सत्य

श्रीधरला अंतिम सत्य गवसतं का? जीवनाचा अर्थ उमगतो का?

आपल्या भारतीयांना चिरपरिचित असलेल्या शब्दांतच हा अर्थ प्रकट होतो. पण या शब्दांना आता केवळ शाब्दिक पातळीवरच अस्तित्व नसते, अनुभूतीच्या आणि प्रगतीच्या पातळीवरचे अस्तित्व लाभलेले असते, एवढाच काय तो फरक आहे. त्या उत्तराला अनेक पैलू असतात. अनेक पदर असतात. श्रीधर म्हणतो, "आज हे प्रथमच बोलतो आहे...बहुतेक प्राणिमात्रांना आणि मनुष्यांना (जगाला सुखी आणि सुंदर करणं म्हणजे आपणही सुखी आणि सुंदर होणं...परमार्थ हा श्रेष्ठ स्वार्थच) या सत्याची मनोमन पूर्ण जाणीव असते. पण ती अव्यक्त असते. म्हणून सारे मोठ्या जिद्दीने जीवनावर प्रेम करीत असतात आणि कसोशीनं जीवन जगत असतात. ही दृढ जीवनाकांक्षा नसती तर माणूस निर्माणच झाला नसता...भव्यदिव्य आदर्शांच्या उत्कट ओढीनं अंतःकरण सतत प्रज्वलित ठेवणं यातच नास्तिकाची खरी मुक्तिसाधना आहे... हे विश्व म्हणजे त्या परमशक्तीचं आत्मगुंजनच... परमतत्त्वाचा वैविध्यपूर्ण प्रकारात विकास होतो तो स्वतःला पाहण्यासाठी... विश्वव्यापी शक्तीच्या समोर आपण क्षुद्र, असहाय आहोत हे माहीत असूनही आपलं मानसिक धैर्य कायम



अनुक्रमणिका

ठेवण्यात खरा पुरुषार्थ आहे..."

शशीची व श्रीधरची प्रीती सफल होणे हा या शोधयात्रेचा शेवट असतो. साक्षात्कारानंतरही देह असेतोपर्यंत या देहाचे सारे धर्मकर्म सांभाळणे टाळता येत नाही. त्या चक्रातून जावेच लागते. कृष्णमूर्ती वा प्रा. शास्त्री यांचा संदेश असतो की, प्रेमाशिवाय जीवनाचे आकलन होणार नाही. श्रीधरच्या मनात त्या प्रेमाचा उदय होतो आणि त्याची शोधयात्रा संपते. त्याला आपले श्रेय गवसते.

अरुण साधू यांनी या शोधयात्रेला इतकी वेगवेगळी परिमाणे दिली आहेत की ती उमजून न घेणाऱ्याला ही शोधयात्रा पसरट वाटेल. लांबलेली दिसेल. आरंभीचा भाबडा आदर्शवाद, भव्यदिव्य परमेश्वराची वाटणारी ओढ, आप्तस्वकीयांच्या आचरणातून व वर्तनातून त्यावर होणारे आघात, वास्तवाचे भान, मृत्यूची जाणीव, समाजातील विषमता आणि अन्यायाने तळमळणारे मन, त्या सर्व विसंगतीचा अर्थ लावण्यासाठी आणि जीवनाचे श्रेय समजून घेण्यासाठी तत्त्वज्ञान, साधुसंत-बुवामहंत यांचा आधार घेण्याचा प्रयत्न, सामाजिक-राजकीय पुनर्रचनेच्या प्रकल्पात सहभाग, भ्रमंती, आर्थिक व व्यावहारिक यशाचा केलेला पाठलाग, मद्य-चरस-व्यसने यांच्या सेवनाने येणारी झिंग, निसर्गाच्या सान्निध्यात आत्मशांती शोधण्याचा प्रयत्न, सहानुभूतीने इतरांच्या सुखदुःखांचा वा पापपुण्यांचा घेतलेला वेध, निरलस सेवा आणि त्याग... अशा अनेक टप्प्यांतून ही शोधयात्रा जाणे अपरिहार्य असते. अरुण साधू यांनी या सर्व टप्प्यांचे कमी-अधिक आत्मीयतेने अवलोकन केले आहे. कृष्णमूर्ती, रजनीश, विनोबा, बाबा आमटे, इंदिराजी, बांगला देशचे निर्वासित, दुष्काळग्रस्त बिहारचे ग्रामजन, झोपडपट्ट्यांमधले अ-मानुष जीवन, उच्चपदस्थांचे पंचतारांकित वैभव आणि त्यातील जीवघेणी स्पर्धा, अध्यात्माच्या नावावर चालणारी फसवणूक या सर्वांना एका अर्थपूर्ण सूत्रात, एका विशिष्ट परस्पेक्टिव्हमध्ये साधूंनी स्थानापन्न केले आहे.

श्रीधरच्या बालपणातील जिज्ञासेपासून, त्याचे शालेय-महाविद्यालयीन शिक्षण, त्याचे व्यवस्थापकीय कौशल्य आणि आंतरिक अस्वस्थतेचा त्याने केलेला पाठपुरावा यातूनही या शोधाचे सातत्य टिकवले आहे. राजकीय, सामाजिक, आध्यात्मिक चर्चा जिथे जिथे आलेल्या आहेत तिथे तिथे त्या प्रचलित युक्तिवादांचा निर्भय व सडेतोड आविष्कार करतात असेच आढळेल. विशेषतः आध्यात्मिक चर्चांच्या संदर्भात त्यांनी कमालीचा संयम व सावधपणा पाळलेला आहे. आत्मसाक्षात्काराचे जे तीन प्रसंग श्रीधरच्या जीवनात येतात त्यांचेही वेगळेपण दाखवण्याची दक्षता घेतली आहे. एकमेकांच्या अनुभवांना शह-काटशह वा छेद देणारी, परस्परसंघर्षाची भूमिका घेणारी पात्रे व प्रसंग यांचीही योजना कौशल्याने केली आहे. एकतर्फी समर्थन वा पुरस्कार टाळण्याची कोशिश केलेली आहे. बुद्धिप्रामाण्यवादी धनंजय पंचधातूंचा कडा वापरण्यास सिद्ध होणे, विश्वंभर आदिवासींमध्ये काम करत राहणे, इ. तपशिलांमुळे त्यांच्या जीवनातले बदलते टप्पेही



अनुक्रमणिका

स्पष्ट होतात.

**आत्मशोधाचे टप्पे**

शरदबाबूंच्या देवदास, श्रीकांत यांच्या जातकुळीतला हा साधूंचा श्रीधर आहे. जन्मजात औदासीन्य आणि वैराग्य घेऊन आलेला आणि अवघ्या अस्तित्वाचा गाभा कवळण्यासाठी निघालेला. श्रीकांतला नाग पकडणाऱ्या साधूचे आकर्षण असते, मायेत जखडणाऱ्या स्त्रीचे असते, कोणाच्याही मदतीला धावून जाणाऱ्या इंद्रनाथचे असते. परंतु कोणीही जखडून ठेवू लागले तर तो तिथूनच पळ काढतो. निर्हेतुक भ्रमण करीत राहतो. हे बाह्यतः निर्हेतुक वाटणारे भ्रमण खरे आत्मशोधासाठीच असते.

आत्मशोधाच्या प्रदीर्घ प्रवासातले टप्पे साधूंना नेमके गवसले आहेत का? त्यातील नेमका संघर्ष सापडला आहे का? श्रद्धा आणि अश्रद्धा यांची सीमारेषा कुठली? श्रद्धेने, दुसऱ्यावर भार टाकल्याने, ईश्वर मानल्याने मनःशांती संभवते का? ती आत्मवंचना नव्हे का? आत्मभान, देहभान, सर्वसाक्षित्वाचे भान आणि प्रेमाचे– म्हणजेच दुसऱ्या व्यक्तीविषयी वाटणाऱ्या आत्मीयतेचे भान– यामुळे श्रीधर हा एकमेवाद्वितीय ठरतो की प्रातिनिधिकच उरतो? श्रीधरच्या शोधयात्रेचा शेवट यापेक्षा वेगळा काय होऊ शकला असता? असे अनेक प्रश्न हे पुनःपुन्हा साक्षेपी वाचकाचा पाठपुरावा करीत राहतील.

कादंबरीचा आरंभ श्रीधर आपल्या वैभवशाली कचेरीतून कोणालाही कसलीही पूर्वसूचना न देता बाहेर पडतो येथून होतो, आणि एकीकडे त्याच्या हिमालयातील भ्रमणाची कथा सांगितली जात असतानाच त्याच्या बालपणापासूनची वाटचाल अधूनमधून– पण शक्यतो कालक्रमाने– फ्लॅशबॅकने उलगडण्यात येते. या बाबतीत साधूंनी बरीच कसरत केलेली आहे. ही कसरत या कादंबरीच्या मध्यवर्ती कल्पनेच्या प्रभावी आविष्कारासाठी अपरिहार्य आहे का, असा प्रश्न पडतो. वाचकाचे अवधान अधिक जागरूकपणे खेचून ठेवण्यासाठी तंत्रदृष्ट्या हा मार्ग साधूंना मनोमन अपरिहार्य वाटला असावा. परंतु श्रीधरचे पूर्वजीवन तुकड्यातुकड्यांनी पुढे येत राहिल्याने आणि सद्यःकालीन आध्यात्मिक वाटचालीशी त्याची सांगड बसत नसल्याने वाचकाला कसरत करावी लागते.

मराठीतील एक आशयसंपन्न आणि सामर्थ्यसंपन्न कादंबरी म्हणून शोधयात्रा गाजत राहील. तिची बौद्धिक आणि आध्यात्मिक झेप तरुण वर्गाला आव्हान देत राहील. हरिभाऊ आपटे यांची 'मी', वामन मल्हार जोशी यांची 'सुशीलेचा देव' यांसारख्या विचारप्रधान, चिंतनपर कादंबऱ्यांची परंपरा पुढे चालवणारी ही महत्त्वाकांक्षी कहाणी सध्याच्या तरुण वर्गातील मूल्यात्मक बजबजपुरीत एखाद्या दीपस्तंभाप्रमाणे आश्वासक ठरेल.

(शोधयात्रा- अरुण साधू, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ४४८. शंभर रुपये.)



अनुक्रमणिका

# झेलझपाट : डॉ. मधुकर वाकोडे
## आदिवासी कोरकूंचा जीवनसंघर्ष

प्रा. प्रमोद मुनघाटे

लोकवाङ्मयाचे अभ्यासक आणि ललित लेखक म्हणून सर्वपरिचित असलेल्या डॉ. वाकोडे यांची 'झेलझपाट' ही पहिलीच कादंबरी. अमरावती जिल्ह्यातील मेळघाट परिसरातील कोरकू जमातीच्या पार्श्वभूमीवरही लिहिलेली. कोरकूंचे निसर्गनिष्ठ जीवन, बदलत्या सामाजिक-आर्थिक परिस्थितीत नागर समाजाशी येणारा संबंध, सहकारी आणि शासकीय योजनांचे प्रयोग, अशा अनेक संदर्भांना एका सुडौल कथात्म अनुभवाच्या रूपात 'झेलझपाट' कादंबरीत स्थान मिळाले आहे. कोरकूंच्या बहुकेंद्री जीवनाचा वेध घेणारे त्यांचे निरीक्षण सूक्ष्म आहे. कथात्मक संरचनेसाठी लेखक तंत्राच्या आहारी जात नाही; तसेच निवेदनाचा भावनात्मक प्रत्यय कुठेही सैल सुटा होऊ देत नाही. सामाजिक मूल्यनिष्ठा हे कलाकृतीचे केवळ अधिष्ठान आहे; अभिव्यक्त रूप नाही, ही जाणीव जे काही मोजके लेखक आपल्या साहित्यातून प्रकट करीत आहेत, त्यांपैकी डॉ. मधुकर वाकोडे हे एक आहेत. या कादंबरीत मूल्यगर्भ आत्मनिष्ठा आणि कलानिष्ठ सामाजिकता यांचा पुरेपूर प्रत्यय येतो. या कादंबरीतील सामाजिक तत्त्वनिष्ठा निवेदनाच्या पातळीवर वाचकाला भावात्म अनुभव देते.

'झेलझपाट'मध्ये चौकटबद्ध झालेला 'तारुबांदा' दोन ढाण्यात विभागलेला आहे. एका बाजूला कोरकूंची वस्ती तर दुसऱ्या बाजूला गवळी ढाणा. तारुबांद्याच्या या चौकटीत साकार केलेले जीवनचित्र नानाविध व्यक्तिचित्रांनी, तऱ्हेतऱ्हेच्या निसर्गवर्णनांनी आणि अनेक संघर्षक्षणांनी जिवंत केले आहे. कोरकूंच्या दिनचर्येची सपाट वर्णने येथे नाहीत. त्यांच्या जीवनसंघर्षातील नमुनेदार क्षणांचा कलात्मक आविष्कार आहे. हे संघर्ष सुटे सुटे जाणवत नाहीत. त्यांचा एकात्म अनुभव वाचकाला येतो.

फुलय आणि केरू यांची ही कथा. फुलयने केरूला जीवनसाथी म्हणून निवडले आहे. फुलय आणि केरू यांचे हे प्रेम वाचकांच्या चाकोरीबद्ध अपेक्षेला धक्का देणारे आहे. आवडलेल्या तरुणाच्या 'घरात घुसण्याचे' स्वातंत्र्य कोरकू तरुणीला आहे. कोरकूंचे निसर्गनिष्ठ स्वातंत्र्य वर्तमान स्थितीत मात्र उरलेले नाही. आता वल्लभदास खंडेलवाल आणि कासम मण्यारीवाला यांची कीड त्या स्वातंत्र्याला लागली आहे. फुलेच्या तारुण्यावर डोळा ठेवून असणारा कासम मण्यारीवाला तिच्या बापाला दारू बरोबर लाल परीचेही व्यसन लावतो. खंडेलवालकडून उधारीवर गूळ-चहापत्ती आणणारी फुलय

अगतिक असते.

केरू हा कोरकू ढाण्यात थोडाबहुत शिकलेला तरुण. एकीकडे होळीच्या चाहुलीने बहरलेल्या पळसासारखे फुलयचे प्रेम त्याला खुणावत असते तर दुसरीकडे मुसलमानांचा झेलझपाट– ख्रिश्चनांचा धर्मप्रसार– लाल परीची आता दारूला मिळालेली साथ– सरकारी मोसंबी-नारंगी– टायगर प्रोजेक्ट– सरकारी योजनांमधील भ्रष्टाचार– जंगलांची लूट, हे सर्व कोरकू जीवनपद्धतीवर आघात करणारे घटक असतात.

जंगलात गज्या गवळ्याची गाय वाघ मारतो. त्या वाघाने पुन्हा गाई मारू नयेत यासाठी गवळी मेलेल्या गाईवर एंड्रीन टाकतो. वाघ मारतो. लाल परी विकणाऱ्या कासमला केरू हटकतो, म्हणून कुटिलतेने कासम केरूला तुरुंगाची हवा दाखवितो. त्याच वेळी तो फुलयच्या मार्गातील केरूचा काटा दूर करतो. या अपमानाचा बदला फुलय घेते. ती उत्तररात्रीच्या अंधारात जंगलात मेलेल्या वाघाच्या मिशीचे केस आणून कासमच्या जेवणात टाकते. कासम खंगत खंगत मरतो. गवळयांनी वाघ मारल्यामुळे गवळयांची वस्ती तारुबांद्यावरून हलविण्याचा निर्णय शासकीय पातळीवर घेतला जातो. का? तर ते वाघांचे अभयारण्य म्हणून घोषित केलेले असते.

कोरकू आणि गवळी यांच्या अस्तित्वापेक्षा प्रोजेक्ट टायगरला महत्त्व.

पंचायत समितीच्या सभापतींची इच्छापूर्ती न केल्यामुळे अंगणवाडीच्या बाईची काळ्या बेटावर बदली होते. डॉक्टर टिकेकरांनी आधारासाठी दिलेला हात तिला सोडावा लागतो तर तिकडे फुलयच्या घरी मुक्कामाला कासम राहिला या संशयापोटी केरू दुरावतो. एक दिवस मासे पकडायला गेलेला केरू कुंडाच्या बाहेरच येत नाही. मग फुलयही त्याच कुंडात उडी घेते.

फुलयसारखी पीडित स्त्री असो की अंगणवाडीच्या बाईसारखी सुशिक्षित स्त्री असो, सामाजिक–आर्थिक शोषणाच्या व्यवस्थेत तिच्या वाट्याला एकसारखाच अन्याय येतो.

बोडक्या डोंगरावरील बहरलेला पळस, घुंघरवाळे वाजविणारे संकेसराचे झाड, मोहफुलांचा सडा यांचे वर्णन आणि कोरकूंचे नृत्य व गवळी ढाण्यातील गौळणींचा चिवचिवाट यांचे चित्रण काव्यात्मक आहे. आणि कलात्मक तटस्थता यांचा योग्य मेळ साधणारे निवेदन वास्तवापासून कुठेही ढळत नाही.

'झेलझपाट' ही कोरकूंच्या जीवनाची 'डाक्युमेंटरी स्टाईल' चित्रकथा नाही. ती निव्वळ प्रेमकथाही नाही. ती खंडेलवाल व कासम यांच्या आर्थिक शोषणाची कथाही नाही. ती प्रोजेक्ट टायगर, अंगणवाडी, संकरित गाय या शासकीय योजनांची निरर्थकता कथन करणारी रडकथा तर नाहीच नाही. तर 'झेलझपाट' ही आदिवासींमधील माणसांच्या माणूसपणाची, बदलणाऱ्या सामाजिक परिस्थितीशी उद्‌भवणाऱ्या संघर्षाची शोककथा आहे.

वाकोडे यांच्या या पहिल्याच कादंबरीला महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ह. ना. आपटे



अनुक्रमणिका

रीति-परिस्थितीला सतत सामोरे गेले आहे, या बाबीचा प्रत्यय आणून देणारी कादंबरी म्हणूनही ही रचना स्वागतार्ह ठरावी.

या कादंबरीतील जवळपास सर्व पात्रे नि त्यांचे चेहरे कुठेच ठळक ठसठशीत होत नाहीत. अर्थात चरित्रचित्रणाचा पट उलगडणे हे काही या कलाकृतीचे उद्दिष्ट नाही. तरीही उगीचच असे वाटते, की भुर्रदिशी जळून अल्पकाळ उजळणाऱ्या कापराच्या वडीसारखी ही कलाकृती आहे. उंच शेलाटा, विशेष अंग न धरलेला या कादंबरीतील आशय आता आहे यापेक्षा अधिक मांसल आणि हाडापेराने भरदार झाला असता तर 'विषवृक्षाच्या मुळ्या' ही मोठी विलक्षण रचना ठरली असती. क्रिकेटच्या खेळामध्ये एखादा छोटेखानी डाव खेळायची योजना आधीच आखल्यामुळे जी एक पंचाईत होते, तीच गोष्ट इथे घडली आहे. नपेक्षा भ्रष्टाचारासारखा विराट विषय शेसव्वाशे पृष्ठांमध्ये आवरला नसता.

'विषवृक्षाच्या मुळ्या'तील संवाद मराठवाड्यातील मातीचा गुणगंध लेऊन आल्यामुळे त्यातील गोडवा, रानवट रोखठोकपणा आणि मनमुक्त लय इ. विशेष वेधक वाटते. "... मग तुमी कह्याला हैत निस्तेच डायरेक्टर का फायरेक्टर? योक पोरगं चिटकायचं तं चेरमनला इचारावं लागतं मन्तात? त्येंची आडर चालती आन् तुमची चालंना व्हय? म्या म्हंतू, तुमची का न्हायी चालत? आंऽ? तुमचीबी चालली फायजी. नसंनचालत तं उपेग काय तुमचा? द्या न मायला राजीनामा त्या बँकीचा.." ही अशी उदाहरणे पानापानावर आहेत. "... तो मग नुसता मोर होऊन जायचा..." अशी काव्यपूर्ण वाक्ये हॉटेलमधील शिऱ्यात चुकून बेदाणा सापडल्यागत विरळा.

(विषवृक्षाच्या मुळयाः वासुदेव मुलाटे; मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ११९. पंचेचाळीस रुपये)

(वसंत केशव पाटील ४/९, भूपेश अपार्टमेण्ट्स विद्यानगर, कराड.)

---

## लेखसंग्रह

१. **मागे पुढे जालो लाटा**– श्री. ह. थत्ते, चेतश्री प्रकाशन, अमळनेर ४२५४०१, १-१९८९, पृ. १४८, पन्नास रुपये.

२. **गिरिपर्णा** – कोलते वि. भी. चेतश्री प्रकाशन. अमळनेर, पृ. १४४, पन्नास रुपये

३. **नांगी असलेले फुलपाखरू**– गोंडसे द. ग. पॉप्युलर प्रकाशन. ताडदेव, मुंबई ३४, १-१९८९, पृ. २७५. शंभर रुपये.

४. **मंथन–संपा.**– नलगे चंद्रकुमार. सुरेश एजन्सी. २०५, शुक्रवार पेठ, पुणे २, १-१९८९, पृ. ९६. पस्तीस रुपये.

५. **कोकणातील दलित चळवळ**– राजा जाधव, पंचशील ज्ञानपीठ प्रकाशन, मालाड, मुंबई. ९५, १-१९८९, पृ. १०१, वीस रुपये.

६. **वादळाच्या मुली**– वा. रा. सोनार, चेतश्री प्रकाशन. अमळनेर. १-१९८९, पृ. २४. आठ रुपये.

# रक्तध्रुव : रवीन्द्र शोभणे

## पोटाच्या आणि ओटीपोटाच्या आगीची होरपळ

मनोहर तल्हार

कादंबरी क्षेत्रात विदर्भात गेल्या पंचवीस वर्षात एक पोकळी निर्माण झाली होती. ज्या तुरळक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्यात त्यांची विशेष अशी दखल घेतली नाही; परंतु गेल्या चार-पाच वर्षात निर्माण झालेल्या काही कादंबऱ्या लक्षवेधी ठरल्यात. गेल्या वर्षभरात लक्षवेधी कादंबऱ्या म्हणून उल्लेख करता येईल अशा दोन कादंबऱ्या प्रकाशित झाल्यात. डॉ. मधुकर वाकोडे यांची 'झेलझपाट' आणि डॉ. रवीन्द्र शोभणे यांची 'रक्तध्रुव'! दोन्ही कादंबऱ्या विषय-शैली आणि घाट या दृष्टीने वेगळ्या आहेत. 'झेलझपाट'चा विषय आदिवासी कोरकूंचे दरिद्री जीवन, त्यांच्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेणारे जांगडी व त्यांच्या जीवनाचे करुण-भीषण नाट्य, लालित्यपूर्ण काव्यात्म शैली व सारे कादंबरीत बंदिस्त करणारा देखणा घाटदारपणा! डॉ. रवीन्द्र शोभणे यांची 'रक्तध्रुव' ही नेकीने जीवन जगणाऱ्या एका मुसलमान दरिद्री कुटुंबाची मन हेलावून सोडणारी कथा. अतिशय सुबोध आणि वाचकांना खेचून नेणारी शैली आणि कादंबरीची बांधेसूद बांधणी, यामुळे ही कादंबरी 'गोळीबंद' झाली आहे. एकदा वाचून समाधान न होणारी!

सुलेमान व सईदा हे नेकीने जीवन जगणारे, नरखेडातील किल्ल्यावरील मुसलमानपुऱ्यात राहणारे दांपत्य! दरिद्री जीवनातही सुखी असलेले! त्यांच्या पोटी सलमाच्या रूपाने अप्रतिम लावण्य अवतरते. ती पायाळू असते. तिला लाभलेले रूप बघून सईदाला हेवा वाटे आणि हे आपल्याला अखेरपर्यंत सांभाळता येईल का, असा प्रश्न पडे. नियती त्याच मार्गावर असते. पिंपे-डबडी दुरुस्त करणारा सरळमार्गी सुलेमान रोगाच्या दिवसात अंगात पायघोळ कफनी, डोक्याला हिरवा दुपट्टा, एका हातात झाडणी, एका हातात कटोरा आणि कटोऱ्यात जळत्या उदाचा धूप घेऊन मशिदीकडे–"सजन रे झूट मत बोलो... खुदाके पास जाना है"– हे गीत तल्लीनतेने गाणारा. वयाच्या बाराव्या वर्षीच नियती आपला डाव साधते आणि सुलेमानचे कुटुंब अक्षरशः उद्ध्वस्त होऊन जाते.

राशिद ही एक रांडमुंड बाई. याकूबला– आपल्या उडाणटप्पू मुलाला कामाला लावते. पानपेटी तयार करून रेल्वे स्टेशनवर रोजगारीला लावते. त्याचा प्रवासातल्या देखण्या तरुणींशी लघटपणा, फुकट पान देताना तरुणीचा होणारा ओझरता स्पर्शही त्याला सुखावून जातो. ऋषितलावावर गेलेल्या सलमाला एकटीला बघून तो तिला 'मुंगफल्ली देतो' सांगून आपल्या वावरात नेतो, तिच्यावर बलात्कार करतो. सईदा तिचा शोध घेत

तिथे येते. ते दृश्य बघून पेटून उठते. तिने उचललेला दगड चुकवून याकूब पळ काढतो. ही घटना कळताच सुलेमान पहारीच्या एका घावात याकूबचा मुडदा पाडतो.

सुलेमानला सात वर्षांची कैद होते आणि इथेच सुलेमानच्या आणि याकूबच्या कुटुंबाचा विध्वंस होतो. राशिद वेडी होते आणि एके दिवशी ती रुळावर झोपून जीव देते. याकूबची बहीण अस्मा नातेवाईकाकडे निघून जाते आणि राशिदाचे पडके घर तेवढे शिल्लक राहते. सलमामुळेच सुलेमानने याकूबचा खून केला व तो कैदेत गेला व म्हणून हे दिवस समोर आलेत. या साऱ्या गोष्टींना सलमाच जबाबदार आहे, म्हणून ती आपल्या मुलीचा छळ करते. हसली तर हसली म्हणून कंबरड्यात लाथ आणि रडली तर रडली म्हणून पाठीत दणका. तिला सईदा घराबाहेर पडू देत नाही. परपुरुषाशी बोलली तर मारहाण. सलमा हा छळ सहन करते. उजळमाथ्याने फिरण्याचे– आपल्या वयाच्या मुलींसारखे हुंदडण्याचे तिचे वयच करपून जाते. टांगेवाला शेरूचाचा, सैन्यातून परतलेला भय्या पवार, कारावासातून परतलेला पण कामवासना हरवून आलेला सुलेमान यांतून पुढची कथा वेगवेगळी वळणे घेते. तीन उद्ध्वस्त कुटुंबांची कहाणी बनते.

प्रस्तुत कादंबरीचा विषय 'विषयवासना'! या विषयवासनेतून निर्माण झालेली परिस्थिती वणव्याचे रूप घेते आणि या वणव्यात पोटाच्या आगीपेक्षा भयंकर असलेली शरीराची आगच सतत धगधगत राहते. आणि या आगीत सुलेमान, सलमा, सईदा, शेरू, याकूब, राशिद, अस्मा, भय्या पवार होरपळून निघतात. कादंबरीचा विषय वासनाकांड असूनही तो लेखकाने शक्य तितक्या संयमाने हाताळला आहे. १९६० च्या पूर्वी मराठी लेखक धीट नव्हता. १९६० नंतर काही लेखकांमध्ये हा धीटपणा आला. परंतु १९७५ नंतर निर्माण झालेल्या काही लेखन कलाकृतींत तर रतिक्रीडा वर्णनेही येऊ लागली.

प्रस्तुत कादंबरीत वासनेने पेटलेल्या व्यक्ती आहेत; पण त्या वाचकांच्या लैंगिक भावना चेतवीत नाहीत. यात शृंगार आला आहे तो ती कथावस्तूची अपरिहार्य गरज म्हणून.

लेखकाची शैली ओघवती व चित्रदर्शी आहे. परस्परपूरक, परस्परविरोधी भावभावनांचे मनोज्ञ चित्रण आहे. मनाचे व्यापार तोल सांभाळून संज्ञाप्रवाहातून वाहतात. नरखेडचा परिसर, तेथील निसर्ग, मुसलमान रीतिरिवाज, घरेलू जीवन– सारे काही उभे राहते. मूलभूत पोटाची भूक आणि ओटीपोटाची भूक सर्व जगात सारखीच महत्त्वाची असते, हेही सत्य प्रकट होते. लेखकाने उभे केलेले प्रसंग, वापरलेल्या प्रतिमा, बदलत्या ऋतूप्रमाणे बदलणाऱ्या निसर्गाचे चित्रण, प्रादेशिक जीवनदर्शन इत्यादी, या कादंबरीच्या महत्त्वाच्या जमेच्या बाजू आहेत.

वेगळ्या जीवनदर्शनाचा पट मांडणारी 'रक्तध्रुव' ही कादंबरी स्वागतार्ह आहे.

(रक्तध्रुव- रवीन्द्र शोभणे; मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ११३; चाळीस रुपये.)

(मनोहर तल्हार, रवींद्र नगर, नागपूर)



अनुक्रमणिका

# एम टी अथवा मारू : अनंत सामंत

## दर्यावर्दी जीवनाचे धगधगते स्पंदन

**शंकर सारडा**

महाराष्ट्राला साडेसातशे मैलांचा सागरी किनारा लाभलेला आहे; परंतु मराठीत सागरी जीवनाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेले साहित्य अगदीच नगण्य आहे. मराठी तरुण अनेक जहाजांवर तसेच नौदलात काम करतात. जगभर ते संचार करतात; परंतु आपल्या दर्यावर्दी जीवनाबद्दल फारसे त्यांनी लिहिलेय असे दिसत नाही. चिंतामणी लागू यांची १९८१ मध्ये प्रसिद्ध झालेली 'सागरपुत्र' ही पावणेचारशे पृष्ठांची कादंबरी नौदलात कॅडेट म्हणून प्रवेश करून प्रशिक्षणाच्या काळात आलेले व त्यानंतरचे चित्रविचित्र अनुभव जयंत जोशी या तरुणाच्या आत्मनिवेदनाद्वारे शब्दबद्ध करते. नेव्हीतील प्रशिक्षणाची तऱ्हा, जहाजावरील व समुद्रप्रवासातील जीवन, नेव्हीतील अधिकाऱ्यांची लष्करशाही शिस्त, निरनिराळ्या बंदरांवर खलाशी वर्गासाठी असणाऱ्या खास सोई-सुविधा, देहमनांच्या गरजा भागवणाऱ्या बाजारपेठा, नाइट क्लब्ज, बंदराबंदरावर रंगणारी प्रेम-प्रकरणे, जपान–चीनमधील अनुभव, वगैरे बारा वर्षांमधील घटनाचक्रांचा वेध 'सागरपुत्र'मध्ये घेण्यात आला होता. ही कादंबरी या विषयावरील पहिलीच आणि सफाईदार असूनही उपेक्षितच राहिली. दूरदर्शनवरील फौजी ही मालिका ज्यांनी पाहिली असेल, त्यांना या कादंबरीच्या स्वरूपाची कल्पना करता येईल.

'मी– एक खलाशी' ही सौ. माधवी कुंटे यांची कादंबरी नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. त्यांचे पती श्रीधर कुंटे हे दीर्घ काळ मर्चंट नेव्ही ऑफिसर होते. त्यांच्या हकीकतींवर आधारलेली पण कल्पनाप्रचुर कथावस्तूचा आश्रय घेणारी केबिनबॉय ते कॅप्टन हा अजयच्या प्रवासाचा दीर्घ पल्ला पकडणारी ही कादंबरीही वाचनीय आहे. निरनिराळ्या बंदरांची प्रेक्षणीय माहिती देणारी आणि एका प्रेमकथेचा धागा पकडून ठेवणारी आहे.

### नवशिकेपणा जाणवत नाही

एम टी आयवा मारू ही अनंत सामंत यांची ३९० पृष्ठांची पहिलीच कादंबरी. दर्यावर्दी जीवनाचे एक वेधक अंग ती उघडे करते, आणि तेही अत्यंत कलात्मक ताकदीने. मध्यमवर्गीय ठराविक चौकटीतल्या संकुचित चाकोरीतल्या जीवनाचे गुऱ्हाळ चालवणारे अनेक कथाकादंबरीकर आपल्यात भाव खातात. आपली सुखवस्तू नोकरी आणि परीटघडी सुरक्षितता सांभाळत बाल-तरुण वयात अजाणतेपणी आलेल्या विविध पण अनोख्या

अनुभवांच्या भांडवलावर ते आयुष्यभर लेखनव्यवसाय जारी ठेवतात. पुढच्या आयुष्यात आपल्या सुखासीन प्रतिष्ठित सुरक्षित कवचाच्या बाहेर पडून, आपले मुखवटे दूर करून कुठलाही अनुभव घेण्याची क्षमताच ते गमावून बसतात आणि स्वतःच निर्माण केलेल्या लोकप्रियतेच्या फॉर्म्युल्यात बंदिस्त होऊन सभासंमेलनांमध्ये मुजरे घेण्यात धन्यता मानतात. याउलट या मध्यमवर्गीय चाकोरीबाहेर पडून विशाल दुनियेतल्या जीवघेण्या स्पर्धेत उतरून विविध क्षेत्रात स्वतःसाठी स्थान निर्माण करू पाहणारे तरुण जेव्हा आपल्या अनुभवांचे चित्रण करायला सिद्ध होतात तेव्हा त्यांचे जे वेगळेपण, त्यांचे जे अस्सलपण त्यात उतरते ते तथाकथित वाङ्मयीन संकेतांच्या चौकटींची तमा न बाळगताही अत्यंत चैतन्यपूर्ण असते आणि ते सराईत, सिद्धहस्त, मान्यताप्राप्त लेखकांनाही एका फटक्यात निष्प्रभ ठरवते. अनंत सामंत यांची ही पहिलीच कादंबरी आहे; परंतु पंचवीस-तीस कादंबऱ्यांची श्रेयनामावली डोक्यावर बाळगणाऱ्या अनेक आघाडीवरच्या व लोकप्रिय लेखकांच्या तुलनेतही ती सरस ठरेल अशी जबरदस्त आहे. नवेपणाच्या वा उमेदवारीच्या कुठल्याही खुणा या लेखनात नाहीत. वातावरणनिर्मिती, तपशिलातील वास्तवता, व्यक्तिचित्रे, संघर्ष आणि एक उच्चतर नैतिक भूमिका या सर्व दृष्टींनी ही कादंबरी लक्षणीय ठरेल.

'जहाजावर प्रथम चीफ स्टुअर्ड आणि नंतर कॅडेटशिप स्वीकारून नेव्हिगेटिंग ऑफिसर म्हणून सहा वर्षे सागरावर काढली,' एवढाच अनंत सामंत यांचा परिचय या कादंबरीच्या आरंभी देण्यात आला आहे, आणि ही त्यांची पहिलीच कादंबरी असल्याचाही खुलासा करण्यात आला आहे.

### तेलवाहू जहाजावरचे नाट्य

एम टी म्हणजे मोटर टँकर. यंत्रचलित द्रववाहक. मारू हा जपानी शब्द. त्याचा अर्थ जहाज असा. आयवा हाही जपानी शब्द. प्रेम– एकरूपता– चेतना इ. अर्थच्छटांचे रंग उधळणारा.

१ डिसेंबर १९७५ ते ४ जानेवारी १९७६ या पस्तीस दिवसांचा कालपट. एम टी आयवा मारू हे तेलवाहू जहाज. जुने. मोडकळीला निघालेले. समुद्रावरील प्रवासासाठी निकामी ठरलेले. फक्त नवे नाव देऊन केवळ फायद्याकडे नजर ठेवून ते समुद्रात उतरविण्यासाठी सिद्ध झालेली कॉर्डस शिपिंग कंपनी आणि नवे कोरे जहाज कंपनी घेत आहे असे खोटेच सांगून त्यासाठी केलेली कॅप्टन, इंजिनिअर, मेट, स्ट्युअर्ड, खलाशी वगैरेंची जमवाजमव. दोन वर्षे गोदीत पडून राहिलेल्या या भंगार जहाजाला अपुऱ्या स्पेअरपार्टनिशी नि सारखं रिपेअरिंगची गरज असलेल्या बॉयलर-इंजिननिशी चालवण्याचा कंपनी घाट घालते आणि तो प्रत्यक्षातही आणते. टँकर्समध्ये पाणी भरून तो साफ करून घेण्यासाठी ट्रायल दाखल निघालेल्या या जहाजाला हाँगकाँगवरून तसेच

चीनमधील शिंताव आणि शिंतावहून फिलिपिन्समधील बतानमार्गे पुनश्च हाँगकाँगला आणले जाते. या वीस दिवसांमधील जिवावरच्या साहसाचे, रुद्र निसर्गाचे, मानवी रागालोभांचे नाट्य वेगवेगळे रंगरूप धारण करून या कथासूत्रात जीव भरते.

कॉर्डस शिपिंग कंपनीचा एकूण कारभार, कमीत कमी खर्चात जास्तीत जास्त फायदा मिळविण्यासाठी तिने अमलात आणलेली धोरणे, खोटेनाटे सांगून जहाजासाठी जमवलेली हुशार, निवडक तंत्रज्ञ मंडळी आणि त्यांना एकमेकांशी झुंजवून निर्माण केलेले आव्हानात्मक वातावरण, हा या कथासूत्रातील एक दुवा आहे. खुद्द जहाज आणि त्याची अवस्था हा या प्रवासात मानसिक तणाव निर्माण करणारा दुसरा घटक– पूर्णतया निरुपयोगी अवस्थेतील भंगारात टाकलेली नौका आवश्यक तेवढ्याही दुरुस्त्या पूर्ण होऊ न देता लांब पल्ल्याच्या प्रवासासाठी पाठवण्यात धोका आहे याची सर्व संबंधितांना पक्की कल्पना असताना, ही नौका चालवण्याचे आव्हान स्वीकारणे हे अपुऱ्या शस्त्रानिशी रणांगणावर उतरण्याइतकेच धाडसाचे पण आत्मघातकी कृत्य असते.

प्रथमपुरुषी निवेदनाचे तंत्र या कादंबरीसाठी वापरण्यात आले आहे. निवेदकाचे नाव– लेखकाचे स्वतःचेच म्हणजे अनंत सामंत हेच ठेवण्यात आले आहे. तो या कादंबरीचा हीरो आहे असे म्हणता येणार नाही. काही घटनाप्रसंगांतील तो एक घटक असला तरी आयवा मारूवरच्या मानवी स्नेहसंबंधांच्या आणि निसर्गलीलांचा एक साक्षेपी साक्षीदार म्हणून त्याच्या निवेदनातील सचोटी नितळ-निखळ वाटते. मोडकळीला आलेल्या जहाजाचा प्रवास हेच या कादंबरीचे मुख्य सूत्र आहे आणि ते जहाज हेच जणू नायक-नायिका आहे. आपले बळी घेण्यासाठी सिद्ध. आपल्या इच्छापूर्तीसाठी माणसांना खेळवणारे, झुंजवणारे.

कॅप्टन रॉस. वय वर्षे साठ. निवृत्त होऊन आरामात जगण्याचे वय. पण या वयात या सडक्या, गंजक्या, पोलादी टिनपॉट ढिगाऱ्यावर कॅप्टन म्हणून रुजू होतो. पी ॲण्ड ओसारखी मातबर कंपनी सोडून. त्याचे कारण अनंत त्याला विचारतो. रॉसने दिलेले उत्तर या सबंध कादंबरीच्या अंतःसूत्राचा उलगडा करणारे आहे. 'असं म्हणतात, की पोलादाला जात नसते. पोलाद वितळणाऱ्या ज्वालांनाही जात नसते. पण त्या ज्वालांची धग सहन करत पोलादाला आकार देणाऱ्या माणसाच्या भावना त्याच्या मजबूत हातातून पोलादात मिसळतात. त्या पोलादी पिंजऱ्यात अडकलेल्या माणसांच्या इच्छा पोलादाला आकांक्षा देतात. तिच्यात जीव ओततात. सागराशी झगडताना, उन्हात करपताना, पावसात भिजताना, निसर्गातील महाभुतं तिचे व्यक्तिमत्त्व घडवतात. ती हळूहळू श्वासोच्छ्वास करायला लागते. तिच्याही मनात जगण्याची इच्छा जन्म घेते. माणसांच्या संगतीची आवड निर्माण होते. यू विल नॉट बिलीव्ह, पण स्वतःची माणसं ती स्वतः निवडते. जगाच्या कानाकोपऱ्यातून त्यांना खेचून आणते– आपल्यासारखी.'



अनुक्रमणिका

**वेचून आणलेली माणसे**

सेव्हन सीज– ओरायन तेलवाहू नौका 'आयवा मारू' हे नवे नाव धारण करून पुन्हा आपल्यात धुगधुगी आणून, चैतन्याची आस जागवते. कॅप्टन रॉस हा सेव्हन सीजचा पहिला कॅप्टन. तीस वर्षांपूर्वीचा. याच जहाजावर कॅडेट म्हणून काम केलेला अनंत सामंत आता सेकंड मेट नेव्हिगेटर म्हणून कार्यभार स्वीकारतो. त्याचाच जुना मित्र दीपक उपाध्याय, गनस्लिंगर, सेकंड इंजिनिअर म्हणून आणला जातो. फिटर म्हणून कधीकाळी तो ओरायनवर कामाला होता. आईच्या जबरदस्तीमुळे सागरी जीवनाची घृणाअसूनही समर सेनगुप्ता हा तरुण कोवळा पोर कॅडेट म्हणून रुजू होतो. फिलिपिनो डालीझे हा थर्ड मेट. वय पस्तीस. चीफ इंजिनिअर सिंग, चीफ ऑफिसर पॅट्रिक ॲडॅम्स, (तपकिरी डोळयांचा, धिप्पाड, रुबाबदार,) पन्नाशीतला पम्पमन जोन्स, चीफ स्टुअर्ड फर्नांडिस (काळा, बुटका, पोपटाच्यां चोचीसारख्या बाकदार नाकाचा!) बोसन (पासष्ट वय लहान. चणीचा, अरुंद खांद्यांचा, सुरकुतलेल्या चेहऱ्याचा, एका हाताने दोराला लोंबकळत जहाजाच्या भिंताडीवरलं ड्राफ्ट मार्क्स सहज रंगवणारा. सगळं कुटुंब समुद्रानं गिळलं तरी वैरी सागराचं बोट धरून ठेवणारा, मृत्यूची गाठ घेण्यासाठी आतुरलेला, स्क्रॅपयार्डमधील जहाजं म्हणजे थडगी समजणारा.) रेडिओ ऑफिसर कु वॉ चांद (चिनी बुटका, गुबगुबीत, गोल नाकाचा), स्टुअर्ड शास्त्रो आणि इतर कनिष्ठ अधिकारी, फिलिपिनो व चिनी खलाशी- असे हे बोटीवरचे जग.

या जगात दीपक उपाध्यायच्या नवपरिणित पत्नीची– उज्ज्वलाची– हजेरी लागते आणि त्यामुळे जसे जहाजावरच्या एकसुरी ब्रह्मचारी जीवनात नवे चैतन्य येते तसेच अनेक अनपेक्षित ताणतणावही निर्माण होतात. बोसन तर तिच्या पहिल्या दर्शनानंतर म्हणतो, "तिच्या डोळ्यात आग लागलेल्या समुद्राची धग आहे. ती धग सागरातच मिसळते. तो जाळ शेवटी सागरातच मिसळतो." बोसनला या जहाजावरच्या वाऱ्यात सारखा मृत्यूचा गंधच जाणवत असतो. सडक्या मांसाचा, गंजक्या लोखंडात मिसळलेला गंध.

भंगारात काढलेल्या या नौकेचा मॅग्नेटिक आऊट होता, ब्रिजवर जायरो बंद होता, डेक गंजला होता, पम्परूम सडली होती, बल्कहेड्सना भोकं पडली होती, पाइप फुटलेले होते, पाइप-लाइनचे व्हॉल्व्ज गंजून गेले होते, इंजिन्स बंद होती, जनरेटर्स, बॉयलर्स, मेन इंजिन, रडार, रेडिओ, साउंडिंग मशिन्स– सगळे काही बिघडलेले होते. परंतु कॅप्टन रॉस सेकंड इंजिनियर दीपकला सांगतो– तू बाथटबही चालवून दाखवशील अशी तुझी ख्याती आहे. आत्तापर्यंत तू नोकरी करीत होतास; पण ही नोकरी नाही, हा व्यवसाय नाही, ही खरोखर पैज आहे. या सुंदर पोलादी रचनेत माझ्या आशा गुंतल्या आहेत."

एका खलाशानं दुसऱ्या खलाशाला दिलेलं हे वैयक्तिक आव्हान दीपक स्वीकारतो. नोकरी म्हणून नाही– धाडस म्हणून. फक्त एका अटीवर– रिपेअर्सकरिता मागवलेलं प्रत्येक

उपकरण, पार्ट मिळायला हवं. ही अट यासाठी, की कॉर्डस् कंपनी दहा गोष्टी मागवल्या तर एक पुरवते हे दीपक जाणून होता.

– अर्थातच ही नौका दुरुस्त केली जाते, इंजिन्स चालू होतात, फुटके पाइप दुरुस्त होतात... आणि कोणाच्या ध्यानीमनी नसताना ती अचानक सफरीला निघते.

जहाजावरच्या त्या बंदिस्त मानवी जगातही हेवेदावे, स्पर्धा, लागेबांधे, रागलोभ फुलतातच. तशातच दीपक आपल्या खेडवळ पत्नीला एकदम मॉडर्न सोसायटी गर्ल–मॉडेल बनवण्याच्या महत्त्वाकांक्षेने पछाडलेला. बोटीला मॉडर्न करण्याबाबत त्याच्यावर मर्यादा असतात, पण पत्नीवर प्रयोग करण्याबाबत त्याचा तो मुखत्यार असतो. बोटीवरील ती फर्स्ट लेडी. तिच्या स्वागतार्थ पार्टी ठेवण्यात येते. दीपक तिला अगदी पारदर्शक पोशाख घालायला लावून पार्टीला आणतो. नृत्यासाठी अॅडॅम्स तिच्या कमरेभोवती हात घालतो आणि उज्ज्वलाच्या डोळ्यांतून आसवे गळू लागतात. कॅडेट सेनगुप्ता "स्टॉप इट" म्हणून चीफ ऑफिसरचा गळा पकडून मागे खेचतो. "परत तिला हात लावलास तर खून करीन तुझा!" म्हणतो. पुढच्या वादळी घटनांची ही नांदी ठरते.

अॅडॅम आणि डालीझे यांच्यातील समलिंगी संबंधही पुढच्या अनर्थाला खतपाणी घालतात.

प्रत्येक खलाशाचे प्रिय पात्र प्रत्येक बंदरावर असते या विधानातले सत्य गृहीत धरूनच शिंताव, बनात, मनिला येथील मुक्कामांची रसभरित वर्णने येतात. बतानमध्ये अनंतची प्रेयसी अॅना बॅसिलोना धुमाकूळ घालते तर मनिलातील साबून बाथला दीपक पत्नीसह हजेरी लावून शृंगारलीलांची झलक दाखवतो. त्याचा प्रभाव उज्ज्वलावर पडून ती आपल्या मोहपाशाने अनंतला झपाटू पाहते. तिच्या पूर्वजीवनातील काही चमत्कारिक घटना आणि विवाहोत्तर जीवन यांची एक वेगळीच संगती त्यातून मांडली जाते. दीपक–अनंत हे दोघे मित्र आणि उज्ज्वला यांचा त्रिकोण एका चमत्कृतिपूर्ण भावविश्वातील विकृत गुंतागुंत प्रकट करतो.

नैसर्गिक वादळे, संकटे ही सागरप्रवासात आढळणारच. मानवी रागलोभाची वादळेही काही कमी नसतात. सेनगुप्ताचा एका टँकरमध्ये सापडून मृत्यू होतो. त्याचे भूत अनेकांना दिसत राहते आणि बोटीवरील प्रत्येकाचेच मन भयकातर होते. तशातही कॅप्टन रॉस ख्रिसमसची पार्टी करण्याचा घाट घालतो आणि नृत्य रंगले असतानाच, अॅडॅम्स–डालीझे यांच्यात भांडण लागल्याने कडवटपणा वाढत जातो. जहाजावरची हवा सडलीय, 'द शिप इज सिक' अशी साऱ्यांची भावना होते.

चीफ ऑफिसर पॅट्रिक अॅडॅम्स नंबर वन सेंटर टँकमध्ये सापडतो. टाकीतल्या कुठल्यातरी पोलादी भागावर आपटून ठेचून त्याचं डोकं फुटतं. डालीझेने त्याला झिडकारल्यामुळे, त्याच्या समसंभोगाबद्दल वाच्यता केल्याने अॅडॅम्सला नैराश्याने घेरलेले असते. त्याची ही परिणती होती. डालीझे खिशातला चाकू काढून रॉसवरही चालून जायचा



अनुक्रमणिका

प्रयत्न करतो, परंतु रॉस तो प्रयत्न निष्फळ ठरवतो. 'किनारा गाठेपर्यंत तुझं तोंड दिसलं तर मरेपर्यंत बदडून काढीन!' असा दम भरतो. डालीझे त्या तिरीमिरीत मॅग्नेटिक कंपास कुऱ्हाडीने तोडून टाकतो. तशातच प्रचंड चक्रीवादळाची चिन्हे दिसू लागतात. रडार बंद असते. जायरो कंपास बिघडलेला. मॅग्नेटिक कंपासही मोडलेला. दिशा ठरवायची तरी कशी?... रेडिओ ऑफिसर स्पार्क व्हीडी झाल्यामुळे अस्वस्थ असतो. तो वेलियमच्या झोपेच्या गोळया चोरतो. तो गोळया घेऊन झोपला असता तर रेडिओद्वारे किनाऱ्याशी संपर्कसाधण्याचाही प्रयत्न अशक्य ठरला असता.

तशातच निकामी इंजिन्स चालू ठेवणे अवघड होते. पाण्याची उंची वाढते. शॉर्टसर्किट होण्याआधी किंवा बॉयलर- इंजिनमध्ये पाणी शिरण्याआधी इंजिन्स बंद करणे आवश्यक ठरते. हाँगकाँग बंदरातील कंट्रोल रूम या नौकेला बंदरात प्रवेश करू देण्यास नकार देते. बरीच हुज्जत घालण्यात येते. कशीबशी बोट थांबते....

अनंत सामंत या वादळी अनुभवचक्रात सापडूनही पुन्हा तसल्याच भंगारात निघालेल्या दुसऱ्या बोटीवर जाण्यासाठी प्रस्थान ठेवतो.

वास्तववादी तपशील, मानवी स्वभावाचे विविध नमुने, त्यातील बदलती नाती- या सर्वांचे एक विलक्षण रसायन या कथावस्तूत सिद्ध झाले आहे. लैंगिक व्यवहार, स्त्री-पुरुष संबंध यांबद्दलचा एक प्रौढ प्रगल्भ दृष्टिकोनही या कथानकात आढळतो.

अनंत सामंत यांची ही पहिलीच कादंबरी असली तरी ती नवखेपणाच्या कुठल्याही खुणा दाखवत नाही. रंजकतेकडे वा भडकपणाकडे जाण्याचा मोह एका मर्यादेत ठेवला तर मराठी कादंबरीक्षेत्रात ते एक अनुभव वैचित्र्यपूर्ण व संपन्न बहुढंगी दालन रुजवू शकतील असा विश्वास वाटतो.

(एम टी आयवा मारू : अनंत सामंत, मॅजेस्टिक प्रकाशन, प्रसाद चेंबर्स, गिरगाव, मुंबई ४. पृष्ठे ३८९, शंभर रुपये)

---

## साभार स्वीकार
### कादंबरी

१. **भैरवी**- फडके ना. वा., श्री विद्या प्रकाशन, २५०, शनिवार पेठ, पुणे ३०, १-१९८९, पृष्ठे-३१०. नव्वद रुपये.

२. **कोयला भई न राख**- भानगावकर सुलभा, चेतश्री प्रकाशन. १-१९८९, पृष्ठे-१४८, तीस रुपये.

३. **तांदळा**- द्रादशीवार सुरेश, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, १-१९८९, पृष्ठे-१४०. पन्नास रुपये.

४. **हाकुमी**- द्वादशीवार सुरेश, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, १-१९८९, पृष्ठे-१४०, पन्नास रुपये.

# कुसुमगुंजा : जी.ए. कुलकर्णी

## सामान्य माणसांच्या दुःखाचे चित्रण करणाऱ्या 'असामान्य' कथा

भालचन्द्र गुजर

मानवी जीवनातील अस्तित्वमूलक दुःखाचे चित्रण करणाऱ्या जी.एं.च्या यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या कथा आकाराने दीर्घ वा कादंबरीसदृश आहेत. माणसांची सनातन दुःखे ठळकपणे रेखाटन करणाऱ्या त्यांच्या कथांनी वाचकांना प्रत्येक वेळी अंतर्मुख केले, तर काही वेळा जीवनाचा पुन्हा एकदा नव्याने विचार करण्यास भाग पाडले. सामान्य माणसांच्या आयुष्यातील दुःखाचे चित्रण करणाऱ्या आकाराने लहान कथा जी.एं.नी लिहिल्या नसाव्यात असे वाटणे स्वाभाविक आहे. पण महाकवीची प्रतिभा आणि विचारवंताची चिंतनमयी प्रज्ञा लाभलेल्या जी.एं.नी अशा प्रकारच्या कथा लिहिल्या होत्या व त्या त्यांच्या दीर्घ कथांएवढ्याच प्रत्ययकारी होत्या हे 'कुसुमगुंजा'ने सिद्ध केले आहे. जी.एं.नी यापूर्वी रेखाटलेल्या 'निळयासावळया' कथाप्रदेशापासून 'कुसुमगुंजा'चा कथापरिसर दूरस्थ नाही, तर त्या लगतचाच आहे.

### सामान्यांच्या असामान्य कथा

'कुसुमगुंजा'त ग्रथित झालेल्या एकवीस कथांपैकी सतरा कथा 'सत्यकथा', 'दीपावली', 'मराठवाडा', 'धनुर्धारी', 'संदर्भ' या नियतकालिकांतून यापूर्वीच प्रसिद्ध झाल्या असून एक कथा अप्रकाशित आहे तर तीन कथा जी.एं.च्या ध्वनिफितीवरून घेण्यात आल्या आहेत. नियतीच्या अगम्य हालचाली शब्दांकित करण्याची असामान्य प्रतिभा लाभलेल्या जी. एं. च्या या सामान्य माणसांच्या आयुष्यातील लहानलहान प्रसंग चित्रित करणाऱ्या कथा सामान्य नाहीत; असामान्य आहेत.

प्रेमाची स्वप्नील आणि 'पर'त्त्वाचा स्पर्श लाभलेली भावना कोणता 'क्षुद्र' अंत गाठू शकते याचे चित्रण आठ पत्रांतून व्यक्त होते तेव्हा जी. एं. ची प्रयोगशीलता लक्षात येते. सुमारे पन्नास वर्षांपूर्वी 'सत्यकथे'त प्रसिद्ध झालेली 'क्षुद्र'ही कथा आहे. 'देवपूजा' या कथेत एका सत्त्वशील माणसाला त्याच्या उच्चशिक्षित मुलाकडून कशी अपमानास्पद वागणूक मिळते याचे हृदयद्रावक चित्रण आहे. 'लिरा'ही कथा कोवळया वयातील ताटातुटीने संपलेली भावतरल व्यथा व्यक्त करते. 'काळी आजी' हे शब्दचित्र आहे. एका निराधार वृद्धेच्या आयुष्यातील एकाकीपणा व भयाण वास्तव वाचकाला विषण्ण करते. 'अंधारातील हाक' या कथेत गरिबांची अगतिकता आणि धनिकांचे माणुसकीशून्य वर्तन येते. मात्र ते



अनुक्रमणिका






पारंपरिक पद्धतीने सांगितलेले नाही. 'वार', 'कमल' आणि 'अंधार' या लघुकथा प्रतीकात्मक आहेत. जीवनातील अटळ सत्ये सांगताना जी. एं. नी निसर्गप्रतिमांचा सूचक वापर केला आहे.

'चैत्र', 'बारसें', 'लग्न', 'सिनेमा' व 'गाऱ्हाणे' या पाच कथांतून ग्रामीण कौटुंबिक जीवनातील कौटुंबिक जीवनाचे चित्रण प्रामुख्याने येते. 'चैत्र' या कथेतील हळदीकुंकू प्रसंगी श्रीमंत बाईकडून दुखावली गेलेली गरीब स्त्री व हळदीकुंकू समारंभाची मजा लुटणारा तिचा मुलगा; 'लग्न' या कथेतील विवाहाचे वय उलटून चालल्याने संवेदनाशून्य झालेली तरुणी; 'बारसें' या कथेतील "आपलं बारसंही अशाच धुमधडाक्यात झालं असेल का?" हा प्रश्न विचारणारा बेवारस हणमा; 'सिनेमा'तील चित्रपट पाहण्यासाठी आतुर झालेला पण इच्छापूर्ती न झालेला शाळकरी मुलगा मधू आणि 'गाऱ्हाणे' मधल्या निपुत्रिक रमाकाकू, या व्यक्तिरेखा आपल्याला परिचित वाटतात. त्यांची दुःखे आपणापैकी प्रत्येकजणाने कधीतरी, काही प्रमाणात अनुभवलेली असल्याने या कथा वास्तवाच्या बऱ्याच जवळ जाऊन पोहोचतात.

'कुसुमगुंजा'त आकारमानाच्या दृष्टीने विसंगत वाटणारी एक दीर्घ कथा आहे. तऱ्हेवाईक वृत्तीच्या पण अभिजात अभिरुची असलेल्या, सकृतदर्शनी फटकळ वाटणाऱ्या पण माणुसकीचा ओलावा अंतर्यामी बाळगणाऱ्या, इंग्रजी साहित्य व चित्रपटांबद्दल ममत्व असलेल्या आणि जुन्या परंपरांविषयी ठाम अभिमान बाळगणाऱ्या एका वकिलाचे आयुष्य समर्थपणे उभे करणारी ही दीर्घ कथा म्हणजे एक उत्कृष्ट व्यक्तिरेखाटनच आहे. 'तपकिरी बीं', 'कधीतरीं', 'पिवळा पक्षीं' आणि 'निरोप' या कथा काव्याच्या प्रदेशात सहजपणे प्रवेश करतात.

### आशयाशी एकरूप भाषा

रत्नजडित अलंकारांप्रमाणे मनावर गारुड करणारी भाषाशैली हे जी. एं.च्या एकूणच सर्व लेखनाचे वैशिष्ट्य आहे. तेच 'कुसुमगुंजा'त पुन्हा एकदा प्रत्ययास येते. उदा.– 'आकाशातील चांदण्या मोजताना पायाखाली आपण मोगरीची फुले तुडवीत आहोत याचे तुला भानच राहत नाही.' . (क्षुद्र), 'पांढऱ्या पातळाचा लाल रेशमी पदर सूर्यास्ताचा तुकडा मागे राहिल्याप्रमाणे दिसत असून वाऱ्यावर फडफडत होता (कधीतरी), इ. अशी अनेक उदाहरणे सांगता येतील. उपमा-उत्प्रेक्षांनी अलंकृत झालेली ही भाषा मनावर अपेक्षित परिणाम घडवून आणते. वाचकांना चमकावून सोडणे हा या भाषेचा कार्यकारणभाव मात्र नाही. ही भाषा आशयाशी पूर्णपणे एकरूप आहे. आशय समर्थपणे पेलणे व वाचकांपुढे नेणे ही या भाषेची इतिकर्तव्यता आहे. ती आशयावर आक्रमण करीत नाही तर संवाहकाचे कार्य करते.

### आश्वासक 'निरोप'

प्रस्तुतच्या कथासंग्रहातील सर्वात लक्षणीय कथा म्हणजे 'निरोप'. ही कथा म्हणजे गद्य काव्याचा एक अविस्मरणीय नमुना आहे. जी. ए. ची लेखणी येथे कमालीची भावतरल झाली आहे. "सीमा ओलांडून पलीकडे जाण्याची वेळ येत आहे. पण मला नेण्यासाठी पताका लावलेला रथ येणार नाही. मी जात असता तुतारी निनादावी अगर मला येताना पाहून चौघडे वाजू लागावेत असे काही भव्य मी निर्माण केले नाही. माझा सर्व प्रवास धुळीतून अनवाणी पावलांनी झाला आहे. परंतु माझ्यासाठी लहान दिंडी उघडणाऱ्या द्वारपालांनो, मी हीनदीन दरिद्री होऊन तुमच्याकडे आलो नाही ही गोष्ट लक्षात असू द्या..." मृत्यूला सामोरे जाताना माणसाचा जीवनावरील विश्वास येथे समर्थपणे व्यक्त होतो. पुढे जी. ए. कळीकाळाला म्हणतात– 'काही झाले तरी माझ्या आयुष्यभर तू सांगाती सहप्रवास केलास. आता आपले मार्ग निराळे होत आहेत. अशा या अंतिम क्षणी तू मला मुक्त मनाने निरोप दे. कारण आता मी निघालो आहे. मला स्वच्छ निरंजन मनाने निरोप दे!' जी. एं. ची ही वाक्ये संकटग्रस्त माणसाला आश्वासकतेचे वरदानच ठरतील.– आणि मग अदृष्टाच्या अगम्य हालचालीमुळे जन्मांधाने अंधारवाटांवरून मार्गक्रमणा करावी तसा दुष्कर, वेदनामयी, मनाला यातनाघराची अवकळा प्राप्त करून देणारा सामान्यातील सामान्य माणसाचा जीवनप्रवास हा अदृष्टाच्या हालचाली जाणून घेण्याच्या दिशेने प्रकाशवाटेवरून केलेल्या निर्णायक वाटचालीसारखा ठरेल.

(कुसुमगुंजाः जी. ए. कुलकर्णी, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४. पृष्ठे १३१, पन्नास रुपये,

भालचन्द्र गुजर, २४/४ इंदिरा सदन, भिडे बाग, देवपूर, धुळे–४२४००२

---

## काव्य

१. पाऊसफुले– पत्की हेमकिरण, श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०, १-१९८९, पृ. ६३. साडेसत्तावीस रुपये.

२. सिंधुलहरी – पटवर्धन ल. म. हर्षल प्रकाशन, जुना पनवेल-ठाणा रस्ता, पनवेल ४१०२०६, २-१९८९, पृ. ७२. वीस रुपये.

३. एका पावसाळयात– शिरीष पै, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४. दु. आ. १९८९, पृष्ठे ३१, चाळीस रुपये.

४. मनमीरा– प्रा. सुकांत हिरेमठ, शिवगंगा प्रकाशन, ४१७ ए, शिवाजी पेठ, कोल्हापूर, १-१९८९, पृ. ४०, पंचवीस रुपये.

# मनस्वीः अश्विनी धोंगडे

## स्त्रीजीवनातील काही अंतर्वेधक क्षण

योगिनी वेंगुर्लेकर

'स्त्री-सूक्त' या कविता संग्रहासाठी १९८९ चे कुसुमाग्रज पारितोषिक पटकावलेल्या अश्विनी धोंगडे यांचा 'मनस्वी' हा पहिलाच कथासंग्रह.

संग्रहातल्या १९ कथांमध्ये मानाचे पान पटकावणारी 'मनस्वी' हीच कथा म्हणावी लागते.

जिद्दीनं अन्यायाविरुद्ध उभ्या राहिलेल्या एका स्त्रीची ही कथा आहे. मनस्वी आयुष्य जगतांना नवऱ्याशी फारकत घेतलेली ही तरुण स्त्री नि मातृहृदय यांचे सुरेख चित्रण या कथेत भेटते. आपल्या मुलीसाठी झुरणारी ती मानी स्त्री; पण आईपासून तुटलेली स्वतंत्र विचारांची तिची मुलगी, आपल्या मैत्रिणींच्या वर्तुळात प्रतिष्ठा राखण्यासाठी आईची भेटही नाकारते. हा भावनिक बुरखा अत्यंत हळुवारपणे रंगवला आहे.

मुलीचे तारुण्यात पदार्पण होणे ही घटना विलक्षण नाजूक. प्रत्येक मुलीच्या आईने काहीशा धास्तावलेल्या मनाने अनुभवावी अशी घटना. पण आईने तसला प्रश्न विचारताच ही मुलगी फाडकन चाबूक फडकावल्यासारखी म्हणते, "आई, हा प्रश्न तू विचारू नकोस. तुझा तो हक्क संपलाय." तेव्हा एका घटस्फोटित स्त्रीची होणारी विकल अवस्था, मुलीच्या नजरेतून ठरलेली तिची शून्य किंमत बघून, 'तिच्या हातातल्या अभिमानाच्या कुबड्या गळून पडल्या.' स्वतःचे स्वत्व जपत अन्यायाविरुद्ध ताठपणे उभी राहणारी स्त्री– तिला एवढी जबरदस्त किंमत मोजायला का लागावी, असा प्रश्न पडतो.

लेखिकेची भाषा-शैलीच गोष्टीवेल्हाळ कथेकरी बुवासारखी प्रत्ययकारी! पहिल्याच कथेतली किशोरी मुग्धा. तिचा उल्लेख होतो तो असा : 'पंख फुटावे तशी बागडत आली. माझं बालपण सामोरं यावं तशी दिसली... आरशात भेटल्यासारखी' (पृष्ठ ३)

स्वयंपाक, मुलं, घर, संसार या चौदा चौकड्यांच्या बंदिखान्यात कितीतरी कर्तृत्ववान हिरकण्या बाह्य जगातल्या संधींवर झडप घालता न आल्याने गारगोट्या ठरल्या आहेत. 'सांग, हे खोटं आहे?' या कथेत अशीच एक कैफियत आहे. ही स्त्री घरातल्या घरात पत्र लिहिते 'स्त्रीची शर्यत ही अडथळ्यांची शर्यत असते. मी पाण्यात आकंठ बुडून संसार केला आणि तू काठाकाठावरून पाण्याच्या शिंतोड्यांनी अंग जराही भिजवून न घेता! तुझं घर मी उभं केलं...'

स्त्रीमनाचे अनेक धागे आई, पत्नी, मुलगी या विविध खुंट्यांना ताणून बांधलेले



अनुक्रमणिका






असतात. या धाग्यांचीच तिला गुरफटून टाकणारी घट्ट वीण तयार होते. 'तळयात मळयात'मधील कथेतल्या नायिकेसारखी तिची स्थिती होते. नोकरीच्या चाकोरीत फिरत असलेली ही स्त्री आलेल्या संधी धुडकावून संसाराची चिंता वाहत राहते. ती मागे पळू बघते तेव्हा तिच्या घरच्या मंडळींना तिच्या घराकडे ओढ घेणाऱ्या मनाची दखल सुद्धा घ्यावीशी वाटत नाही.

आधुनिक मुक्त रसरशीत स्त्रीचे चित्रण 'अजून यौवनात मी' या कथेत आढळते. या कथेतली 'मी' ही एक प्रातिनिधिक आधुनिक स्त्री आहे. तिला संपूर्ण, सतेज, टवटवीत आयुष्य जगायचेच. तिला प्रत्येक सुंदर गोष्टीचा मोह आहे. अवघं आयुष्यच सजीव सुंदर करून जगण्याची तिला जबरदस्त ओढ आहे. या स्त्रीला संसारात जोड मात्र अरसिक पुरुषाची मिळाली तर तिचा संसार तीन पायांची शर्यत ठरेल का, असा प्रश्न वाचकाला पडतो.

'घसरगुंडी' या कथेत स्वतःच्या मुलीच्या तारुण्याची खुलावट बघताना मध्यमवयीन स्त्रीची होणारी भावनात्मक उलाघाल आढळते. नवऱ्याच्या अलिप्तपणाने कडवट झालेली स्त्री दुष्काळात झाडाच्या मुळांनी पाण्याचा शोध घेत जमिनीत खोल खोल जावं तशी प्रेमासाठी आसुसलेली असते. कुणीतरी आपली म्हणावं म्हणून धडपडत असते.

(मनस्वी– अश्विनी धोंगडे, दिलीपराज प्रकाशन पुणे २. चाळीस रुपये)

(योगिनी वेंगुर्लेकर, मातृकृपा, कमलेश सोसायटी, कोथरूड, पुणे.)

---

# पंचतारांकितः प्रिया तेंडुलकर

## चतुर आत्मरक्षक सावधपणा

---

**आशा मुंडले**

---

१९८९ मध्ये मी वाचलेल्या मराठी पुस्तकांत मला सर्वांत अस्वस्थ केलं प्रिया तेंडुलकर यांच्या 'पंचतारांकित' या पुस्तकाने. तसं पाहिले तर ते मला सर्वात आवडलेले पुस्तक नाही; पण एकाच वेळी समाधान आणि असमाधान यांचा विलक्षण अनुभव त्या पुस्तकाने मला दिला.

प्रियाचे लिखाण मी संधी मिळेल तेव्हा आवर्जून वाचते. कारण ती थोडे लिहिते पण अतिशय नेमक्या शब्दांत घटना, व्यक्ती, स्थळ यांबद्दलची स्वतःची अनुभूती ती व्यक्त करू शकते.

'पंचतारांकित' या नावाचा या पुस्तकातला लेख हा शोधपत्रकारितेचा उत्तम नमुना



अनुक्रमणिका






ठरावा. फक्त तसा ठरत नाही, कारण कायद्याच्या चौकटीत अडकू नये यासाठी ती हॉटेलचे नाव देत नाही. समाधान वाटते ते तिच्या स्वतःला झोकून देऊन अनुभव घेण्याचे आणि असमाधान वाटते ते याचे, की ती सगळेच लिखाण अशा एका आत्मनिष्ठ चतुर सावधपणाने करते की त्यातून अंगावर काही शेकू नये, स्वतःचे जीवन उन्मळून जाऊ नये. रुबीनावरच्या लेखातलं मित्राचे वर्णन याच प्रकारचे आहे. आणि वडलांबद्दलचेसुद्धा.

सारखे जाणवत राहते, की ती सांगते ते सर्व अगदी प्रामाणिकपणे सांगते आहे. स्वतःला त्यात ती मुलामा चढवत नाही. पण त्याचवेळी सतत लक्षात येते, की आत्मसुरक्षा भावनेची तिची जाण उपजतच खोल आहे. ज्याचा नंतर पश्चात्ताप व्हावा असा एकही शब्द ती लिहून जात नाही. ती धिटुकली आहे, धीट नाही.

अतिशय मोठा लेखक होण्याच्या आड याच सावधपणाचा अडसर येणार. पण तरीसुद्धा प्रियाचं लेखन मला महत्त्वाचं वाटतं, कारण तिची निरीक्षणशक्ती. आणि सहसा स्त्रिया बिचकतात त्याबद्दल बोलण्याची, तिथे पोचण्याची तयारी सर्वसाधारण मध्यमवर्गीय स्त्रीच्या कक्षा रुंदावण्यासाठी, क्षितिज लांब जाण्यासाठी प्रियाचं लेखन सुशिक्षित स्त्रियांनी, शहरी स्त्रियांनी आवर्जून वाचावं असं आहे. नाहीतरी विकत पुस्तक घेऊन वाचू शकणाऱ्या स्त्रिया एवढ्याच. लायब्ररीतून जे मिळेल ते वाचणारा वाचक कदाचित पंचतारांकितपर्यंत पोचणारही नाही. साठ रुपयाला एवढीशी पानं, असा विचार धंदेवाईक ग्रंथालयेच करतील.

प्रियाला स्वतःमध्ये जी भीती, आत्मविश्वासाचा अभाव, बुजरेपणा जाणवतो तो तर स्त्रियांना जवळचा वाटेलच; पण तिच्यामागे कुटुंब, विशेषतः वडील आणि बहीण ठामपणे असल्याने तिला काठावरून केव्हाही मागे येण्याची जी आर्थिक सुरक्षितता आणि भावनिक सवय आहे तीही त्यांना ओळखीची वाटेल. 'गेलेच नाही मी पुन्हा त्या कॉलेजात,' किंवा 'दिली सोडून मी ती नोकरी' किंवा 'थांबले मी गलिच्छ वस्त्यांचा विचार करायची' या प्रकारचे तिचे निर्णय अनेक सुखवस्तू स्त्रियांना मनापासून पटतील. त्या तसं जगतही असतील. प्रियाने ते नेमकं शब्दांत पकडलंय एवढंच. स्वतःच्या मर्यादा तिला छान समजतात.

समाधान वाटलं तिच्या शैलीबद्दल, लिहिण्यातल्या सच्चेपणाबद्दल, स्वतःला समजू शकण्याबद्दल.

असमाधान वाटलं की तिची मूळ ताकद कदाचित छाटली जाते आहे तिच्या चतुर आत्मरक्षक सावधपणामुळे.

शाळा पास होईपर्यंत समजा जरी ती खरोखरच बुजरी, अजागळ, बावळट असली (मला शंका वाटते) तरी पुस्तक संपेपर्यंत ती तशी राहिलेली नाही.

आता प्रियाचं लग्न झालं आहे. ती नव्या कल्पना टीव्हीवर, लेखनात आणते आहे. रेनकोट घालून पावसात फिरण्यापेक्षा ती अंग अंग भिजून जगली तर कदाचित अधिक

समाधान देणारं लिहील अशी मला आशा वाटते.

(पंचतारांकितः प्रिया तेंडुलकर, डिंपल पब्लिकेशन्स, मुंबई. साठ रुपये)

(आशा मुंडले, मयुरेश सोसायटी, पुणे ३८)

# लांडगा : राजेंद्र बनहट्टी

## दोन व्यक्तींमधील तणावांचे रसरशीत आलेख उभे करणाऱ्या कथा

माधव कर्वे

'समानधर्मा', 'खेळ', 'गंगार्पण' सारख्या कथासंग्रहांनंतर राजेंद्र बनहट्टी यांचा 'लांडगा' हा कथासंग्रह आला आहे. 'अखेरचे आत्मचरित्र' ही त्यांची कादंबरी तर आता हिंदीतही गेली आहे. 'लांडगा' प्रसिद्ध झाल्यापासून या समीक्षक-रसिकमान्य कथासंग्रहावर बरंच लिहिलं गेलं आहे. तेव्हा याच कथासंग्रहाकडे किंचितशा वेगळ्या अंगानं पाहण्याचा हा प्रयत्न आहे.

एखादा विषय कथेच्या आकारात मांडताना सुरुवात आणि शेवट यांच्यामधल्या अंतराचा विस्तार 'लघू' ते 'दीर्घ' इतकाच असल्यानं लेखकाला या दोन्ही टोकांबाबत परिणामकारकतेच्या दृष्टीनं सावध राहावं लागतं. किंबहुना अनुभवपरत्वे ही सावधगिरी लेखनातल्याच सफाईचा एक भाग होऊन जात असावी.

'लांडगा' कथासंग्रहात एकूण सात कथा आहेत. पहिल्या 'लेखकाचा जन्म' या कथेची सुरुवात 'नवले केव्हातरी उगवत असे' अशी होते. थेट एका व्यक्तिरेखेकडे नेणारी. याच पद्धतीनं 'ऐलपैल' कथेची सुरुवात होते. 'डॉ. चौबळ अचानक वारले.' आणखी एक व्यक्तिरेखा नावासकट अगदी पहिल्याच वाक्यात. संग्रहातल्या 'पिंजरा' कथेची सुरुवात 'बापूने नवी स्कूटर घेतली' अशी तर 'झीरो अवर्स' कथा 'श्रीकांतचे प्लेन रुटीन फ्लाईंग करून एअरफोर्स स्टेशनच्या तळावर उतरले त्या वेळी दुपारचे दोन वाजत होते' अशा प्रकारे होते. 'पिंजरा' कथेच्या पहिल्या वाक्यात आलेली स्कूटर पुढे कथेत आपल्याला बरंच फिरवून आणत राहते तर 'झीरो अवर्स'ची सुरुवात अशीच एकदम विषय-वातावरणात घेऊन जाते. त्यामानानं 'कुंपण' कथेची लांबी तुलनेनं कमी असली तरी सुरुवातीला जरा आढेवेढे घेते तर 'लांडगा' आणि 'किनारा' या कथांच्या सुरुवाती फार लांबचं अंतर काटायचं आहे हे ओळखून असल्यासारख्या दमादमानं पुढे सरकतात. आत उतरत जातात. 'लांडगा'ची सुरुवात 'सकाळी साडेनवाला डाक आली. घंटी वाजवून पोस्टमनने पत्रे लेटरबॉक्समध्ये टाकली' अशी साधीच पण कथेच्या शीर्षकाप्रमाणेच हूल देणारी अशी आहे.

त्या डाकेनं आलेलं 'पाचवं बंद पाकीट' भाऊराव उघडतात आणि तिथंच खऱ्या अर्थानं कथा उघडते. दरम्यानच्या काळात बनहट्टी वाचकांना भाऊरावांशी ओळख करून देतात. 'किनारा'ची कथा मुरलीगंज स्टेशनवर उभ्या असलेल्या '४१६ डाऊन समस्तीपूर पॅसेंजर' पासून होते, पॅसेंजरच्याच वेगानं पुढे सरकते आणि मध्येच अपघाती वळण लागून आकस्मिकतेच्या प्रवाहात सापडलेल्या जगदीश यादवची जगण्यातली अखेरची झुंज सुरू होते.

कथेची सुरुवात अर्थातच विषयाकडे नेणारी असली तरी कथेचा शेवट आशयाच्या दृष्टीनं अधिक महत्त्वाचा ठरतो. कदाचित कथेचा प्रवास तिथं न संपणारा असतो म्हणूनही. प्रभावी शेवट कथा संपवत असले तरी वाचकाच्या मनात तशी ती संपत नाही. तो एक चकवाही ठरू शकतो.

'लांडगा'मधल्या 'लेखकाचा जन्म', 'किनारा', 'पिंजरा', 'कुंपण', 'ऐलपैल' या कथांचे शेवट वर्तुळ पूर्ण करणारे आहेत तर 'लांडगा'मधील भाऊरावांना '...लालभडक शाईतले रांगडे अक्षर, हिंदी वळणाचे. ओबडधोबड...' असं पत्र दुसऱ्यांदा येतं आणि भाऊराव रिसीव्हर उचलून म्हणतात : 'हॅलो! पोलिस हेडक्वार्टर्स?' मग ते पुन्हा विचारतात... 'हॅलो!...हॅलो! पोलिस हेडक्वार्टर्स?'-कथा प्रश्नचिन्हानं संपते आणि हेच प्रश्नचिन्ह वाचकाला अगदी अखेरच्या क्षणापर्यंत ताणून ठेवण्याचं काम करतं, तर 'झीरो अवर्स' कथेची अखेरही प्रश्नचिन्हानं होते. दोन्ही कथांमधली प्रश्नचिन्हं आपलं काम चोख करून जातात.

व्यक्तिरेखाच पाहिल्या तर 'झीरो अवर्स' आणि 'पिंजरा' या कथा सोडल्या तर स्त्री व्यक्तिरेखा नाहीत. 'पिंजरा' कथा 'मालू'च्या प्रातिनिधिक नजरेतून आपल्यापुढे येते तर 'झीरो अवर्स'ची कथा 'श्रीकांत'पासून सुरू होत असली तरी संपते 'सुनीता'च्या मनातल्या प्रश्नानं 'बाळाचं नाव काय ठेवायचं?' बस्स. बाकी कथांमधल्या प्रौढ-तरुण व्यक्तिरेखा धकाधकीचं व्यावहारिक पातळीवरचं जगणं निभावून नेणाऱ्या आहेत.

म्हणजेच 'लेखकाचा जन्म' आणि 'ऐलपैल'मधले चोख प्रकाशक निवेदक किंवा 'झीरो अवर्स'मधला एअरफोर्समधला श्रीकांत किंवा 'लांडगा'मधले सामाजिक भाऊराव, किंवा 'किनारा'मधला सर्व्हेयर जगदीश किंवा अगदी 'कुंपण'मधला बंगलेवालाही.

राजेंद्र बनहट्टींच्या कथांमधलं वेगळेपण या निरनिराळ्या क्षेत्रांमधल्या व्यक्तिरेखांमधून येतं. कथेतलं निवेदन त्यात्या पेशाचे, व्यवसायाचे तपशील उभे करत व्यक्तिरेखा, कथा आकारबद्ध करत वरवर येत राहतात.

यातल्या बऱ्याचशा कथा त्या त्या क्षेत्रांमधल्या संबंधांच्या, त्यातून येणाऱ्या तणावांच्या पायावर उभ्या राहतात.

'लेखकाचा जन्म' आणि 'ऐलपैल'मधल्या प्रकाशक निवेदकाचे संबंधित व्यक्तिरेखेशी एका मर्यादेपर्यंत व्यावहारिक पातळीवरचेच रोखठोक संबंध असतात. हा व्यवहाराचा पडदा वर सरकतो आणि त्या व्यक्तिरेखेचं अंतरंगही प्रकट होतं.

'लांडगा' मधल्या भाऊरावांना त्यांच्या सामाजिक कार्यातून उभ्या राहिलेल्या एका ताणाला सामोरं जावं लागतं आणि त्यांची मृत्यूच्या भेडसावणाऱ्या सावल्या चुकवण्याची धडपड सुरू होते. 'किनारा' कथा मात्र तशी प्रतीकसंपन्न असली तरी जगदीशच्या मृत्यू टाळण्याच्या शारीरिक संघर्षावरच रोख ठेवते. प्रवाही वर्णन ही 'किनारा'ची ठळक बाजू.

थेटपणा हे या कथांचं वैशिष्ट्य कथांच्या शीर्षकांमधूनही दिसतं. 'कुंपण', 'किनारा', 'लांडगा' ही शीर्षकं कथेच्या आशयाच्या शक्यता सूचित करणारी अशीच आहेत.

म्हणूनच राजेंद्र बनहट्टी यांचा हा कथासंग्रह महत्त्वाचा ठरतो.

(लांडगा– राजेंद्र बनहट्टी, श्रीविशाखा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १६०. साठ रुपये)

(माधव कर्वे, ९, मनमोहन सोसायटी, कर्वेनगर, पुणे ५२)

---

## चरित्र

* **आनंद लहरी**– गोपालकृष्ण स्वामी नाईक मुद्रण प्रकाशन, हुपरी– ३, १-१९८९, पृष्ठे– २४८, पंचवीस रुपये.
* **वीस चोक ऐंशी**– नरुभाऊ लिमये, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३०, १-१९८९, पृष्ठे ३६८, साठ रुपये.
* **जगद्गुरू आद्य शंकराचार्य**– गजानन जोहारी, सुरेश एजन्सी, २०५, शुक्रवार पेठ, पुणे २, १-१९८९, पृष्ठे १३२ वीस रुपये
* **विजन आणि सर्जन**– (गजानन माधव मुक्तिबोधांची चरितकथा) संपादक– द. पं. जोशी. मराठी साहित्य परिषद, इसमिया बाजार, हैद्राबाद २७ १-१९८९ पृष्ठे १७८ पुरवणी ५० रुपये

---

## इतर कथा

१. **संपूर्ण श्रीकृष्ण कथा**– श्री. ज. जोशी, सन पब्लिकेशन, पुणे. १-१९८९, पृष्ठे-६४. संच शंभर रुपये.

२. **संपूर्ण ग्रिमच्या कथा**– (१ ते १५ भाग) सुमती पायगावकर. सन पब्लिकेशन, पुणे ३०, २-१९८९. संच सव्वादोनशे रुपये.

३. **होशियार**– गोपाळ गोरवडकर, नवरचना प्रकाशन, रूम नं. ९. बावुशेट चाळ, डोंबिवली (पूर्व) ४२१०२०१, १-१९८९, पृष्ठे १२८, तीस रुपये.

---

# स्वा. सावरकर- एक रहस्य : डॉ. गोखले

## मूलभूत मानवी प्रेरणांच्या आधारे घेतलेला शोध

सुधाकर देशपांडे

स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या जन्मशताब्दी वर्षापासून त्यांच्या जीवन-कार्याचा, वाङमय-विचारांचा, तत्व-तत्त्वज्ञानाचा परामर्श घेणारे अनेक ग्रंथ सारखे प्रसिद्ध होत आहेत. सामाजिक जीवनाच्या सर्वच क्षेत्रात प्रभाव गाजविणाऱ्या आजच्या राजमान्यता-राजाश्रयाच्या युगात त्यापासून पूर्णतः वंचित असलेल्या सावरकरांवर अशी प्रचंड ग्रंथरचना व्हावी हे नाही म्हटलं तरी विशेष सूचक ठरतं. सावरकरांच्या अद्‌भुतरम्य जीवनकार्याचं प्रज्ञावंतांना-प्रतिभावंतांना आकर्षण वाटणं जितकं स्वाभाविक तितकंच साहजिक म्हणता येईल सावरकरी विचारवैभवानं विचारवंतांना सारखं खुणावत राहणं.

सावरकर हा द. न. गोखले यांच्या प्रदीर्घ चिंतनाचा विषय. 'सावरकर लाखातलं नव्हे तर कोटीतलं' व्यक्तित्व. त्या विलक्षण व्यक्तित्वाचे 'मूल स्रोत' आपल्याला सापडले आहेत असे त्यांच्या प्रज्ञा-प्रतिभेला भावल्यावरूनच त्यांनी त्या समग्र व्यक्तित्वाचे रहस्य उलगडण्याचा प्रयत्न केलेला आहे. हा ग्रन्थ सावरकर चरित्र कथन नाही तसेच तो सावरकरांच्या तत्त्वविचारांची निर्भेळ चिकित्साही नाही. चरित्रातून होणारे व्यक्तित्व दर्शन केवळ पर्यायाने होते, म्हणून व्यक्तिविमर्शाद्वारे ते प्रत्यक्ष घडविण्याची लेखकाची भूमिका असून तशी स्पष्ट नोंद प्रस्तावनेत केलेली आहे.

'असामान्य व्यक्तित्व' ह्या पहिल्याच प्रकरणात गोखल्यांनी सावरकरांच्या अद्‌भुतरम्य व्यक्तित्वाचे रहस्य मूल स्रोताच्या अनुषंगाने उलगडण्याचा प्रयत्न केलेला आहे. सावरकरांची आत्मसमर्पणाची नि आत्मप्रस्थापनेची जन्मजात प्रकृती, त्यांची प्रबळ कर्तव्यभावना नि त्यावर पोसली गेलेली त्यांची प्रत्याघाती प्रवृत्ती, सावरकरांची अदम्य स्वातंत्र्याकांक्षा नि अविचल युद्धप्रेरणा, त्यांना सुष्टपुष्ट करणारी जिज्ञासा, तिचा पाठपुरावा करणारा व्यासंग, त्याद्वारे परिप्लुत झालेली त्यांची प्रतिभा, ह्या सर्व मूल स्रोतांची सोदाहरण मांडणी करीत गोखले सावरकरी व्यक्तिमत्त्वाचे वेधरहस्य उलगडताना दिसतात. सावरकरांचं सारं व्यक्तित्व म्हणूनच रोमॅण्टिक असूनही वास्तवाशी नातं ठेवून राहत असे, असं प्रतिपादन केलं आहे.

गोखल्यांना सावरकरांच्या 'व्यक्तित्वाचं गौरीशंकर' दिसतं ते त्यांच्या प्रज्ञेत. सावरकरांची 'अतिप्रवणता' सहज असली तरी त्यांची 'आत्मप्रवणता' अधिक प्रबल असल्याचं त्यांना जाणवतं. म्हणून सावरकरी तत्त्वज्ञानाचं मूळ त्यांच्या वस्तुनिष्ठ



अनुक्रमणिका






बुद्धिवादापेक्षा त्यांच्या उपजत प्रकृतिधर्मात आहे, असं ते म्हणतात. सावरकरांच्या इतिहासलेखनाचे मूळ ह्याच आत्मप्रवणतेत आहे असे ते सांगतात. गोखल्यांचं प्रतिपादन पटो वा न पटो, परंतु ते विचारांना चालना देतं.

'काही व्यक्तिविशेष' ह्या प्रकरणात येसूवहिनी, यमुनाबाई (माई), मॅडम कामा आदि व्यक्तिविशेष नि इंग्लंड, अंदमान, रत्नागिरी आदी स्थलविशेषांच्या द्वारा सावरकरी व्यक्तिविशेषावर प्रकाश टाकलेला आहे. 'हुतात्म्यांचा हवनमंत्र' ह्या प्रकरणातून बालवयीन प्रतिज्ञेपासून आत्मार्पणापर्यंत सूक्ष्मातिसूक्ष्म छटांसह सावरकरांच्या व्यक्तित्त्वाचं स्पष्टीकरण होतं. सावरकरांच्या जीवनाचा नि व्यक्तित्त्वाचा एक अविभाज्य असा हिंदुत्वाचा विचार पूर्वार्ध-उत्तरार्धातून साकारतो. 'मृत्युंजयाची कवच कुंडले' नि 'बंडनमिश्राचा सापेक्षतावाद' ही दोन प्रकरणे तुटक वाटतात. लेखकालाही त्याची जाण दिसते. तशी नोंद प्रस्तावनेत केलेली आहे. ही प्रकरणं एकूण रहस्य समजून घेण्यासाठी एका मर्यादेत उपयुक्त ठरतात. संपूर्ण ग्रंथात पहिलं प्रकरण पायाभरणी करतं तर 'तत्त्व-विचार' नि 'यश नि महत्त्व' ही दोन प्रकरणं कलशाची जागा घेतात.

स्वातंत्र्यवीर सावरकर म्हणजे सर्वच दृष्टींनी मोठं वादळी व्यक्तिमत्त्व. अशा व्यक्तिमत्त्वाबाबत भक्तानुयायी प्रत्येकच पैलूचं, मताचं, विचाराचं कौतुक करताना, हिरीरीनं समर्थन करताना आढळतात तर विरोधक केवळ छिद्रान्वेषी वृत्तीनं नेमक्या असल्या नसल्या उणिवांवर बोट ठेवून दोषदिग्दर्शन करताना सापडतात. गोखल्यांच्या ग्रंथात असा प्रकार आढळत नाही हा त्यांच्या विवेचन शैलीचा नि चिकित्सापद्धतीचा विशेष. निर्मळ विवेचकाच्या भूमिकेतून त्यांनी सावरकर व्यक्तिविमर्श साधला आहे. गोखल्यांच्या लिखाणात आक्षेपकांना उत्तर आहे, भक्ताच्या भाबडेपणाला सावधानतेचा स्पर्शही आहेच आहे. तसेच त्यांच्या शैलीत आवेश आहे परंतु तो विवेकाची लक्ष्मणरेषा ओलांडीत नाही. आवेश आहे परंतु तो विवशतेच्या सीमेला भिडत नाही.

ग्रंथवाचनानंतर मतभेद, मतभिन्नता संभवतेच संभवते, परंतु ग्रंथ परिचयात ते अनावश्यक. 'स्वातंत्र्यवीर सावरकर, एक रहस्य' सावरकराच्या व्यक्तित्वाचं समन्वित आकलन घडवितं यात मात्र संशय नाही. यातील 'व्यक्तिविमर्श' मनाला स्पर्श करून मस्तिष्कात आंदोलनं निर्माण करतो नि ह्याच दृष्टीने लेखकाचा प्रयत्न गौरवार्ह नि अभिनंदनार्ह ठरतो.

सावरकरांना शोधणाऱ्या सहृदय जिज्ञासूंना ग्रंथ अर्पण करण्यात लेखकाने विलक्षण सूचकता प्रकट केलेली आहे.

(स्वा. सावरकर– एक रहस्य. डॉ. द. न. गोखले. मौज प्रकाशन, मुंबई. १२५ रुपये)

(सुधाकर देशपांडे, ६ विद्यानगर, नांदेड)

# नेताजी- वि. स. वाळिंबे

## माहितीपूर्ण रंजक अनुबोधपट

म. मो. केळकर

सुभाषचंद्र बोस हे एक प्रखर ध्येयवादी आणि परखड व्यवहारवादी नेतृत्व. वि. स. वाळिंबे यांच्या नेताजी या चरित्रात्मक कादंबरीच्या वेष्टनावर नमूद केल्याप्रमाणे १५ ऑगस्ट १९४७ या दिवसावर इतर कोणापेक्षाही सुभाषबाबूंचा अधिकार अधिक होता. हल्लीच्या पिढीला हा काळ, ही व्यक्तिमत्त्वे आणि त्यांचे कार्य ही फारच अपरिचित आहेत. ज्यांना परिचित आहेत त्यांनाही तपशील माहीत असेलच असे नाही. या दृष्टीने हे पुस्तक उपयुक्त आहे.

नेताजींच्या जीवनपटाची जन्मापासून सरधोपट सुरुवात न करता एका नाट्यमय पण क्रांतिकारक घटनेने सुरुवात करून सुभाषबाबूंच्या (बाबू या वृत्तीची मात्र सुभाषचंद्रांनी खिल्ली उडवली आहे. (पृ. ९९) जीवनाचे प्रत्ययकारी दर्शन घडवले आहे.

आय. सी. एस.ला बसावे की नाही अशा दोलायमान अवस्थेत सुभाषचंद्र इंग्लंडला गेले. तेथील स्वदेश, स्वकीय यांच्याबद्दल स्वाभिमान प्रकट करणारे प्रसंग सुरेख मांडले आहेत. आय. सी. एस.ची पदवी नाकारणे हा या साऱ्या घटनांचा कळस. स्वातंत्र्य मिळते रणक्षेत्रावर, धर्मक्षेत्रावर झडतात ती प्रवचनं '(पृ. २४) या वाक्यात त्यांचे राजकीय तत्त्वज्ञान साठवलेले आहे. दलित समाजाकडे आपले अद्याप म्हणावे तसे लक्ष गेलेले नाही.' (पृ. ३७) या वाक्याने आणखी एक पैलू स्पष्ट होतो. 'सगळेजण घरासाठी, मग देशासाठी कोण? (पृ. ४३) हा प्रश्न आजही तेवढाच उत्कट वाटण्यासारखा आहे.

सुभाषांचा पिंड तसा तत्त्वचिंतकाचा. ध्यानधारणेची, सामाजिक कार्याची आवड. प्रलयंकर पावसानंतर पूरग्रस्तांच्या मदतीसाठी दारोदार ते अक्षरशः भीक मागत हिंडले. घराचा विरोध सहन करून (पृ. ६२) जातील तिथे त्यांनी आपल्या विचारांचा आणि व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटवला. कलकत्त्याचे महापौरपद लाभल्यावर प्रथम कर्मचाऱ्यांना खादीचा गणवेष दिला. (पृ. ६४) महापौरपद काय किंवा काँग्रेसचे अध्यक्षपद काय,— त्यांना सहजासहजी कधीच लाभले नाही.

तुरुंगवास तर १५/२० वेळा झाला. त्यातला एक आजारपणातच घडला. आजारही क्षयासारखा. शेवटी त्यांना प्रकृतीसाठी स्वित्झर्लंडला हलवले. तिथेही इंग्लंड व जर्मनीत जायला बंदी. भारतीय स्वातंत्र्य हा एकच ध्यास असलेल्या सुभाषचंद्रांनी ह्या वास्तव्याचाही तसाच उपयोग करून घेतला. हिटलर, मुसोलिनी या दोघांनाही भेटलेले सुभाषचंद्र हे

एकमेव भारतीय असावे.

येथपर्यंत कथानक आणून नंतर लेखक सुभाषचंद्रांच्या बाल्याकडे वळला आहे. हे तंत्र प्रभावी आहे असे वाटते. व्यक्तिमत्त्वाचे प्रचंडत्व जाणवल्यावर मग त्यांच्या बाल्याचे कुतूहल अधिक वाढते. सुरुवातीस तरी आध्यात्मिक उन्नती आणि समाजसेवा हेच सुभाषांचे ध्येय होते. सुखासीन आयुष्याचे त्यांना कधीच आकर्षण वाटले नाही. (पृ. १०९) विवेकानन्द, अरविंद यांचा त्यांच्यावर प्रभाव होता. पण अखेर राहिला तो चित्तरंजनदास यांचाच प्रभाव. म्हणून अखेर आढळतात ते संपूर्ण स्वातंत्र्यवादी सुभाषचंद्र. संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी काँग्रेसचे अध्यक्ष मोतीलाल नेहरू यांनाही पसंत नव्हती. (पृ. १४५) आणि हे कळताच सुभाषचंद्रांनी त्यांच्या कार्यकारिणीचा राजीनामा दिला.

नेहरू आणि सुभाष तसे वृत्तीने मूलतः समान; पण गांधीजींचे वजन नेहमी नेहरूंच्या पारड्यात पडल्याने नेहरू-सुभाष यांच्यात दुरावा निर्माण झाला. इतका, की सुभाषना हुकुमशहा म्हणणारे पहिले नेहरूच (पृ. २९४). तोच प्रकार सरदार वल्लभभाईंचा. मार्च १९३१च्या कराची अधिवेशनाचे अध्यक्ष वल्लभभाई पटेल यांनी सुभाषचंद्रांचे नाव कार्यकारिणीतून गाळले (पृ. १५९). आजारी सुभाष युरोपला निघाले तेव्हा गांधीजींनी ओळख करून देणारी चिठ्ठीही दिली नाही (पृ. १६७). निःशस्त्र भारत गांधीजींनी समर्थपणे एकत्र आणला व लढा दिला याबद्दल सुभाष यांना आदर आहे; पण इंग्रजांच्या बाबतीतले त्यांचे नरमाईचे धोरण सुभाषना आवडले नाही. म्हणूनच 'गांधीजी आता अडगळ झाले आहेत'. (पृ. १७९) असे ते म्हणत. युरोपमधील वास्तव्यात त्यांनी लिहिलेल्या इंडियन स्ट्रगल या पुस्तकाने त्यांना खूप प्रसिद्धी आणि साथीदारही लाभले.

१९३८चे हरिपुरा अधिवेशन हा सुभाषचंद्राच्या जीवनातला एक अत्युच्च क्षण. ते अध्यक्ष होते. त्या भाषणाच्या संदर्भातील 'नेते वरून लादायचे नसतात, खालून निवडायचे असतात' (पृ. २४३) हे वाक्य आजही लागू आहे.

हे महात्माजींना शोभले नाही हे प्रकरण तत्कालीन राजकीय परिस्थिती स्पष्ट करते. गांधी, नेहरू, वल्लभभाई, पट्टाभि सीतारामय्या, जयप्रकाश हे सारे, विरुद्ध सुभाष असा हा लढा आहे. त्यात सुभाषचंद्र कितीतरी अधिक उठून दिसतात. सुभाषबाबू अध्यक्ष म्हणून निवडून आल्यावर काही झाले तरी सुभाषचंद्र या देशाचे शत्रू नाहीत, (पृ.२६४) असे गांधीजी म्हणाले! त्रिपुरी काँग्रेसचे सुभाष अध्यक्ष असूनही हरिपुऱ्याची शान तिथे नव्हती ती गांधींच्या असहकारामुळेच. जयप्रकाशांनीही ठराव मांडताना 'आंदोलन' त्यातून गाळले (पृ. २७३) व गोविंद वल्लभपंतांनी ठराव मांडताना राजकोटला उपोषण करणाऱ्या गांधींची संमती आधी घेतली. (पृ. २७३) रवींद्रनाथांची सूचना मान्य करतानाही गांधींचा अट्टाहास कायम होतो. (पृ. २८६)

प्रेसिडेन्सी तुरुंगातून शरदबाबूंना लिहिलेल्या पत्रात सुभाषचंद्रांनी म्हटले आहे : 'मनात येते ते एवढेच, की स्वराज्य मिळाल्यानंतर, इतक्या क्षुद्र वृत्तीच्या, सूडबुद्धी



अनुक्रमणिका

बाळगणाऱ्या आणि कसलाही विधिनिषेध नसलेल्या या लोकांच्या हातात सत्ता गेली तर देशाचे काय होईल? (पृ. ३११) केवढे भविष्याचा वेध घेणारे उद्गार!

युद्धात अडकलेल्या इंग्लंडला खिंडीत गाठून स्वराज्याचे माप पदरात पाडून घ्यायचे हा सुभाषचंद्रांचा निर्धार होता. गांधीजींना मात्र 'ब्रिटिशांना असे अडवणे योग्य नव्हे' असे वाटत होते. इतर देशांचे साहाय्य घेण्यासाठी घराच्या स्थानबद्धतेतून निसटायचे सुभाषचंद्रांनी ठरवले. शरदबाबू, शिशिर यांची त्यांना चांगली साथ लाभली. हा सारा इतिहास एखाद्या अद्भुतरम्य कादंबरीसारखा मुळातूनच वाचायला हवा. मी चाललो, तुम्ही जा! कलकत्ता ते पेशावर, पेशावर ते काबूल व पुढे रशियामार्गे काबूल ते जर्मनी आणि अखेर जर्मनी ते जपान, मलाया, सिंगापूर, ब्रह्मदेश हा अद्भुत प्रवास आणि त्यातून जाणवणारा सुभाषबाबूंचा साहसवाद! मुसलमानांचेही लाभलेले सहकार्य, जिवास जीव देणारे साथीदार, राजकीय स्थित्यंतरे, लोकांचे प्रेम या साऱ्या गोष्टी प्रकर्षाने जाणवतात. २३.१.४५ या त्यांच्या वाढदिवसाला 'आझाद हिंद फौजे'साठी लोकांनी त्यांची सुवर्णतुला केली त्या वेळी दीडशे किलो सोने जमले होते (पृ. ४७१) रशिया, जर्मनी, जपान, इटली या साऱ्यांनी त्यांना एकमुखी सक्रीय पाठिंबा दिला यातच त्यांचे अलौकिकत्व आहे. युद्धात माघार घ्यावी लागली तरी सैन्य सुखरूप परतल्यावरच सुभाषचंद्र निघाले! १५ ऑगस्ट ४५ लाच त्यांनी सांगितले, 'हिंदुस्थान स्वतंत्र होणारच!' (पृ. ५०७) प्रसन्न, ओघवत्या शैलीने पुस्तक वाचनीय झाले आहे, मात्र शैलीचा तिरकसपणाही मधूनमधून जाणवतो.

उत्तम स्वयंपाक करणारे, उत्तम लेखक, उत्तम वक्ता, उत्तम संघटक, उत्तम समाजसेवक, उत्तम तत्त्वचिंतक आणि व्यवहारवादी निर्भीड स्वातंत्र्यवादी असे हे सुभाषचंद्रांचे उत्तुंग व्यक्तिमत्त्व! वैयक्तिक त्यागाला तर सीमाच नाही. प्रेमाच्या नाजुक गुंत्यातही ते अखेर अडकले व एमिलीशी विवाह केला (पृ. ४०२). पण नंतरच्या प्रवासात ही बाब त्यांनी कोणालाही कळू दिली नाही.

लेखकाने अनेक पत्रांचा आधार घेतलेला आहे असे दिसते. कारण अवतरणेच अवतरणे सर्वत्र आढळतात. या साऱ्यांची संदर्भसूची लेखकाने दिली असती तर बरे झाले असते.

मुंबईत असताना श्री. नाथालाल पारिख यांच्याकडे सुभाषचंद्र उतरले असताना म्हणाले होते-'आपण विमानात बसलेलं असावं, विमान खूप वर गेलेलं असावं आणि अचानक ते खाली कोसळावं. मागे काहीही राहू नये, सगळ्याची राख झालेली असावी. असा मृत्यू मला पसंत आहे. (पृ. ३०७) नियतीने तेच खरे केले! नियतीने तेवढी इच्छा पुरी केली नसती तर... आज भारताचे कोसळते विमान पाहण्याचे नशिबी आले नसते.

(नेताजीः वि. स. वाळिंबे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ५६०. दीडशे रुपये

(म. मो. केळकर, समर्थ कॉलनी, जळगाव २)

# एक अविस्मरणीय मामा : महांबरे
## गोष्टीवेल्हाळ व्यक्तिमत्त्व

ज्योती जोगळेकर

मामा म्हणजे भार्गवराम विठ्ठल वरेरकर. हे नाटककार वा खासदार म्हणून जितके गाजले त्यापेक्षा कितीतरी पटीने गप्पिष्ट वा थापाड्या म्हणून जास्त गाजले. त्यांचे कितीतरी नातू, भाचे होते. ती एक खट्याळ, खोडसाळ व्यक्ती होती. त्यांचा संचार रेडिओ, सिने-स्टुडिओ, वर्तमानपत्र कचेऱ्या, काँग्रेस हाऊस, तमाशा, थिएटर असा दाही दिशांनी चालू असायचा. पुड्या सोडण्यात ते पटाईत होते. ते जिथे जायचे तिथे गप्पांचा अड्डा आपोआप तयार व्हायचा. विडीहून त्यांना एक जबरदस्त व्यसन होते, अन् ते म्हणजे माणूस. ते समाजातील सर्व थरांतून सहजपणे वावरत. जितक्या सहजतेने ते टॅक्सीवाल्याशी बोलत तितक्याच सहजतेने ते पंडित नेहरू वा राधाकृष्णन यांच्याशी बोलत. त्यांच्या अड्ड्यावर कोट्या, प्रतिकोट्यांची रेलचेल असायची.

वार्धक्याला केवळ केस पांढरे करण्याची परवानगी देऊन ते तरुणच राहिले होते. मामा मालवणचे. ते रत्नागिरीला पोस्टात नोकरीला होते. म्हैसूरच्या हिज हायनेसना– 'हिज हेवीनेस : द रोलर ऑफ म्हैसूर' म्हणायला ते कमी करीत नसत. विडीच्या तलफेइतकीच एखादे कल्पित सत्य म्हणून सांगायची तलफ त्यांना अनावर व्हायची. वार्धक्याची सर्व लक्षणे अंगावर असूनही उद्याचे बेत आखायची तरुण वृत्ती त्यांची शेवटपर्यंत कायम होती. त्यांचा पत्ता सांगताना ते सांगायचे : मामा वरेरकर, बाँबे. त्यांच्या काळी मामा सोडून केवळ लेखनावर दुसरा कुठलाही लेखक पोट भरीत नव्हता. कुणी चहाघेणारा : नसेल तर ते आत सांगत 'एकाला दूध दे–हा बच्चा आहे.' धूम्रपान करू नये ही रंगपटातील सूचना मामांसाठी नसे. नाटककार म्हणून त्यांचे कार्य अफाट होते. एखादी खानावळवाली बाई जशी विचारते– जेवायला किती माणसे आहेत ते सांगा– रांधून देते, तसे ते नाटकवाल्या मालकांना सांगत, "इंग्लिश समजायला मी का विद्वान आहे? इंग्लिश डज नॉट कम टू मी" हे त्यांचे उद्‌गार. जयराज हा मामांचा मुंबईच्या ट्रामचा प्रवासी दोस्त. गप्पिष्ट मामांचे सर्व साहित्य डिक्टेट केलेले होते. त्या दृष्टीने त्यांचे साहित्य म्हणजे वाचकांशी एक प्रकारच्या गप्पाच होत. मामांना एकदा एका हिन्दी साप्ताहिकाच्या प्रतिनिधीने विचारले, "मामा," तुमच्या दीर्घायुष्याचे रहस्य काय?" तेव्हा मामा म्हणाले, "घ्या लिहून. अहो, तिकडे स्वर्गात असलेली माणसे म्हणत असतील– ही ब्याद इकडे नको!" लहानपणी त्यांची तब्येत २/३ डॉक्टरांनी तपासून विमा उतरवायला ते लायक

नसल्याचे सांगितले होते. त्यांना अनफिट ठरविणारे डॉक्टर्स मेले. ते मात्र ७१व्या वर्षीही जिवंत होते. त्यांचे कुपथ्य हेच पथ्य होते.

त्यांची भाषणे नेहमीच रंगतदार होत. त्यांना संगीताची जाण होती. पत्रलेखन हाही त्यांचा छंद होता. कधीतरी ते धनुर्धारीच्या सापळ्यांना फोन करीत– "अरे, कशाला तू अमूकतमूक माणसाला आपल्या सापळ्यात अडकविले आहेस?" आपले नाव वृत्तपत्रात छापून यावे म्हणून ते खूप युक्त्या लढवीत. मामांनी एकदा नवशक्तीच्या पालेकरांना फोन केला. म्हणाले, मामांबद्दल त्या म्हांबऱ्यांच्या गंगाधरला विचारण्यापेक्षा मलाच विचारीत जा. मी तुमच्या सर्व लघुशंकांचे निरसन करीन.

एकदा रत्नागिरीचे प्रा. आबा होले मामांकडे आले, तेव्हा मामांनी त्यांना विडी ऑफर केली. आबा म्हणाले, "नको. मी माझीच ओढतो. प्रत्येकाने आपापले विष घ्यावे व पचवावे." मामांना एकदा त्यांचा पोस्टातला जुना सहकारी भेटला. त्या सहकाऱ्याने सांगितले, "मी निवृत्त होऊन कोकणात एक कौलारू घर बांधलेय." त्याने मामांना विचारले, "तुम्ही काय कमाई केलीत?" तेव्हा मामा म्हणाले, "अरे, तुझे ते कौलारू घर काळाच्या उदरात गडप होऊन जाईल; पण जोपर्यंत मराठी भाषा बोलली जाते तोपर्यंत माझे नाव अमर होऊन राहील.–"

मामांच्या प्रयत्नानेच चिंतामणराव कोल्हटकर यांच्या बहुरूपी या पुस्तकाला साहित्य अकादमीचे पाच हजारांचे बक्षीस मिळाले. नवविवाहितांपैकी कोणी मामांना भेटायला आले की मामा आपला ठेवणीतला जोक मारीत, "याला हिने ठेवलाय!" ते अप्पा पेंडशांशी ते सांभाळून बोलत. कारण ते आचार्य अत्रे यांच्या बैठकीतले होते. उगाच इकडचा शब्द तिकडे जायचा. कुणालाही ते आपल्या लेटरहेडवर शिफारसपत्र न कुरकुरता लिहून देत. १९५९ मध्ये ते ७८ वर्षांचे झाले. तेव्हा ते म्हणाले, "मी एक ७-८ वर्षांचा बालक आहे." न्हाव्याला ते हेडमास्तर म्हणत. लोकसभेला ते परलोकसभा म्हणत. पंडित नेहरूंचा पत्ता पुढे 'इन फ्रंट ऑफ मामा, द ग्रेट रायटर ऑफ इंडिया' असा झाला होता असे म्हणत. मामांनी आपल्या वाङ्मयात अश्लीलता येऊ दिली नाही. ते अर्वाच्य बोलत पण सुवाच्य लिहीत.

सत्तेचे गुलाम, दौलत जादा, जिवाशिवाची भेट, हाच मुलाचा बाप, अशी अनेक नाटके त्यांनी लिहिली. तमाशाला प्रतिष्ठा दिली. २३.९.१९६४ रोजी मामा दिल्लीत गेले, तेव्हा पुण्याच्या भरत नाट्य मंदिरात राधाबाई बुधगावकरांचा तमाशा होता. रेडिओवरून त्यांना ही बातमी कळली तेव्हा त्या म्हणाल्या, "आमचे वडील गेल्याचे दुःख आज आम्हाला झालेय. त्यांच्याच आधारामुळे तमाशा पांढरपेशांच्या वस्तीत मानाने उभा राहिला. आज आम्ही यापुढे खेळ करणार आहोत तो सुतकात सण साजरा केल्याच्या भावनेने." हे मामांचे चरित्र नव्हे. या आहेत मामांच्या चटपटीत आठवणी. त्यांच्या आठवणी या लेखकाकरिता मर्मबंधातील ठेवच होत्या. एक अविस्मरणीय मामा हे पुस्तक मामांइतके अविस्मरणीय झाले आहे.



अनुक्रमणिका

(अविस्मरणीय मामा : गंगाधर महांबरे. श्री विद्या प्रकाशन, पुणे. पस्तीस रुपये.)
(ज्योती जोगळेकर, फ्लॅट १९, कस्तुरबा ३६-डी, एक्स रोड नं. १, बोरिवली पूर्व, मुंबई ६६)

# वीस चोक ऐंशी : नरुभाऊ लिमये

## पत्रकार कार्यकर्त्यांचे समृद्ध अनुभवधन

शं. ह. देशपांडे

"मातीतून सतत चालणारा एक! त्या मातीतच माझ्या जीवनाचे श्रेय मी शोधतो. त्या मातीनेच मला एवढी नम्रता दिली आहे की, कुणाच्याही पायावर डोके ठेवायला मला लाज वाटत नाही," असे सुरुवातीच्या निवेदनात नरुभाऊ सांगतात. "कुणावर राग, द्वेष, असूया नाही. सार्वजनिक जीवनात व राजकारणात संबंध आलेल्या कोणाहीबद्दल अनादर नाही. आपण जे जे पाहिले, ऐकले ते संगतवार सांगण्याचा पत्रकाराचा हा प्रयत्न आहे," असेही ते स्पष्ट करतात.

वीस चोक ऐंशी ह्या आत्मचरित्राची सुरुवात लेखकाच्या जन्मापासून झालेली आहे. गरीब, नोकरी पेशाच्या कुटुंबात जन्म, जन्माच्या आधी तीन दिवस अगोदर पित्याचे निधन झालेले! जन्मदात्रीची मनःस्थिती त्या वेळी कशी असेल याची कल्पना करणेही कठीण. जन्माआधी तीन दिवसांऐवजी जन्मानंतर तीन दिवसांनी पित्याचे निधन झाले असते तर 'पित्याच्या मुळावर आला' असा शिक्का बसला असता. विधात्याने तसे होऊ दिलेले नसले तरी पितृत्वाच्या सावलीपासून वंचित केले. एकत्र कुटुंबात चुलते-चुलत्यांच्या आश्रयाने बालपण गेले. सातारा येथे जन्म. शिक्षण अर्धवट सोडावे लागले. अल्पकाळ नोकरी. उद्योगात यशस्वी पदार्पण. विमा, छापखाना, संपादनाची जबाबदारी. राजकारणात प्रवेश. सत्याग्रहामुळे आणि १९४२च्या चले जाव चळवळीत भाग घेतल्याने तुरुंगवास, राज्य पातळीवरील, काँग्रेस पक्षाच्या लोकशक्ती (की कर्जशक्ती) दैनिकाचे संपादकत्व–संचालकत्व लादले गेल्यामुळे पुण्यात स्थलांतर, ती जबाबदारी पार पाडताना प्रतिकूल आर्थिक परीस्थितीचे चटके, विधानपरिषदेचे सदस्यत्व, काहीशा सुस्थितीत जगताना पत्नीचे निधन, एका मित्राच्या निधनानंतर ते कुटुंब सावरताना पुत्राशी जडलेले स्नेहाचे नाते, असे ह्या आत्मचरित्रातील महत्त्वाचे टप्पे आहेत.

"सा-ता-रा" या तीन अक्षरांत तीनशे वर्षांचा इतिहास भरलेला आहे. त्या समन्वयी, सेवाभावी सातारा भूमीस आपले आत्मकथन नरुभाऊंनी अर्पण केलेले आहे. ऐंशी वर्षांच्या

आयुष्यात पुण्या-मुंबईत वास्तव्य अधिक झाले असले तरी त्यांचा पिंड साताऱ्यात घडला. एवढेच नव्हे, तर राजकारणात त्या भागातील यशवंतराव चव्हाण, वसंतरावदादा, यशवंतराव मोहिते, बाळासाहेब देसाई आणि उद्योगात भाऊसाहेब सोमण, बाबुराव वैद्य, नीळकंठराव कल्याणी अशा व्यक्तींशी मोठ्या प्रमाणावर संबंध आता आणि जीवनाची जडणघडण झाली. पुण्या-मुंबईत काकासाहेब गाडगीळ, भाऊसाहेब हिरे, अच्युतराव पटवर्धन, शरद पवार आदी अनेक नेत्यांशी संबंध आला. चरित्र लेखनातील नामोल्लेखाची जंत्री फार मोठी आहे.

महाराष्ट्र विधान परिषदेतील विरोधी पक्षनेते ग. प्र. प्रधान यांनी ग्रंथाला प्रस्तावना लिहिलेली आहे. नरुभाऊंच्या आत्मकथेतून त्यांच्या रसिकतेचा पाझर झुळूझुळू वाहताना दिसतो. त्यांचे नाट्य प्रेम, जीवनातील विविध अंगांचा रसास्वाद घेण्याची त्यांची वृत्ती, त्यांचा खेळकर विनोदी स्वभाव, हे पैलू सहजतेने प्रगट झाले आहेत, असे त्यांनी लिहिले आहे.

यशवंतराव चव्हाण–नरुभाऊ यांचे दीर्घ काळ संबंध. कधीकधी मतभेदही झाले. चरणसिंग मंत्रिमंडळात त्यांनी उपपंतप्रधान होणे नरुभाऊंना खटकले. ते लिहितात :

"चव्हाण साहेबांचे मत, मन आणि धोरण समजून घेण्याचा मी सारखा प्रयत्न करीत आलो आहे. छत्तीस-सदतीसचा प्रसंग, हिरे-चव्हाण लढत, महाराष्ट्र काँग्रेस पक्षात त्यांच्या नेतृत्वाला शह देण्याचे झालेले कारस्थान, या सर्व प्रसंगी मी त्यांचा मित्र, पत्रकार, त्यांच्या शेजारी उभा असे. त्यांनी ऐंशी साली लोकसभा निवडणुकीच्या वेळी निकराची लढत दिली. ती (त्यांची कदाचित माहिती) आणि शेवटची तत्त्वाधिष्ठित लढाई असेल. त्यापूर्वी त्यांचे प्रत्येक पाऊल सत्तेच्या संदर्भात आणि निवडणूक जिंकून सत्ता संपादण्याच्या दिशेनने पडत गेले.

—- पूर्ण विचाराअंती माझे मताने ती वैयक्तिक सत्तेसाठी केलेली वाटचाल नव्हती तर बहुजन समाजाचे कल्याण, देशाचे हित आणि काँग्रेस या त्याच्या साध्याकडे जाणारे साधन, या त्यांच्या त्रिविध निष्ठेमुळे ते तसे वागत गेले. सत्तेमार्फतच सेवा आणि विकास करता येतो हा त्यांचा सिद्धान्तच माझ्या मते चुकींचा होता. सत्तेशिवाय किंवा सत्तेशी झगडून जनकल्याण साधता येते हे त्यांनी कधी मनावर घेतले नाही." (पृष्ठ ३४३)

असे तात्त्विक विचारमंथन "वीस चौक ऐंशी"मध्ये अनेक ठिकाणी आहे. सोपी, सरळ खऱ्या मराठी वळणाची भाषा हे आणखी वैशिष्ट्य सांगता येईल. घरगुती, कौटुंबिक प्रसंगही वाचनीय आहेत. त्यांत पत्नी मीराबाईच्या निधनाप्रमाणेच जिवलग मित्र हरिभाऊ पुंडे यांच्या निधनाच्या प्रसंगाचा उल्लेख करता येईल. लालित्य आणि पत्रकरिता यांचा त्या लेखनात संगम आढळतो.

साठ वर्षे पत्रकारितेत व्यतीत केलेले नरुभाऊ, "अंधश्रद्धा घालवा पण श्रद्धा घालवू नका," असे आवर्जून सांगतात. त्यांच्या जीवनातला एक प्रसंग त्यांच्या ह्या भावनेला



अनुक्रमणिका

बळकटी आणणारा आहे.

"दैवावर, ग्रह-नक्षत्रांच्या हालचालींवर, पत्रिका– ज्योतिषावर किती विश्वास ठेवावा हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे.

– माझे स्नेही, विमा क्षेत्रातले राजाभाऊ देशमुख यांचेकडे एकदा दौंडचे एक सत्पुरुष बगोबा महाराज आले होते. राजाभाऊंनी मला आणि मीराला त्यांच्या दर्शनाला बोलावले. म्हणाले, कोपऱ्यात बसून रांहा. सांगितल्याशिवाय घरी जाऊ नका! आम्ही महाराजांना नमस्कार करून तीन तास बसलो. शेवटी महाराजांनी खुणावले म्हणाले, "आता झाडाने आम्हाला धरले. जा, बन्या म्हणून कोण आहे त्याला जेवायला घाला. गाणगापूरला जा. घरात दत्ताची तसबीर आहे तिची पूजा कर. तेरा अक्षरी मंत्र म्हणत जा. तुझे कल्याण होईल." मी आणि मीरा हा बन्या कोण, त्याला जेवायला बोलवायचे? माझा सातारचा मित्र बन्याबापू गोडबोले काही आठवेना. घरात दत्ताची तसबीर नव्हती. विचारात पडलो. दोन दिवस बेचैनी... अशा स्थितीत साताऱ्याहून बन्याबापूचे पत्र आले. (पृष्ठ १९३)

त्या पत्रात बँकेच्या जप्तीचे संकट टळल्याचे लिहिले होते. घरात दत्ताची तसबीर नव्हती. जुन्या ट्रंका शोधताना माझ्या बंधूच्या पुस्तकात एक चांदीची दत्तमूर्ती आढळली. थक्क होऊन पूजा सुरू केली आणि लँग्वेज कमिशनच्या एका अहवालाचे मराठी भाषांतर करून छापून देण्याचे काम मिळाले. त्या कामात बारा-चौदा हजार रुपये मिळाले."

वीस चोक ऐंशी आत्मचरित्रात परखड विचार आहेत. दांभिकपणा कोठेही नाही.

(वीस चोक ऐंशी– नरुभाऊ लिमये; काँटिनेंटल प्रकाशन, पुणे ३० पृष्ठे ३६८. साठ रुपये)

(शं. ह. देशपांडे, कावेरी, पत्रकार नगर, पुणे १६)

# मी एक न्यायाधीश : प्र. ना. बेहेरे

## न्यायमूर्तीच्या जीवनातील हर्षखेद

**ॲड. दामोदर कानिटकर**

मराठीत न्यायालयीन जीवनासंबंधी पुस्तके, चरित्रे, आत्मचरित्रे, तशी कमीच आहेत. वकिली व्यवसायातील अनुभवांवर लिहिलेली काही पुस्तके आहेत; पण ती योग्य त्या प्रकाशकांमार्फत वाचकांपर्यंत न पोहोचल्याने सर्वसामान्य वाचकाला त्यांची माहिती नाही. (उदा. इंदापूरच्या हणमंत श्रीनिवास देशपांडे या जुन्या वकिलांनी स्वतःच प्रकाशित केलेली आपली काही पुस्तके.) पण त्या त्या वेळी नियमित व्यवसायात असलेल्या

प्रकाशकांच्या ललित पुस्तकांच्या जाहिरातीत ही पुस्तके दिसत नाहीत. पण श्री. बेहरे यांचे पुस्तक श्रीविद्याने काढल्यामुळे चांगल्या स्वरूपात वाचकांपुढे आले आहे.

या पुस्तकात न्या. बेहरे यांनी तालुका न्यायाधीशापासून जिल्हा व सत्र न्यायाधीश म्हणून निवृत्त होण्यापर्यंतचा आपला प्रवास वर्णन केला आहे. एक तर न्यायाधीश म्हणून तालुका कोर्टात काम करणाऱ्या माणसाचे आयुष्य कामाच्या रगाड्यात आणि एकमार्गीच जाते. शिवाय समजापासून अलिप्त राहण्याचे व्रत त्याला पाळावे लागते. त्यामुळे आपल्या कामाशी प्रामाणिक राहणाऱ्या माणसाला आलेले अनुभव, नव्याने या क्षेत्रात येणाऱ्या व्यक्तींना 'मनन' करण्यासारखे आहेत. वैयक्तिक त्यांचा फायदा होईलच, शिवाय न्यायालयांची प्रतिमा लोकमानसात अधिक प्रभावी होण्यास मदत होईल. खरे तर तालुक्यासाठी न्यायाधीश (दिवाणी व फौजदारी) निवडताना अतिशय दक्षता घेणे जरूर आहे. इथे मिळणाऱ्या निकालावर खूप अवलंबून असते. सगळ्याच पक्षकारांना अपीले करण्याचा खर्च परवडणारा नसतो. अशा स्थितीत खालच्या कोर्टातील न्यायाधीश जेवढा कायद्यातील जाणकार, मॅच्युअर, खऱ्या-खोट्यातील भेद जाणणारा, व्यावहारिकदृष्ट्या विवेकशील असेल तेवढा पक्षकारांना दिलासा जास्त वाटणार. ब्रिटिश काळात आय. ए. एस. ऑफिसर निवडताना जशी कडक 'चाळणी' होत होती तशी चाळणी हवी. न्याय व शिक्षण ही अशी क्षेत्रे आहेत, की तिथे पूर्णतः दर्जा सांभाळणे जरूर आहे, तरच उद्याचा चांगला समाज घडणार आहे. बेहरे यांनी कोर्टावर वजन पाडण्यासाठी येणाऱ्या पुढाऱ्यांना जे सुनावले ते त्यांच्या न्यायप्रियतेचे गमकच आहे. मुख्य म्हणजे निर्भय राहून आणि परमेश्वराला वा सदसद्विवेक बुद्धीला स्मरून न्यायदान करणे हेच ज्यांना जीवनाचे प्रयोजन वाटेल अशा व्यक्ती न्यायाधीश म्हणून चांगले काम करतील हे बेहेऱ्यांच्या अनुभवांवरूनही लक्षात येते, आणि असे काम करणाऱ्या व्यक्तीला कोणत्या विरोधांना तोंड द्यावे लागते याची कल्पना येते. काळानुरूप 'संकटे' वेगळी रूपे घेऊन येतील; पण आपल्या भूमिकेवर ठाम राहणाऱ्या न्यायाधीशांची नैतिक मूल्ये ही सर्व काळ उच्च आणि आदर्शवादीच असतील.

श्री. बेहरे यांनी यवतमाळला दिवाणी न्यायाधीश म्हणून नोकरीला सुरुवात केली. पुण्याला जिल्हा व सत्र न्यायधीश म्हणून काम केले. सुमारे २७ वर्षे न्याय खात्यात काम करून ते निवृत्त झाले. जळगाव, सांगली, नाशिक वगैरे ठिकाणी नोकरीच्या निमित्ताने त्यांचे वास्तव्य झाले. त्या त्या ठिकाणी भेटलेली माणसे, बरोबरीचे न्यायाधीश, वकील वर्ग, कोर्टातील नोकर वर्ग, राहत्या ठिकाणांचे शेजारी, यांची वर्णने पुस्तकात आहेत. स्वतःच्या आयुष्यातील अपत्यप्राप्तीसारख्या आनंददायी घटनाही जाता जाता ते सांगून टाकतात. तसे पाहिले तर तालुक्याच्या आणि जिल्ह्याच्या ठिकाणी नियमित नोकरी करून आयुष्य व्यतीत करणाऱ्या व्यक्तीच्या आयुष्यात लोकांना सांगण्यासारखे असे काय प्रसंग असणार असे वाटते. स्वतंत्र, धोका पत्करून आयुष्य जगलेल्या राजकारणी, कलावंत



अनुक्रमणिका






वगैरेंच्या आत्मचरित्रात त्या त्या माणसाचे त्याने एका धुंदीत घालविलेले असुरक्षितपणाची किंमत मोजून व अनेक लौकिक मोह टाळून स्वीकारलेले आयुष्य हे विलक्षण अनुभवांनी संपन्न झालेले दिसते. ठराविक पद्धतीने 'स्थिर' व 'सुरक्षित' नोकरीतील आयुष्य तसे शांत, नियमित आणि चाकोरीतले असते. त्यामुळे वाचकांच्या दृष्टीने त्याची वाचनीयता थोडी कमीच असते. मात्र न्या. बेहरे यांच्या चाकोरीतल्या पण सरळ आणि न्यायप्रिय जीवनक्रमाचे हे सरळ साधे कथन होतकरू न्यायाधीश आणि सर्वसामान्य वाचकांनीही एकदा वाचावे असे झाले आहे.

(मी एक न्यायाधीश, प्रताप नारायण बेहरे. श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे १७८. साठ रुपये)

(दामोदर स. कानिटकर, कचेरीसमोर, बारामती.)

---

# मस्तानी : द. ग. गोडसे

## धक्का देणारा शोधग्रंथ

म. श्री. दीक्षित

---

प्रसिद्ध इतिहासप्रेमी, व्यासंगी चित्रकार श्री. द. ग. गोडसे यांचे 'मस्तानी' हे नवे पुस्तक. या पुस्तकात बाजीराव-मस्तानी या प्रकरणाचा त्यांनी नव्याने शोध घेण्याचा कसोशीने यत्न केला असून, मस्तानीची एक नवी प्रतिमा मराठी वाचकांपुढे ठेवली आहे.

रूढ समजुतीप्रमाणे मस्तानी ही बुंदेलखंडाच्या छत्रसाल राजाच्या मुसलमान रक्षेची सुंदर, नाजूक, नृत्यनिपुण अशी कन्या. पातशाही सरदार बंकश वृद्ध छत्रसालाच्या राजधानीवर स्वारी करून त्याची कोंडी करतो. ती सुटावी म्हणून अखेर तो प्रतापी बाजीरावाची कुमक मागतो. बाजीराव त्याप्रमाणे बुंदेलखंडात जाऊन बंगशाच्या मगरमिठीतून छत्रसालाची सुटका करतो. या उपकाराची फेड म्हणून छत्रसाल आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा आणि मस्तानी बाजीरावाला देऊ करतो. बाजीराव नंतर मस्तानीला घेऊन पुण्यात येतो, नि स्वतंत्र हवेली बांधून तिच्या सहवासात रमू लागतो. चार-पाच वर्षांनी उभयतांना पुत्र (समशेरबहादूर) होतो. मस्तानीच्या सहवासामुळे बाजीराव पुढे मद्यमांस सेवन करू लागतो. विलासी बनतो. त्यामुळे मातुःश्री राधाबाई, बंधू चिमाजीअप्पा आणि वारसपुत्र नानासाहेब मस्तानीला राऊस्वामींपासून दूर ठेवण्याचा यत्न करतात. प्रसंगी तिला नजरकैदेत ठेवतात. या नजरकैदेतून एकदा मस्तानी सुटून जाते नि पाटसच्या छावणीत रायासंगे दोन रात्री घालवते. पण शेवटी घरच्यांच्या आग्रहापुढे नमते

घेऊन राऊच मस्तानीची पुण्याला रवानगी करतो. यानंतर नासिरजंगावरील स्वारीचे बाजीराव प्रस्थान ठेवतो. स्वारीतील विजयामुळे खरगोणहांडिया प्रांत त्याला मिळतात. त्यांचा ताबा घेण्यासाठी तो परस्पर नर्मदेच्या दिशेने कूच करतो नि अखेर नर्मदाकाठीच अचानक ताप भरून अकाली मृत्यू पावतो. मृत्युसमयी त्याची धर्मपत्नी काशीबाई आणि नुकताच मुंज झालेला पुत्र जनार्दन जवळ असतात. त्याच्या पश्चात मस्तानी किती जगली, केव्हा, कुठे वारली, तिचे दफन झाले की दहन, याविषयी कसलाही पुरावा नाही. पाबळगावी मशिदीच्या आवारात तिची कबर (गोडसे यांच्या मते समाधी) आहे, एवढेच काय ते सत्य गवसते. तेही १८८५च्या गॅझेटियरमधून.

### समजुतीला धक्का

श्री. गोडसे यांचा ग्रंथ या रूढ समजुतीला अनेक बाबतींत धक्का देणारा असून, त्यांनी मस्तानीचं एक नवं आगळं दर्शन घडवलं आहे. त्यासाठी त्यांनी मराठीतील आजवरचे बहुतेक सारे ऐतिहासिक व ललित साहित्य यांची फेरतपासणी केली आहे. इतकेच नव्हे तर डॉ. भगवानदास गुप्त यांच्या ग्रंथाचा (१९५८) आधार घेऊन 'मस्तानी' या विषयीची व्याप्ती नि खोली खूप वाढविली आहे. छत्रसाल आणि पेशवे घराणे यांच्या विस्तृत कालखंडाचा एक कौटुंबिक, भावनिक, काहीसा छिद्रान्वेषी आलेखच चित्रपटाप्रमाणे त्यांनी वाचकांपुढे उभा केला आहे. पुस्तकातील पंधरा प्रकरणांना शीर्षके न देता मस्तानी नि तिचे वंशज यांची सहानुभूतिपूर्ण सलग कहाणी, नव्हे कैफियतच त्यांनी शोधग्रंथांच्या रूपाने मांडली आहे. अर्थात या कैफियतीत कल्पनेचा, तर्काचा भाग किती आणि निखळ ऐतिहासिक सत्याधिष्ठित भाग किती, या बाबतीत जाणकारांत तीव्र मतभेद होऊ शकती : निदान माझे आहेत व ते मी ग्रंथकाराविषयी प्रेमादर बाळगूनही व्यक्त करत आहे.

मस्तानीची समाधी, वाडा, मशीद, शाहू छत्रपतींचे पत्र, नानासाहेबांच्या लग्नप्रसंगीच्या निमित्ताने कलावंतांना देण्यात आलेल्या बिदागीची नोंद (जीत मिसकीन मस्तानी कलावंत असा उल्लेख आहे), शनिवारवाड्याच्या अवशेषांचा मस्तानीच्या हवेलीसकटचा आराखडा, बाजीराव-मस्तानीपुत्र समशेरबहादूर व त्याचे पुत्रपौत्र, तसेच बाजीराव-मल्हारराव होळकर इत्यादी चित्रांच्या ठशांमुळे मस्तानी हा विषय अधिक बोलका झाला आहे, हे आरंभीच नमूद करावेसे वाटते. पण संक्षेपरूप आभारप्रदर्शन पुस्तकातील काही लेख कोणकोणत्या नियतकालिकांत प्रसिद्ध झाले होते तो तपशील देण्याची टाळाटाळ का, याचा उलगडा होत नाही. विख्यात कवयित्री श्रीमती इंदिरा संत यांना अर्पण केलेला हा शोधग्रंथ डेमी २८० पृष्ठांचा असून, त्याची विभागणी पंधरा प्रकरणांत केलेली आहे.










### महत्त्वाचे पहिले प्रकरण

पुस्तकातील 'मस्तानी' हे पहिले प्रकरण सर्वाधिक महत्त्वाचे आहे. श्री. गोडसे यांना मस्तानीसंबंधी नव्याने जे काही सांगावयाचे आहे, ते सारे या प्रकरणात सांगितले गेले आहे. पुढली सारी प्रकरणे म्हणजे या सारभूत प्रकरणातील मुद्द्यांची तपशिलाने पुनरावृत्ती आहे. पुनरुक्ती आणि पाल्हाळ हे दोष मस्तानीसंबंधातील अतिरिक्त जिव्हाळ्याच्या पोटी आले असावेत. पन्नासएक वर्षांपूर्वी 'नारायणराव पेशवे– खून की आत्महत्या' या ग्रंथाने जसा एक धक्का-प्रयोग करून पाहिला आणि अखेर त्याची कै. न. र. फाटकांसारख्यांकडूनही भरपूर चिकित्सा होऊन तो फसला, तसे काहीसे गोडसे यांच्या 'मस्तानी'च्या ललाटी लिहिले आहे की काय कुणास ठाऊक! उपरोक्त ग्रंथात श्री. गोडसे बाजीरावाची मातुःश्री राधाबाई, बंधू चिमाजीअप्पा आणि पुत्र नानासाहेब या त्रयींची प्रतिमा कलंकित करू पाहत आहेत. बाजीराव-मस्तानीच्या प्रेम-जीवनात (खरे तर प्रणयजीवनात) विष कालविणारे महापापी खुनी वृत्तीचे असे या त्रिवर्गाचे भडक चित्रण ग्रंथकाराने केले आहे.

### हिंदी पुस्तकाचा आधार

तेव्हा सारभूत प्रकरणाचा परिचय नि परामर्श घेतला की एकूण पुस्तकाविषयी वेगळे विशेष काही सांगण्याची आवश्यकता वाटत नाही. सर्वप्रथम हे सांगणे जरुरीचे आहे की, ज्या ग्रंथकारांच्या मुख्य आधारावर 'मस्तानी'नामक डोंगर श्री. गोडसे यांनी रचिला आहे त्यांचे १९८३ मध्ये प्रसिद्ध झालेले 'मस्तानी-बाजीराव और उनके वंशज बाँदा के नवाब' हे दुसरे पुस्तक त्यांनी वाचले नसावे, असे वाटते. 'मस्तानीके जन्म, वंश आदि का कोई भी विश्वसनीय विवरण उपलब्ध नहीं है ।' असे ग्रंथारंभीच गुप्त महाशय निक्षून सांगतात आणि बंकशाचे संकट निवारण झाल्यानंतर दरबारात बाजीरावाचा जेव्हा आदरसत्कार होतो तेव्हा 'जनश्रुति के अनुसार' मस्तानी भी इसी समय उन्हे भेट की,' असे ऐकीव माहितीवर आधारित विधान करतात. मस्तानी ही एक यवन वेश्यापुत्री होती, आणि ती 'बाजीरावासंगे चली गई' असे बुंदेलखंडाचे इतिहासकार गोरेलाल तिवारीही सांगतात. (पृ. २७१) तेव्हा आता गोडसे पुनःपुन्हा सांगतात, ती छत्रसाल या वृद्ध राजाची कुलीन, सुविद्य राजकन्या मस्तानी ती आणखी कोणती? छत्रसाल राजा एकेश्वरी, प्रणामी पंथाचा, सर्वधर्मसमभावी होता की हिंदुधर्माभिमानी सहिष्णू होता हा मुळात एक वेगळा चर्चेचा विषय आहे. मस्तानी प्रकरणाशी या पंथाच्या चर्चेचा तसा काही संबंध पोहोचत नाही. 'छत्रसालाचा निधर्मी दृष्टिकोन बाजीरावास मान्य झाला असावा', म्हणून यावनी मस्तानी त्याला देण्याचे धाडस छत्रसालाने केले (पृष्ठ १०), असे लिहून श्री. गोडसे या प्रकरणाचे एक कृत्रिम उदात्तीकरण करू पाहताहेत. शूर मर्दाची भोगलालसा म्हणा की वीर पुरुषाचा शृंगारिक विरंगुळा म्हणा, मस्तानी प्रकरणाचा खरा प्रांजळ अर्थ हा आहे. खरे तर स्त्री ही

पुरुषाची भोगदासी आहे, या मध्ययुगीन मुख्य कल्पनेशी मस्तानी प्रकरण सुसंगत आहे.

### हिंदू ठरविण्याचा अट्टाहास

पाबळला मस्तानीची कबर नसून ती समाधी आहे, असा श्री. गोडसे यांचा एक नवीन शोध. पुस्तकाचा सारा इमला या एका शोधावर उभा केला गेला आहे. समाधी का, तर ती समाधीसारखी दिसते. याहीपलीकडे जाऊन गोडसे असे सुचवितात की, बाजीराव-मस्तानी यांचे लग्न झाले होते आणि बाजीरावाच्या मृत्यूनंतर तिने जवळजवळ सहगमन केले, म्हणून समाधी बांधली गेली असावी. प्रश्न असा, की समाधी किंवा वृंदावन एक तर नदीकाठी किंवा देवालयासन्निध बांधले जाते. पाबळची समाधी तर चक्क मशिदीच्या सन्निध आहे. बरं, समाधीची देखभाल, पूजाअर्चा करणारे परंपरागत कोण, तर काशीद वा फकीर, मस्तानीला अशी जबरदस्तीने हिंदू ठरविण्याचा लेखकाचा अट्टाहास घटकाभर मान्य केला तरी तिचे वंशज, त्यांची नावे, आचारधर्म, आप्तसंबंध हे सारे मुसलमानांशीच निगडित का? याचे नेमके उत्तर गोडसे यांना देता आलेले नाही. समशेर ऊर्फ कृष्णसिंग याची मुंज लावण्याचा घाट आणि त्याला पेशवे कुटुंबाचा व ब्राह्मणांचा विरोध, हे एक निराधार प्रकरण आहे. श्री. गोडसे यांना ते खरे वाटावे हे आश्चर्य आहे. खरे तर मस्तानी अगदी यवन ठरल्याने आणि तिची कबर असण्याने तिच्या उत्कट प्रेमाचे महत्त्व अणुमात्र कमी होत नाही.

पेशवे कुटुंबातील मंडळींचा बाजीराव-मस्तानी संबंधाला तीव्र विरोध का, यालाही तसे सबळ कारण असावे. आरंभीची काही वर्षे असा विरोध मुळीच दिसत नाही. कारण अंगवस्त्र वा रक्षा बाळगणे ही गोष्ट तत्कालीन समाज खपवून घेत असे. खुद्द बाजीरावाच्या बापाला अंगवस्त्र होते व पुत्र नानासाहेब तर चांगलाच रंगेल होता. पण मस्तानी ही यावनी वेश्यापुत्री होती. तिला बाजीरावाने अगदी राहत्या वाड्यानजीक आणून ठेवली. तिच्या सहवासामुळे त्याला मद्यमांससेवनाची चटक लागली, वृत्ती विलासी बनू लागली आणि प्रकरण असेच चालू राहिले तर मस्तानीपायी बाजीराव धर्मांतर तर करणार नाही, अशी भीती अडीचशे वर्षांपूर्वीच्या मायेच्या रक्ताच्या माणसांना वाटली तर त्यात अस्वाभाविक ते काय? बाजीराव आणि चिमाजीअप्पा यांचे बंधुप्रेम, या बंधूंचे मातृप्रेम आणि मातेचे उभयतांवरील पुत्रप्रेम मस्तानीप्रकरणी तणाव निर्माण झाले त्या काळातही कायम होते. श्री. गोडसे यांनी या संबंधातली पत्रे एक तर नीट वाचली नसावीत किंवा आपणास हव्या त्या ओळी उद्धृत करून त्यांनी सोयीस्कर अर्थ लावलेला दिसतो. घोड्यावर बेसावध अवस्थेत असता वाटेत भेटणाऱ्यास कोंबडीचे प्रयोजन आहे, घेऊन येणे, असे सांगणारा बाजीराव टोकाला जातो आहे. त्याला सावरले पाहिजे, कर्तव्याची जाणीव करून दिली पाहिजे, असे कुटुंबीयांना वाटणे आणि निरुपाय म्हणून त्यांनी मस्तानीस काही काळ नजरकैदेत ठेवणे हा गोडसे यांना मोठा अपराध वाटतो; पण खुद्द बाजीरावाला या अपराधाची चांगली जाणीव आहे याचा

त्यांना विसर पडतो. या अपराधीपणाच्या जाणिवेमुळेच बाजीराव हा वीर पुरुष आपल्या करारी मातेच्या, धवल-कीर्ती पराक्रमी भावाच्या आणि ज्येष्ठ वारसपुत्राच्या कृतींचा प्रतिकार न करता अखेर त्यांच्या इच्छेला मान देऊन मस्तानीची पुण्याला रवानगी करतो. ही रवानगी त्याने कष्टी मनाने केली असल्याने चिमाजीअप्पा मन मोठे करून तिला सोडून देण्याचा नि राऊकडे जाऊ देण्याचा बेत करतो. पण त्या आधीच राऊची पत्नी काशीबाई धाकट्या पुत्रासह पुण्याहून उत्तरेकडे रवाना झालेली असते. दरम्यान राऊस्वामीच अकाली गेल्यामुळे या प्रकरणावर आपोआप पडदा पडतो. काशीबाईऐवजी राऊच्या सन्निध या वेळी केवळ मस्तानी असती तर नर्मदाकाठी वृंदावनाऐवजी बाजीरावाची कबर उभारली जाण्याचीही शक्यता होती. गोहरबाईच्या सहवासातील बालगंधर्वांचे अखेरचे दिवस कसे गेले नि शेवटी खऱ्याखुऱ्या हितचिंतकांनी त्यांना पुण्याला आणून केवढी कामगिरी बजावली ही अलीकडची घटना या संदर्भात सहज आठवली. बरे, मस्तानीचा द्वेषच केवळ कुटुंबीयांच्या मनी असता तर तिच्या पुत्राचा ममतेने सांभाळ करून त्याला त्यांनी नावलौकिकास कसे चढवले असते? बाजीराव आणि चिमाजीअप्पा यांचे बंधुप्रेम अखेरपर्यंत कायम होते. मस्तानीपायी त्या प्रेमात कधीही खंड पडला नाही, याची प्रचीती या संबंधातली पत्रे संपूर्ण वाचली असता कळून येते. श्री. गोडसे यांनी त्यामधील उद्‌धृत केलेल्या सोयीस्कर ओळींवरून येणार नाही. जिज्ञासूंनी मूळ पत्रे, निदान माझे 'प्रतापी बाजीराव' हे चरित्र किंवा त्यातील 'मस्तानी : शोध नि बोध' हे परिशिष्ट वाचावे.

### काशीबाईंची प्रशंसा

मस्तानी प्रकरणी सहानुभूती दाखविणाऱ्या शाहूची आणि मुग्धता धारण करणाऱ्या काशीबाईची प्रस्तुत संदर्भात श्री. गोडसे अतिरिक्त प्रशंसा करतात. पेशव्याला पत्रे लिहून उत्तरेकडून खूबसुरत पोरी मागविणाऱ्या शाहू छत्रपतींनी मस्तानी प्रकरणाकडे सबुरीने घेण्याचा सल्ला द्यावा, यात नवल ते काय? बिचारी काशीबाई तर काय, बोलून-चालून तत्कालीन हिंदू सोशिक पतिव्रतेचा नमुनाच होती. त्यातून ती अशक्त आणि पायाने अधू. तेव्हा 'सिंधू'ची भूमिका बजावण्यापलीकडे तिच्या हाती होतेच काय? काशीबाईकडून हवे तसे प्रणयसुख न मिळणारा बलदंड बाजीराव मस्तानीच्या सहवासात अधिकाधिक रमू लागला हाही एक मुद्दा विचारात घ्यावा लागतो. तसेच छत्रसाल राजा भले प्रणामी पंथाचा असो, पण त्याला लग्नाच्या बायका किती होत्या, रक्षा किती होत्या आणि पुत्र, लेकावळे, लेकावळ्या किती होत्या, याचा विचार केला की आयुष्याचा बहुतकाळ मुघलांची चाकरी करणाऱ्या या राजाची योग्यता पारखूनच घ्यावी लागते. बाजीरावाला देऊ केलेला राज्याचा हिस्सा प्रत्यक्षात किती आणि केव्हा पदरी पडला, किंबहुना बाजीराव-छत्रसाल यांच्या माघारी तो पाडून घ्यावा लागला ही गोष्ट इतिहासतज्ज्ञांना चांगली अवगत आहे. तेव्हा छत्रसालाची गोडसेकृत 'मनुस्मृती देणारा द्रष्टा ऋषी' ही प्रशस्तीसुद्धा अतिरिक्त आणि

दिशाभूल करणारी वाटते.

### गौरवपर मजकूर

'क्रौंचपक्ष्याचे युग्म' या दुसऱ्या प्रकरणात छत्रसाल आणि बाजीराव हे कसे भटके होते, आणि चिमाजीअप्पांमुळेच बाजीराव अकाली बळी कसा गेला, याचे विवरण आहे ते अगदीच हास्यास्पद आहे. बाजी-चिमाजीची राम-लक्ष्मणाची जोडी ही कल्पनासुद्धा गोडसे यांना साहवत नाही. बाजीरावाच्या मृत्यूनंतर स्वतः पेशवा होणे पराक्रमी चिमाजीस मुळीच अशक्य नव्हते; पण शाहू महाराजांकरवी तो नानासाहेबांस पेशवाईची वस्त्रे देववितो आणि स्वतः पुतण्याच्या कारभारीपणाची भूमिका पत्करतो व ती नेकीने करतो. त्याच्या मोठ्या मनाची नि निखळ बंधुप्रेमाची साक्ष देणारे याच सुमाराचे एक पत्र उपलब्ध आहे. उत्तरेतील वकील हिंगणे यांना लिहिलेल्या या पत्रात अप्पा बाजीरावाविषयी किती गौरवार्थी लिहितो आहे पाहा– "पुढे उत्तरप्रांती कीर्तिलता प्रफुल्लित केली. विश्वेश्वराची स्थापना करावी, हे आर्त होतीच. नानांनी (बाळाजी विश्वनाथ) कीर्ति संपादिली. त्यापेक्षा दशगुणित कीर्ति रायाची प्रकाशमान झाली. राव पूर्णप्रतापी प्रतिसृष्टिकर्ते होते. सर्व हिंदूंस महदाश्रये रावच होते. रायासारिखा सामानपूर (सज्ज) सर्व गोष्टीने संपूर्ण दक्षिणेस या हिंदुस्थानात दुसरा कोणी नव्हता. (हिंगणे दप्तर लेख १५). पत्रातील एवढा मजकूरसुद्धा गोडसे यांच्या दुष्ट आरोपाचे खंडन करण्यास पुरेसा आहे. मस्तानीच्या मुसलमान आईशी छत्रसालाने लग्न लावले होते, तसेच मस्तानीशीही बाजीरावाचे लग्न लागले होते, अशी निराधार विधाने ठोकून देण्याने लेखकाला समाधान लाभेल; पण अजाण वाचकांची मात्र दिशाभूल होईल. बाजीरावाच्या अखंड घोडदौडीला भटकेपणा, भ्रमंती असल्या विशेषणांनी लेखक गौरवितो आणि अकारणच या कल्पना ताणतो. सिकंदरापासून जगातले बहुतेक सारे महत्त्वाकांक्षी वीर पुरुष असेच भटके होते. ज्या चिमाजीविषयी गोडसे आकसाने लिहितात तो चिमाजी आपल्या आजाराची पर्वा न करता ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेखातर सतत फौजेसंगे भिरभिरत होता आणि प्रत्येक लढाईत शत्रूचा निकाल करून येत होता. त्याच्या पराक्रमाची, प्रेमाची बाजीरावाला पूर्ण जाणीव असते; पण गोडसेमहाशय मस्तानीसारख्या क्षुल्लक व्यक्तीचा कैवार घेऊन अप्पालाच खलपुरुष ठरवितात, ही मोठी खेदाची गोष्ट आहे.

मस्तानीविषयी लेख अंतराअंतराने निरनिराळ्या नियतकालिकांत लिहिले गेल्याने व ते पुन्हा जसेच्या तसे एकत्रित केल्याने पुनरुक्ती आणि पाल्हाळाने पुस्तकाची मांडणीच विस्कळीत झाली आहे. खरे तर एका लेखाचा विषय ग्रंथविषय करून श्री. गोडसे यांनी आपले भगीरथ यत्न एक प्रकारे वाया घालविले याचे वाईट वाटते. जाणवते, वाटते, पुरावे नाहीत, अंदाज आहे असे शब्दप्रयोग त्यांच्या पुस्तकात वारंवार येतात. त्यांना जे मस्तानीचे अक्षरशत्रू वाटतात त्या अक्षरमित्रांनी बाजीरावाच्या एकूण पराक्रमी आयुष्यात

तिचे स्थान किती व कोणते हे पुराव्याच्या आधारे दाखवून दिले आहे. श्री. गोडसे यांची मस्तानी त्यांच्या मुख्यतः कल्पनाविश्वातली आहे. ती कुलशीलवान, सुविद्य राजकन्या होती. बाजीरावाशी तिचे लग्न झाले होते. सवब पाबळला असलेली तिची कबर नसून समाधीच असली पाहिजे. ही प्रतिमा नवी असली तरी ती अस्सल नसून बनावट आहे. स्टेनलेसचे भांडे चांदीचे होऊ शकत नाही. विषयाशी तादात्म्य पावून आणि उदंड परिश्रम करून श्री. गोडसे यांनी 'मस्तानी' हा ग्रंथविषय केला याबद्दल मात्र कौतुक व अचंबा वाटतो.

(मस्तानी : द. ग. गोडसे, पॉप्युलर प्रकाशन, ताडदेव, मुंबई ३४. १०० रुपये.)

(म. श्री. दीक्षित, सदाशिव पेठ, पुणे ३०.)

# 'नाथ हा माझा' : कांचन घाणेकर

## सत्त्वपरीक्षा पाहणारी प्रेमकहाणी

शंकर सारडा

डॉ. काशिनाथ घाणेकर.
'रायगडला जेव्हा जाग येते'मधील संभाजी.
'अश्रूंची झाली फुले'मधील लाल्या.
'गारंबीचा बापू'मधील बापू.
'गुंतता हृदय हे'मधील बाबुल.
'मला काही सांगायचंय'मधला राहुल.
'सुरुंग'मधला बेछूट, उग्र, निष्ठुर, दिलदार महेश.

एके काळी मराठी रंगभूमी गाजविणारा, निळया टपोऱ्या डोळयांचा, खळाळून हसणारा, अभिनयसंपन्न नट. दमदार स्पष्ट वाणी, संयमी अभिनय- आणि अडखळणारी संवादफेक- लाऊड अभिनयशैली अशा दोन्ही टोकांत वावरणारा. तरीही प्रेक्षकांच्या हृदयाचा ठाव घेणारा.

स्वतः दंतवैद्य. चांगली प्रॅक्टिस. नाटकात कामाची आवड. रायगडमधल्या संभाजीच्या भूमिकेने डॉ. काशिनाथ घाणेकर हे नाव सर्वदूर झाले, सर्वप्रिय झाले.

पत्नी इरावती स्त्री रोगतज्ज्ञ. स्वतःची वेगळी प्रॅक्टिस. तीही उत्तम. डॉक्टरांनी ससूनमध्ये तिला बघितल्यावर आपणहोऊन पुढाकार घेऊन घरच्यांची संमती मिळवून लग्नाचा घाट घातला.

डॉक्टर दिसायला देखणे; तशात ग्लॅमर. प्रसिद्धीचे वलय. अनेक सख्या त्यांच्या जीवनात आल्या. हा कॅसानोव्हा आपल्या या क्षेत्रातील मुलुखगिरीवर खूष असायचा.



अनुक्रमणिका








इरावती हे सारे खपवून घेत होती. मोठ्या मनाने. तिला खंत असलीच तर एवढीच, की आपल्या आवडत्या नवऱ्याला हवेहवेसे असणारे मूल आपण देऊ शकलो नाही. अनेकदा गर्भपात झालेले. या संसारात हेच एक मोठे शल्य होते.

या डॉक्टरला संभाजीच्या भूमिकेत बघून चौदा-पंधरा वर्षांची कांचन चव्हाण थक्क होते. मनोमन त्याच्या प्रेमात पडते. डॉक्टर आपल्यापेक्षा पंधरा-सोळा वर्षांनी वयाने मोठा आहे, विवाहित आहे हे तिला माहीत असते. पण तरी त्याबद्दलचे आकर्षण तिच्या हृदयात सतत वाढतच जाते.

ही कांचन तशी कुणी सामान्य मुलगी नसते. मराठी चित्रपटसृष्टीवर आपल्या शालीन, सोज्वळ अभिनयाने अधिराज्य गाजवणाऱ्या सुलोचनाबाईंची ही एकुलती एक कन्या असते. लाडात वाढलेली. आईबरोबर चित्रपटसृष्टीच्या झगमगाटात सहजपणाने वावरणारी. मनात घेतले की कुठलीही गोष्ट पार पाडण्याएवढी जिद्द बाळगणारी. आपल्या आवडीनिवडींचा आग्रह धरणारी. मानी, सत्यवान सावित्रीच्या जमान्यातली मूल्ये मानणारी. इतर आते-मामे भावंडांप्रमाणे आईला आई आत्ती म्हणणारी.

थोड्या थोडक्या नव्हे तर तब्बल सोळा वर्षांच्या कांचनच्या तपश्चर्येनंतर डॉक्टर काशिनाथ घाणेकर आणि कांचन चव्हाण यांचे रीतसर लग्न होते. त्यानंतर तीन वर्षांनी डॉक्टरांचे प्राणोत्क्रमण होते वयाच्या ५६व्या वर्षी. मधली विवाहाची दोन वर्षेही निर्वेध सुखाची जातात असे नव्हे. डॉक्टरांचे बेसुमार मद्यपान आणि त्यांचे नाटकांचे दौरे, यामुळे त्यात ताणतणाव असतातच.

### सोळा वर्षांची प्रदीर्घ प्रतीक्षा

आपल्या या सोळा वर्षांच्या प्रीतिसाधनेची कहाणी सांगण्यासाठी कांचन घाणेकर यांनी 'नाथ हा माझा' हा तब्बल ४७० पृष्ठांचा पसारा मांडला आहे. डॉक्टरांच्या दुसऱ्या स्मृतिदिनी हे सर्व लेखन पूर्ण करून डॉक्टरांच्या जन्मदिनी त्याचे प्रकाशन करण्याचा योगही त्यांनी जुळवून आणला. (काही किरकोळ प्रसंगांना व तपशिलाला फाटा देऊन हे निवेदन आटोपशीर करायला वाव होता. त्यामुळे त्याची वाचनीयता वाढली असती हे येथे नमूद करायला हरकत नाही.)

कांचन ही एक आधुनिक मीराच होय. अत्यंत प्रांजलपणे आणि संयमाने, आपल्या आंतरिक स्वाभाविक सरळपणाने, ऋजुतेने आपल्या आराध्य दैवताच्या प्राप्तीसाठी केलेल्या प्रयत्नांची हकीगत ही मीरा सांगते आहे; आणि लहानसहान तपशिलालाही विलक्षण अर्थपूर्णता या निवेदनात लाभते हे नाकारण्यात हशील नाही. कांचन चव्हाण यांचे काही ललित लेखन रसरंग वगैरे चित्रपटविषयक साप्ताहिकात आले असले तरी आत्मनिवेदन अत्यंत सिद्धहस्त लेखिकेच्या हातचे वाटते, इतके ते सफाईदार आणि भावस्पर्शी, नेमके आणि नेटके आहे. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या अनेक स्त्रियांच्या



अनुक्रमणिका

आत्मचरित्रात असणारा असमाधानाचा, असंतोषाचा थयथयाट यात चुकूनही आढळत नाही; आणि त्यामुळे या सबंध कहाणीला उच्च पातळीवरचे गांभीर्य प्राप्त झाले आहे. कुणाबद्दलही कडवटपणा नाही. जिथे कडवटपणा चालेल अशा प्रसंगांचाही उल्लेख किंचितशा उपरोधाद्वारे प्रकट होतो. चित्रपटसृष्टीच्या सन्निध वावरत असूनही कांचन आणि सुलोचना यांच्या निष्ठांचा जो आविष्कार या आत्मकथनातून होतो तो संस्कारमूल्यांनी परिपूर्ण आहे.

### चित्रपटाचे तंत्र – २१९ दृश्ये

हे निवेदन चित्रपटाच्या तंत्राने झालेले आहे. साडेचारशे पृष्ठांत २१९ दृश्ये आहेत. पाना-दोन पानांची. एकेक विशिष्ट प्रसंग उभा करणारी. आरंभीचे दृश्य आहे ते रायगडला जेव्हा जाग येते या नाटकाच्या प्रयोगात छाप पाडणाऱ्या संभाजीच्या भूमिकेतील डॉक्टर काशिनाथ घाणेकर यांचे. पडद्यावर दिसलेला उंचापुरा, भेदक डोळ्यांचा, देखणा, भरदार संभाजी पंधरा वर्षांच्या शाळकरी कांचनला भूल घालतो. नाटक संपल्यावर तंग सुरवार, बाह्यांचा गंजीफ्राक घातलेला, प्रकृतीने किरकोळ तरुण डॉ. काशिनाथ घाणेकर बघून तिची थोडी निराशाच होते. परंतु त्यांचा अस्सल अभिनय, गाभाऱ्यात घुमावा तसा घुमारदार आवाज आणि भेदक पाणीदार निळे डोळे– यामुळे डॉ. काशिनाथ घाणेकर हा नऊ अक्षरी मंत्र तिला भारून टाकतो. 'या आकर्षणाचे स्वरूप मला सापडत नव्हते. भाऊ, काका, मामा या नात्याचे लेबल त्याला नक्कीच नव्हते. मात्र खोलवर कुठेतरी बीज रुजले होते. माझ्या नकळत ते वाढत होते. (पृष्ठ ३). त्यांचा फोन आला तेव्हा हृदय आनंदातिरेकानं धडधडू लागतं; ओळख नाही म्हणून ती फोनवर बोलण्याचे टाळते; मात्र प्रयोगाच्या वेळी पुष्पगुच्छ देते. 'आता तरी झाली का ओळख?' हा डॉक्टरांचा मिस्किल सवाल तिला निरुत्तर करून जातो. एस. एस. सी. पास झाल्यावर कांचनला अभिनंदनाचे जे पत्र येते, त्यात 'तुझा डॉक्टरकाका' असे लिहिलेले असते, ते तिला खटकते. 'त्या नावाने त्यांना हाक मारायची नाही, नुसते डॉक्टर म्हणायचे, असे ती ठरवते. रमेश देव-सीमा लग्नानंतर परतताना रस्त्यात डॉक्टर तिला एक गुलाबाचे फूल देतात तेव्हा तिला संभ्रम पडतो– 'ते फूल सुंदर की त्या फुलासारखे निरागस दिसणारे तांबूस वर्णाचे डॉक्टर अधिक सुंदर' (पृ. २१). ज्युलिएटने रोमिओकडून ज्या भावनेने ते फूल स्वीकारले असेल त्या भावनेने मीही ते फूल स्वीकारले असे कांचन म्हणते. 'आजही ते फूल जपून ठेवले आहे' असे स्पष्ट करते.

डॉक्टर आणि कांचन यांच्या वयात १५ वर्षांचे अंतर आहे; पण ते अंतर आपल्याला कधी जाणवले नाही असे कांचन म्हणते. 'प्रेमाला वयच नसतं ना' (पृ. २३). डॉक्टरांचा वाढदिवस १४ सप्टेंबर. कांचनचा १२ सप्टेंबर त्यामुळे डॉक्टरही म्हणतात, कांचनपेक्षा मी फक्त दोनच दिवसांनी मोठा आहे. कांचन आपल्या वाढदिवसाला डॉक्टरांना बोलावू

म्हणते तर सुलोचनाबाई नको म्हणतात. का? डॉक्टरांची नवीन ओळख. बोलावले तर ते येणार आणि प्रेझेंट आणणार. कशाला त्यांना भुर्दंड? कांचन हिरमुसली होते. पण डॉक्टरच स्वतः फोन करून येतात. प्रेझेंट ते आणत नाहीत. चारुदत्त सरपोतदार आणतात. काय असते ते प्रेझेंट? डॉक्टरांचाच संभाजीच्या वेषातला फ्रेम केलेला फोटो.

**आकर्षणाची कारणमीमांसा**

डॉक्टरांकडे मी आकृष्ट होण्याचे काय कारण, याचा कांचन शोध घेते. डॉक्टरांच्या संभाजीवर तिचे प्रमे होते. कोकणस्थी मध्यम बांध्याचे डॉक्टरांचे व्यक्तिमत्त्व हे खरे तर तिच्या 'पुरुषी' प्रतिमेत बसत नव्हते. डॉक्टरांचे निळे डोळे, खळखळून हसणे, भावस्पर्शी चेहरा यापेक्षाही त्यांचे कलंदर व्यक्तिमत्त्व, बेधडक स्वभाव, रांगडेपणा, बेपर्वा वृत्ती तिला आवडली असावी. मध्यमवर्गीय ब्राह्मणी संस्कारामध्ये ही मराठजातीची वैशिष्ट्ये कशी, हा तिला प्रश्न पडलेला होता. परंतु डॉक्टर बराच काळपर्यंत केवळ एक आपली फॅन म्हणून तिच्याकडे पाहत असावे. सुलोचनाबाईदीदींची कन्या म्हणूनही तिच्याबद्दल त्यांना जवळीकअसावी. डॉक्टरांना आपल्याबद्दल तशी ओढ नाही असेही कांचनला जाणवत होते. आपले प्रेम अबोल, अबोध ठेवण्याकडेच तिचा कल होता. डॉक्टरांशिवाय इतर कुणाशी लग्न करायचे नाही असा निश्चय होता.

डॉक्टर विवाहित आहेत, डॉक्टरांची पत्नी इरावती स्त्री रोगतज्ज्ञ म्हणून स्वतंत्र प्रॅक्टिस करते, तिचा दोन-तीनदा गर्भपात झाला, त्यांना मूल नाही हे सारे कांचनला ज्ञात असते. इरावतीबद्दल ती आस्थाच बाळगते. डॉक्टरही तिला मनमोकळेपणाने आपल्या पूर्वजीवनाबद्दल सांगतात. ज्या स्त्रिया आयुष्यात आल्या त्यांची माहिती देतात. कांचनची त्याबद्दल समंजस भूमिका आहे. हा 'प्रिन्स चार्मिंग'. त्याला सख्या असणारच. हा आकर्षक म्हणून त्याच्या मागे स्त्रिया धावतात, हा तिचा युक्तिवाद. (पृ. ७४) तशात ती कोल्हापूरच्या परिसरात वाढलेली. दोन लग्ने, दोन बायका हे तिला अस्वाभाविक वाटत नाही. काही माणसे खादाड असतात, त्यात वावगे ते काय? वय वाढेल तसे हे खादाडपण कमी होईल असा विश्वासही तिला वाटतो. मधुचंद्रच्या शूटिंगच्या वेळी उमाबरोबरची डॉक्टरांची प्रणयदृश्ये कांचनच्या उपस्थितीत जमतात. कांचन बाहेर जाते. शॉट जमतो. ओके होते, अशी आठवणही कांचन देते (पृ. ९०). कांचनची आजी निधन पावते तेव्हा भेटायला आलेल्या डॉक्टरांच्या कुशीत कांचन शिरते. त्यानंतर डॉक्टर आपल्या कांचनवरील प्रेमाची प्रथम वाच्यता करतात. आपली प्रिया 'ती तशी काळीही नाही-गोरीही नाही; बारीक, जरा उंचच आहे,' असे सांगता सांगता 'तिचे केस मात्र खूप लांब, जाड आणि काळेभोर आहेत, म्हशीसारखे' म्हणून तिला चिडवतात (पृ. ९८). 'यू आर ए मॅग्रेट. तुझ्याकडे मी आपोआप ओढत गेलो' ही डॉक्टरांची कबुली तिला सुखावून जाते. पन्हाळ्याला तिच्याकडे डॉक्टर चुंबनाची मागणी करतात, तिचा स्वेटर चुकून राहतो तो

रात्री घालून झोपतात. 'तेवढाच तुझा सहवास' म्हणतात (पृ. ११९), पाडव्याला डॉक्टर तिला नेकलेस घेऊन देतात.

डॉक्टरांच्या दोन गोष्टी मात्र तिला आवडत नाहीत. डॉक्टरांचे मद्यपान आणि त्यांच्या शिव्या. सुलोचनाबाई त्यांना बजावतात, माझ्या घरी येऊ शकता, पण मद्यपान करून नाही. शिव्यांबद्दल डॉक्टरांचे स्पष्टीकरण असे : "अगं, मी कोकण्या माणूस आहे. शिवी हा माझ्या जीवनातील अविभाज्य भाग आहे." (१२४). मात्र कांचनने एक शिवी नकळत उच्चारली तर डॉक्टर नाराज होतात. "बायकांच्या तोंडी असे शब्द शोभत नाहीत."

आपण एका विवाहित पुरुषावर प्रेम करतो आहो हे कांचनला खटकतेच असे नाही. दुसरा विवाह ही कोल्हापूरला जगावेगळी गोष्ट नव्हती असे ती म्हणते. इरावतीचा प्रथम पत्नीचा अधिकार डावलण्याचीही तिची भावना नव्हती. इरावतीला मूल झाले असते तर मी डॉक्टरांच्या आयुष्यातून दूर झाले असते, असेही एके ठिकाणी कांचन प्रकट करते. डॉक्टर एकदा रंगात येतात तेव्हा कांचन सांगते : "जोवर लग्न होत नाही तोवर ही गोष्ट मला मान्य नाही", त्यावर डॉक्टरही वचन देतात, "मी स्वैराचारी म्हणून बदनाम असलो तरी तुझ्याबाबत संयमी राहीन." (१३९)

### हा वाघ बराच माणसाळलाय

दरम्यान डॉक्टरांना हृदयविकाराचा (एस्केमियाचा) झटका येतो. इरावतीचेही पुन्हा ॲबॉर्शन होते. पद्मा चव्हाण शेरा मारते, "हा वाघ बराच माणसाळायला लागला आहे" (१५२). कांचनलाही त्या वेळी टी. बी. होतो. ९० इंजेक्शन्सचा कोर्स पुरा करावा लागतो. डॉक्टर आव्हान घेतल्यासारखे म्हणतात– मी बघतो तू कशी बरी होत नाहीस ते (१५४). टी.बी. मुळे कांचनचे मनःस्वास्थ्य बिघडते. इकडे डॉक्टरांचे मद्यपान वाढते. कांचन त्यांना फोनवरून सांगते : विवाहित पुरुषावर प्रेम करणे योग्य नाही हे माहीत असूनही मी ते केले आहे. आता माघार शक्य नाही. मला अभंग साथ हवी आहे. पण तुमच्यावर आधीपासूनच एका आयुष्याची जबाबदारी आहे. दोन दोन आयुष्यांची जबाबदारी पेलणार असेल तर विचारपूर्वक हो म्हणा. मला हा चार दिवसांचा खेळ खेळणं पुन्हा जमणार नाही." (पृ. १५७). "राणी, तू मला हवी आहेस. दॅट्स ऑल. कशीही असलीस तरी हवी आहेस," हे डॉक्टरांचे उत्तर तिला अर्थातच आश्वस्त करते. औषधापेक्षाही डॉ. काशिनाथ घाणेकरांची प्रिया ही जाणीवच तिचा निम्मा आजार बरा करीत होती, असे ती मानते. आपले आयुष्य सुगंधित झालेय असे ती म्हणते.

डॉक्टर वरळीला नवा फ्लॅट घेतात. कांचनला दाखवतात. "डबल बेड एवढा मोठा कशाला?" ती विचारते. "होणाऱ्या बाळाला मध्ये झोपायला जागा नको का? मुलं किती लोळतात!" डॉक्टरांचे उत्तर. (१७७)

डॉक्टरांना भविष्याचा नाद. कांचनला पुण्याचे ज्योतिषी सांगतात : "विवाहित वा

घटस्फोटित अशा व्यक्तीशी लग्न होईल. वयात १३-१४ वर्षांचे अंतर असेल." (आणखीही एक वर संभवतो, असेही त्यांनी सांगून ठेवले आहे.) (१८३)

युरोप-मॉरिशस दौऱ्यात कांचन-डॉक्टर अधिक जवळ येतात. लंडनला इरावतीसाठी डॉक्टर एक साडी घेतात. इरावतीला न आवडली तर मी ही साडी नेसेन, असे कांचन म्हणते. तेव्हा डॉक्टर दचकून विचारतात, "तुला इरावतीनं घडी मोडलेली साडी नेसायला आवडेल?" त्यावर ती उत्तर देते, "त्यांचा नवरा मला चालतो तर त्यांची साडी का नाही चालणार?" (१९९)

युरोप दौऱ्यानंतर आपण संसार थाटायला हवा—लौकर, असे दोघांनाही वाटू लागते. घरी हा विषय काढायचा कसा, हा प्रश्न असतो. इरावतीशी घटस्फोट न घेता कांचनला पत्नीचा कायदेशीर दर्जा मिळण शक्य नव्हते. कांचनला स्वतःपुरती त्याची गरजही नव्हती, परंतु येणाऱ्या जिवाच्या आयुष्याशी खेळणे योग्य नाही, अशी तिच्या मनाची टोचणी होती. डॉक्टर आपण तो मुलगा दत्तक घेऊ असे सुचवतात. परंतु एकूण हा तिढाच असतो.

शेवटी डॉक्टर इरावतीजवळ हा विषय काढतात. "मीही अशी वागले तर चालेल का?" हा तिचा प्रश्न. पण डॉक्टर म्हणतात, "नाही चालणार. तूही मला हवीस."

### प्रेमाची परीक्षा– भालजी स्टाईल

सुलोचनाबाई कांचनच्या या कल्पनेला साफ नाही म्हणतात.

भालजी पेंढारकर सांगतात, "एक वर्षभर कांचनने डॉक्टरना भेटू नये, बोलू नये. त्यानंतरही प्रेम उरले तर पुढे बघू." कांचन ते वचन पाळते.

वर्षानंतर पुन्हा तोच प्रश्न. इरावती डॉक्टरांचे घर सोडून जाते. भांडीकुंडी, दागदागिने, कपडेलत्तेही घेऊन जाते.

भालजी कांचनला सल्ला देतात : तुझ्या व काशिनाथच्या जीवनपद्धतीत कमालीचे अंतर आहे. तरी तू त्याच्याबरोबर जीवन जगायची जिद्द धरतेस. त्यात तुला यश येवो."

इरावती घटस्फोट घेते. दुसरे लग्न करते.

नंतर सुलोचनाबाई राजी होतात. "माझ्या घरचे दरवाजे जावई म्हणून, मुलगा म्हणून तुम्हाला उघडे असतील. मात्र दारू पिऊन तुम्ही कधीही या घरी आलेले मला चालणार नाही." त्या बजावतात. "मला स्वयंपाक अगदी साधा लागतो– पोळी आणि शिकरण" असं मोठ्या फुशारकीनं डॉक्टर म्हणतात, तर सुलोचनाबाई ताडकन सुनावतात, "काळजी करू नका. यापुढे तुम्हाला ब्रेडबरोबर शिकरण खायला लागेल." (३४८) आपल्या लेकीला त्या चांगलं ओळखून असतात.

१२ मार्चला लग्न होते. हनीमूनसाठी कोल्हापूर आणि कोवाड. डॉक्टरांचे मद्यपान जोरात. बेतालपणा वाढतो. परतल्यावर कांचन आपल्या आईकडेच राहू लागते. सुलोचनाबाई डॉक्टरला आपल्या घरी राहायला बोलावतात. मद्यपान मात्र चालणार नाही

म्हणतात. डॉक्टर काही काळ तिथे राहतात. भालजींना हेही धक्कादायक वाटते. एकदम मद्य सोडणे, हेदेखील धोक्याचेच, ते कांचनला बजावतात. संजीवकुमारच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर डॉक्टर म्हणतात : "आता माझा नंबर लागणार."

लग्नानंतरही कांचनचे मत असते : मूल होऊ नये. त्या मुलाचे संगोपन नीट होणार नाही. कारण ते मूल वीस वर्षांचे होईल तेव्हा मी साठीत असेन, तुम्ही पंचाहत्तरीत. परंतु मुलाची ओढ तर डॉक्टरना विलक्षण. कांचनच्या मामेभावाची मुलगी रेश्मा, वय सव्वा–दीड वर्ष. डॉक्टरना बाबा म्हणते. हा मामेभाऊ अकाली मृत्यू पावतो. लग्नानंतर अडीच वर्षांनी. रेश्माची आई सांगलीला माहेरी राहायला जाते. पुढे रेश्माला डॉक्टर मुंबईत आणतात. आपली मुलगी मानतात.

विदर्भाच्या दौऱ्यावर असतानाच अमरावतीला डॉक्टरांचे निधन होते.

त्यानंतर दोन वर्षांत जे होते त्याची हकीगत 'अखेरचे पत्र' मध्ये येते.

एक भावपूर्ण अशी कथा– चटका लावून जाणारी. या साडेचारशे पृष्ठांमध्ये ती उलगडते.

**साजरे रूप**

मनावर ठसते ते कांचन-काशिनाथचे प्रेम. सुलोचना, भालजी पेंढारकर, चारुदत्त सरपोतदार, आजी इत्यादी व्यक्तींचीही यात यथातथ्य स्वभावदर्शने घडतात. परंतु मुख्य सूत्रावरून त्यांच्यावर लक्ष केंद्रित होत नाही. इरावतीबाईंबद्दलचे जे उल्लेख आहेत ते अत्यंत आदराचे असेच आहेत. फक्त शेवटच्या पत्रात मात्र काहीसा तक्रारींचा सूर आहे तो काशिनाथच्या मृत्यूनंतर त्या कशा वागल्या, कोर्टात गेल्या या संदर्भात. डॉक्टरांच्या निरनिराळ्या नाटकांतील वा चित्रपटांतील भूमिकांचे स्वागत कसे झाले याबद्दलच्या वृत्तपत्रीय प्रतिक्रिया वा कानेटकर प्रभृतींच्या पत्रांमधला मजकूरही उद्धृत करण्यात आला आहे. या प्रेम कहाणीला त्या प्रतिक्रियांनी वा पत्रांनी तशी मदत होत नाही; परंतु डॉक्टर काशिनाथ घाणेकर यांचे हे चरित्रही लिहू जाता जाता ही भूमिका पत्करल्याने त्यांना स्थान देणे आवश्यक वाटले असावे. निखळ प्रेमकहाणी आणि तिच्या गरजेनुसार हे तपशील मोजकेच आले असते तर हे निवेदन आटोपशीर आणि वाचनीय झाले असते. परंतु एकूण या आत्मकथनाला आलेले रूप साजरे जमलेले आहे. डॉक्टर घाणेकर आणि त्यांचे वैयक्तिक जीवन, त्यांचे अतिरिक्त मद्यपान, त्यांचे मानसिक अस्वस्थपण, मित्रांना व चाहत्यांना ओढ लावणारे आपलेपण व अगत्य– या सर्वांचे कमी-अधिक स्पष्ट-अस्पष्ट चित्र या आत्मनिवेदनातून प्रकट होते. डॉक्टरांच्या चाहत्यांना हे अंतरीचे गुज निश्चितच अमोल खजिना गवसल्याचा आनंद देईल.

(नाथ हा माझा : कांचन काशिनाथ घाणेकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, १२१६, सदाशिव पेठ, पुणे ३०. पृष्ठे ४७२ + ८ + आर्ट प्लेट्स. एकशे पन्नास रुपये.)

(शंकर सारडा, ८५७ शनिवार, सातारा.)

# चंद्रबनातल्या सावल्याः चंद्रकुमार नलगे

## वारणा खोऱ्याचा ललितगरिम्यानं घेतलेला शब्दवेध

शिवाजी सावंत

प्रा. चंद्रकुमार नलगे यांनी शब्दरूप केलेले 'चंद्रबनातल्या सावल्या' हे ललितलेखांचं पुस्तक, त्याच्या शीर्षकाचा खोलाशय काय असावा याचा विचार करीत नुकतंच एकटाकी वाचलं. कधी अण्णाभाऊ साठे, कधी गदिमा, तर कधी माडगूळकर यांची सय मनी जागविणाऱ्या या बनातील सावल्यांनी फार दिवसानंतर एक रसरशीत, बावनकशी, रसबाळा असा साहित्यसुखानंद दिला हे आवर्जून नोंदलं पाहिजे.

या बनात एकूण सोळा 'चांदणसावल्या' म्हणजे ललित लेख आहेत. 'वारणा खोरे' म्हणून महाराष्ट्रभर विख्यात असलेल्या भूभागाच्या परिसरावरचे हे लेख आहेत. हा परिसर पन्हाळा, मलकापूर, बिळाशी, बत्तीस शिराळा, चिखली, मांगरूळ, कोकरूड अशा गावांनी वेढलेला आहे. जलसंपन्न वारणा नदी ही या खोऱ्याची 'धरणीमाय'। जशी मध्यप्रदेशात चंबळा तशी ही कोल्हापूर जिल्ह्यात वारणा. दाट पाणवाणाची! अण्णाभाऊ साठ्यांचा 'फकिरा' याच खोऱ्यातला. शिवकालात या खोऱ्यानं अनेक मावळेवीर अंगाखांद्यावर दौडविले. स्वातंत्र्यलढ्याच्या काळात कैक स्वातंत्र्यलोभी क्रांतिकारक खोऱ्याचा आश्रय घेऊन ब्रिटिशांविरुद्ध आपले क्रांतीचे डावपेच खेळले. लेखक नलगे यांचे जन्मगाव 'भेडसगाव' याच वारणा खोऱ्यातील.

इथं फुलांचे, पक्ष्यांचे, प्राण्यांचे इतके विविध निर्देश आणि तेही बावनकशी– नंबरी ग्रामीण बोलीभाषेत सहज उतरले आहेत, की वारणा खोरं न बघितलेल्याही वाचकाच्या डोळ्यांपुढे ते खोरं टक्कन उभं राहावं. किमान त्याच्या बघण्यातलं तरी एखादं पाणथळाचं असं खोरं त्याला स्मरून जाईल खासच.

नलग्यांच्या ह्या रसरशीत प्राकृत निसर्गदर्शनात तेलमुंगळया, इजट, अस्वल, साळींद्र, वानर, कासव, साप, मधमाशा, विंचू, मासे असे नाना प्रकारचे प्राणी नाना ढंगात अवतरतात. त्यांनी वर्णन केलेली गावतळ्याकाठची कासवांची थळी श्रीनिवास कुलकर्णींच्या डोहमधील मगरींची हमखास आठवण देते.

या सावल्यांच्या बनात घाणेरी व दुर्लक्षित झुडुपापासून करवंदी, कटकीपर्यंत नोंद येते. कपड्याला कूस डसविणारे गवत इथे आहे तर पैरणीवर काटे सोडणारा सराटाही नलगे न विसरता पकडतात.

इथलं 'कंबळाचं झाड' म्हणजे खरं कदंबाचं झाड. इथलं 'बंफराचं' झाड म्हणजे

तोरंजनाचं झाड. फुलं आणि पक्षी तर या सावल्यात कवडशागणिक पखरून पसरलेले भेटतात. गुलमुस, आघाडा, प्राजक्त, आंब्याचा मोहोर, चाफा अशी फुलं दिसतात. गुलमुसांची किरमिजी माळ गणेशाला गळयातील कौस्तुभमालेपेक्षा शोभा आणते. धनछडी, खंड्या, गोसावीन, टिटवी, वाघुळ, घुबड, बगळे, कावळे, भोरड्या असे पक्षी या लिखावटीत सहज फेऱ्या मारतात.

माणसांच्या दुनियेत इथं वासुदेव, कैकाडी, गोंधळी, तराळ, मारुती, वैदू, काशीकापडी, दांगट, अस्वलवाले, माकडवाले असे सर्व रोकडे गावरान मासले नांदी देऊन जातात.

लेखक चंद्रकुमार नलगे यांची भाषा व निष्ठा व परिश्रमपूर्वक त्यांनी कमावलेली अशी. त्यांची म्हणून एक साजिवंत लेखनशैली इथं पानापानावर प्रकर्षानं जाणवते. इतरत्र क्वचितच आढळणारा हा घाट समजण्यासाठी मला सहज जाणवले ते काही मासले वानगीदाखल बघावेत–

'लुसलुशीत कोवळया पांढऱ्या फेक गाजरांची शेंग (भुईमुगाची) वयात आली तरी आमच्या स्वप्नांची राणी तीच– धरणी कूस बदलून निवांत झालेली असते. गुरांच्या पायांनाच वाटा फुटतात.. (नलगे तिसरीच्या यत्तेत नाहीत.) बुकात शिकत असतात. खड्र्यातील लसणीच्या वासानं सूर्यनारायणाच्याही तोंडाला पाणी सुटतं. तो कुण्याच्या भाकरीवरचा लोण्याचा गोळा वितळून टाकतो... सांजेला रानातली पाखरं 'आंबेदाखल' होतात... नांगराच्या तासातून देवश्रेष्ठाचा शेष मातीतून 'वेरोळन'वर येतो... कासवांची पिलं 'कुलपत कुलपत' चालतात, तर नागसापांची बिलं 'निळनिळत' सळसळतात."

लेखकानं काही काही शब्द तर कुठून शोधून काढलेत असा काही जागी अचंबाच वाटतो. उदा. बत्तरबाळया (चिरफळया). भुकेचा आळका (भुकेला हलका), आगराळी (अंतराळी, उंचावर), झेंडाळ (झोंबी घेणारी), बारकुली मन (छोटी मनं), पहाट जागरल्या (पहाटे उठलेल्या), उबाक (उबदार, गरम), कोटींबर (गर्दी, दाटी), आंब्याचं पिकवान (आंब्याची आढी), उमत (उमेद), तापानं हंमलं (तापानं फणफणलं), काळीज तकणं (धीर धरणे), अलाकलेली हुंबरं (पिकून लिबलिबीत झालेली उंबरं), गलका आंबा (टेच पिकलेला आंबा), अच्यात (अलगद), साडंसिल्लीचा (इदरकल्याणी), उपसाक (तडकू डोक्याचा), भिर्डीला येणे (तिरीमिरीला येणे), आवाकल्यागत होणे-करणे (विमनस्क असणे), आठू येणं (आठवण होणे). अशा कितीतरी शब्दांच्या अर्थपूर्ण, लयदार, शब्दांच्या भंडारामुठी मुक्त हस्तानं या शब्दवेधात उधळलेल्या आढळतील.

अशा लिखाणात व्यक्तिरेखांकन करावं लागतं ते अत्यंत धावतं. थोड्या घटनांत. मोजक्या संवादात. माफक वर्णनात. संपूर्ण पुस्तकभर हे भान कौशल्यानं राखलं आहे.

चंद्रबनातल्या सावल्या या लेखात नलगे सहज लिहून जातात. – चांदण्यांच्याही अनेक तऱ्हा. कधी प्रसन्न टिपूर बनतं, कधी दाट तर कधी विरविरीत. कधी वेडाचा झटका

यावा तसं बोलकं होतं. कधी नशापाणी केल्यागत वागतं. काहीबाही बरळत राहतं. कधी इतकं हसरं बनतं की, हसता हसताच टचकन त्याच्या डोळ्यातनं पाणी यावं.."

लेखाची शीर्षकाप्रमाणं अशी सुरुवात करून, लेखक आपण व वडील यांच्यातील एक खोलाची आठवण लिहितो. वडील शेतातून घरी आलेले नाहीत म्हणून आई म्हणते, "चांद किती वर आलाय. अजून बी ह्येनी येऊनी का जेवायला? माणसानं कंची म्हणून काळजी करायची! ये.... नमा... तू तरी भाकरी घेऊन जा की बाबा." या संवादानंतर बारकुल्या वयाचा लेखक अर्धुलं काळीज घेऊन 'निबर' चांदण्यातून शेताकडं निघतो. वाटते थोराड दरडीचा जबडा पसरून खोल खोल ओढा आहे, आजूबाजूला खुनी शिवंचा ओढा, फराऱ्याचं ठाणं, वाघाची घळ, मरीआईचा माळ, बंडवाल्यांनी होळया पेटवून त्याची त्या माळावर केलेली राख, असा सारा भयाण नजारा आहे. बारक्या जीव मुठीत धरून चालला आहे. शिवकालात कामी आलेल्या त्याच्या रायाजी नलगे नावाच्या पूर्वजाच्या रानात वडील आहेत. त्यांचा आवाज कधी एकदा कानी पडतो म्हणून बारक्या आसुसला आहे.

शेवटी आपल्या रानाजवळ येताच तो दुरूनच मोठ्यानं साद घालतो, "दाऽदाऽऽ!"

प्रतिसाद येतो, "काय रं नमा... ये-ये... मी हाय इथं..... सावकाशीनं ये....!' आणि आत्ता कुठं 'निबर' चांदण्याला चैत्राची पालवी फुटते!

अशा या 'चंद्रबनातल्या सावल्या' लेखक भरभरून मांडतो, तरीही त्याच्याच शब्दात सांगावंसं वाटतं, 'केवढं मोठ्ठं आभाळ! त्यात न मावणारं चांदणं!'

म्हणून लेखक चंद्रकुमार नलगे, या पुस्तकात माववून दाखविलेल्या चांदण्याबद्दल तुमचे हार्दिक अभिनंदन. तसेच 'उरलेले चांदणे' तुम्ही केव्हा शब्दबद्ध करताहात यासाठी प्रतीक्षा!

(चंद्रबनातल्या सावल्या : चंद्रकुमार नलगे. सुरेश एजन्सी, पुणे. पन्नास रुपये)

(शिवाजी सावंत, विवेकानंद गृहरचना, राधाकुंद, पर्वती, पुणे ३०.)

---

**समीक्षा**

१. बालकवींचे काव्यविश्व- डॉ. म. सु. पाटील, चेतश्री प्रकाशन, अमळनेर. १-१९८९, पृष्ठे १०९. पस्तीस रुपये.
२. शब्दसमीक्षा- मु. श्री. कानडे, सन पब्लिकेशन. ३१०, नारायण पेठ, पुणे ३०. १-१९८९, पृष्ठे-१२७. पंचेचाळीस रुपये.
३. साती-ग्रंथ-स्वरूप आणि समीक्षा- कृ. पं. देशपांडे, सन पब्लिकेशन, पुणे ३०, १-१९८९, पृष्ठे २५५, ऐंशी रुपये.

---

# काही जुने काही नवे : डॉ. गोविलकर

## वेगळे विचार देणारा लेखसंग्रह

**विद्या जोशी**

एखादा ग्रंथ अभ्यासताना अनेक विचार सुचतात. वेगवेगळ्या वाटेने जाणाऱ्या ह्या विचारांचे मनोगत काही वेळेला विरून जाते, काही वेळेला शब्दबद्ध होते.

या लेखसंग्रहात महानुभाव गद्यापासून ते बखरवाङ्मयापर्यंत; प्राचीन गीतरचनेपासून पंतकवींपर्यंत आणि मुक्तेश्वरांपासून जयवंत दळवी– ज्योत्स्ना देवधरांपर्यंत विषय आले आहेत. महाविद्यालयीन अभ्यासक्रमासाठी लावलेल्या पुस्तकांच्या आस्वादाचे चिंतन यात आहे.

मराठी तत्त्वज्ञानाची परिभाषा तयार नसतानाही महानुभावांनी मराठीत तत्त्वज्ञान सांगण्याचा प्रयत्न केला. हे तत्त्वज्ञान सांगण्याची नवी पद्धती हे श्रीचक्रधरस्वामींच्या गद्यात्मक ग्रंथाचे वेगळेपण आहे. पद्यलेखन न केल्याने पंथाच्या प्रसाराच्या दृष्टीने कसा तोटा झाला याची नोंद डॉ. गोविलकर घेतात. प्राचीन गीतरचनेतील एकसुरीपणा, भावनांची संमिश्रता, त्यातील समाजाची प्रवृत्ती इत्यादी प्रश्नही त्या विचारात घेतात.

मुक्तेश्वरांचे 'विराटपर्व' आणि 'संक्षेप रामायण' या लेखांतून मुक्तेश्वरांचे पंडिती काव्यातील मोठेपण, तसेच मुक्तेश्वरी प्रतिभेची झलक ही एकट्या विराटपर्वातही कशी दिसून येते याचा रसास्वाद आहे. 'संक्षेप रामायण' हा महाभारतानंतरचा ग्रंथ आहे. या विधानावर आक्षेप घेऊन त्याचे खंडण करून महाभारत हेच 'संक्षेप रामायणा' नंतर लिहिलेले आहे, असा युक्तिवाद केला आहे.

शाहिरी वाङ्मयातील ऐहिकता म्हणजे मराठी कवितेला वास्तवाचे भान आणण्याचा प्रभावी प्रयत्न, असे डॉ. गोविलकर म्हणतात. ही ऐहिकता मराठी कवितेला नवी दिशा देणारी होती. पण नाट्य, संगीत, नृत्य, सामान्य प्रेक्षकांची अभिरुची व मनोरंजन यामुळे ती मराठी काव्याला विशेष समृद्धी देण्यास असमर्थ ठरली. बखर वाङ्मय आणि ऐतिहासिक कादंबरी हे दोन्ही वाङ्मय प्रकार वेगळे आहेत. बखर ही कालखंडात सत्य, इतिहास कथन, जतन आणि प्रसारित करते. सत्य इतिहासाला वाङ्मयीन गुणांची जोड देते. इतिहास कथनाचा बखर हा प्रमाणभूत प्रकार कसा होता याचे विवेचन या लेखांमध्ये आढळते.

बालकवी म्हणजे निसर्ग, हे समीकरण. त्यांची कोणतीही कविता वाचताना त्याचे भान ठेवायला पाहिजे, हा बालकवींच्या व्यक्तित्वाचा विशेष ठासून सांगितला आहे. कुसुमाग्रजांची कविता 'जीवनलहरीं' या कवितासंग्रहात कशी आधीच भेटते, याचेही वर्णन

गोविलकर करतात. जयवंत दळवी यांचे नाटककार म्हणून श्रेष्ठत्व सांगतात, तर ज्योत्स्ना देवधरांच्या 'घर गंगेच्या काठीं' चे सौंदर्यही विशद करतात.

'स्त्रियांचे लेखन– काही मर्यादा' या लेखात काशिबाई कानिटकरांपासून आजवरच्या स्त्री लेखनाचा धावता आढावा घेतला आहे. काळावर ठसा उमटविण्याचे कार्य केशवसुत, मर्ढेकरांप्रमाणे लेखिकांना जमले नाही, याची खंत डॉ. लीला गोविलकर नोंदविताना दिसतात.

डॉ. बारलिंगे यांची प्रस्तावना वाचनीय आहे. समीक्षेचा आव न आणणारा पण वेगळे विचार देणारा हा संग्रह मराठी वाङ्मयाच्या ऐतिहासिक कालखंडाचे साद-पडसाद उमटविणारा आहे.

(काही जुने काही नवे- डॉ. लीला गोविलकर, मिहीरा प्रकाशन, अहमदनगर वीस रुपये.)

(विद्या जोशी, ४१ दामले निवास, डी. एल. वैद्य रोड, शिवाजी पार्क, मुंबई २८)

---

# प्रकाशाची खिडकी : रवींद्र पिंगे

## निरनिराळया हाकांमागे घेतलेली उत्सुक धाव

डॉ. सुशीला पाटील

---

'प्रकाशाची खिडकी' हे रवींद्र पिंगे यांचे सोळावे पुस्तक. पंचवीस ललित लेखांचा हा संग्रह. यातील बहुसंख्य लेखांचा मोहरा 'प्रकाशाच्या खिडकीकडे' वळलेला आहे. आधाराशिवाय प्रकाशाला अर्थ नाही. म्हणून काही लेखांत मानवी जीवनातील अंधारही पार्श्वभूमीदाखल आला आहे.

ललित लेखाचा विषय दर वेळी वेगळा असतो. पण या लेखनाचा विशेष म्हणजे, हे स्फुट लेखन लेखकाच्या अंतरंगाच्या गाभ्यातून उमलते. त्यामुळे त्याच्या मनाचा सारा कस त्या लेखनात उतरतो. त्याचे संस्कार, त्याची अभिरुची, त्याची आवड-नावड त्याच्या आशा-आकांक्षा, त्याची ध्येयधोरणे, त्याच्या आयुष्यातील संस्मरणीय प्रसंग अन् त्याच्या मनात धुमसत राहणाऱ्या, त्याला अस्वस्थ करणाऱ्या घटनाही त्याच्या या ललित लेखनातून हुंकारत असतात. त्याच्या मनाचे हे हुंकार त्याच्या शब्दकलेतून ऐकणे हा एक अपूर्व आनंद असतो. एरवीही वाङ्मयनिर्मितीत आत्माविष्कार असतोच, पण ललित लेखनाला गहिऱ्या आत्ममग्नतेची डूब असते. लेखकाच्या स्वभावधर्माचा ताठ कणा हा या लेखनाचा जीवनाधार असतो. लेखकाच्या अनिर्बंध, उत्स्फूर्त अन् मनमोकळया

आत्माविष्कारातून लेखकाचे नितळ पारदर्शक मन अभिव्यक्त होत राहते. त्याचे जीवनविषयक चिंतन, त्याला गवसलेली काही जीवनमूल्ये, त्याचे समाजाचे निरीक्षण आणि परिस्थितीविषयीचे आराखडे, हे सारे ललित लेखनातून वाचकांपुढे उलगडत राहते.

पिंग्यांची अनेकांगी संवेदनक्षमता या संग्रहातून सतत डोकावते. माणसाचे मन कुणाकुणाच्या हाकेला केव्हा अन् किती घनिष्ठपणाने 'ओ' देते, याचे एक सुरेख चित्र 'रानावनाची हाक' (पृ. ९) मध्ये आढळते. लहानपणापासूनच्या अनेक हाका त्यांना स्मरतात. त्या हाकांमागे आपण कसे दौडत गेलो ते आठवते. त्या हाकांमागील एक सूत्र त्यांना जाणवते. ते अधिकाधिक प्रगल्भ होत गेलेले दिसते. शरीरापेक्षा मनाच्या आणि त्यानंतर आत्म्याच्या हाका पुढे वाढत जातात. लौकिक जगातील अलौकिक भावबंध उत्कटतेने हाकारत राहतात. जेवायला वाढले म्हणून ऐकू येणारी आईची बालपणातील हाक त्यांना आठवते. पुढे समज आल्यावर क्रिकेट खेळायला बोलावणाऱ्या मित्राची हाक त्यांना मैदानावर खेचते. त्यानंतर ऐन तारुण्यात देशस्थितीचा विचार करताना ऐकू येणारी देशभक्तांची हाक त्यांच्या कानी येते. पुढे उत्तमोत्तम पुस्तकांनी घातलेली साद त्यांना आठवते. त्याचप्रमाणे एकदा केव्हातरी पाहिल्यावर मनाच्या कोपऱ्यात जिवंत राहणारे सागरकिनारे, नदी-ओढे, डोंगरदऱ्या, वाडवडिलांनी कसलेली जमीन हेही त्यांना अधूनमधून हाकारत राहतात. त्या त्या ठिकाणी जाऊन एक तृप्ती घेऊन ते परततात. पिंग्यांचे मूळ गाव उपळे. मुंबईला स्थायिक झाले तरी त्यांना गावाची– शेतजमिनीची हाक अधूनमधून ऐकू येते. त्या आठवणीने ते अस्वस्थ होतात अन् गावाला जातात. पूर्वजांनी मशागत केलेली परंतु आता मात्र त्यांची मालकी नसलेली जमीन ते पाहून येतात. स्वामित्व गेले पण आत्मीयता मात्र अबाधित राहिली. पूर्वीचा त्या मातीशी जडलेला भावबंध कायम राहिला. पिंगे म्हणतात– "जमिनीची हाक ऐकू न येण्याइतकी बधिरता अजून आलेली नाही.' (पृ. ४१)– अशी ही हळुवार संवेदनक्षमता जपणारे पिंगे या संग्रहात सतत दिसतात. काही अनोळखी पण कौतुकाने भारलेल्या हाकाही पिंगे ऐकतात. एखादा अपरिचित वाचक रस्त्यात हाक मारतो. त्यांचे लेखन आपणांस आवडते म्हणून आवर्जून सांगतो. कधी एखादा वाचक त्याला मिळालेल्या वाचनानंदाची कृतज्ञता म्हणून त्यांना मासे खाण्यासाठी वीस रुपये देतो. (पृ. १७). पिंगे मासे स्वतःच्या पैशाने घेतात आणि ती वीस रुपयांची नोट जपून ठेवतात. ती त्यांच्या लेखनाने वाचकाला दिलेल्या आनंदाची जिवंत पावती असते. आपल्या लेखनाला वाचकांकडून दाद मिळाली की होणारा आनंद अभूतपूर्व असतो. पर्ल बक या लेखिकेचा एक बोलका अनुभव पिंगे सांगतात. (पृ. २९).

काही व्यक्तींच्या जीवनातील चढउतार पाहूनही ते अस्वस्थ होतात. माणसाचे सारे दिवस सारखे नसतात. पोवाडेवाल्या खाडिलकरांनी ऐन उमेदीत नाव कमावले. साहित्यिक जी. के. चेस्टरटन, चित्रकार रावबहादूर धुरंधर, भावगीतकार स. अ. शुक्ल,

या साऱ्यांनी एकेकाळी रसिकांना धुंद केले, पण पुढे त्यांच्या वाट्याला विपन्नावस्था आली. (पृ. ८२) हे पाहून पिंगे उदासवाणे होतात. नियतीची ही लीला पाहून ते म्हणतात, 'नियतीला दोन दोन हात आहेत. एका हाताने ती नवे नवे श्रीकार टाकून आकाश उजळत जाते आणि दुसऱ्या हाताने फळ्यावर अगोदर लिहून ठेवलेली लक्षमोली अक्षरं अलगदपणे पुसून नामानिराळी होते. कालचं आज उरत नाही.' (पृ. ८०). जीवनातील ही ओसाड पाहून पिंगे खिन्न होतात. कुठले अदृश्य हात आपल्या आयुष्याला घाट देतात ते त्यांना कळत नाही. समर्थांवरील लेखाची हकीकत वाचनीय आहे.

पिंग्यांना निसर्गाचे आकर्षण आहे. निसर्गाचे रुद्रभीषण रूपही त्यांना मोहवते. गावात जाताना शेताच्या वाटेवर त्यांना नाग दिसतो. त्या क्षणी ते हादरतात. पण लगेच नागाविषयीच्या विधायक समजुती त्यांना आठवतात अन् त्यांची भीती बोथट होते. निसर्गातला तो भयावह अनुभवही ते मनाच्या कोपऱ्यात जपतात. पशुपक्षीदेखील प्रेमाला जागणारे अन् कृतज्ञता दर्शवणारे असल्याचे त्यांच्या पाहण्यात येते. माधवमनोहरांचा खारीच्या संदर्भातला हृद्य अनुभव (पृ. ४७) आणि एका कप्तानाचा दुखऱ्या पक्ष्याविषयीचा अनुभव ते (पृ. ४८) विलक्षण तन्मयतेने नमूद करतात.

कित्येक चांगल्या पारंपरिक बाबींना ओहोटी लागलेली त्यांना दिसते. ऑर्केस्ट्रापुढे व्याख्यानांचे महत्त्व अलीकडे लोकांना उरलेले नाही. सभागृहात भाषणांऐवजी मंगल कार्ये होत आहेत. वाचन दिवसेंदिवस कमी होत चालले, याबद्दल त्यांना वाईट वाटते. वाचना-चिंतनाऐवजी टी. व्ही., व्हिडिओ वेळ खात बसलेले पाहून 'यापुढचं जग फक्त दोन घटका करमणूक करणाऱ्या गारुड्यांचंच असेल का?' (पृ. १११) या प्रश्नाने ते सैरभैर होतात. वाचन, चिंतन, मनन याशिवाय जगाचे पुढे कसे होणार हे त्यांना कळेनासे झाले आहे.

पिंग्यांच्या मनाचे असे कितीतरी पीळ येथे उलगडले आहेत. त्यांची ही मनमोकळी चिंतने ललित रम्य शैलीने अधिकच देखणी झाली आहेत.

(प्रकाशाची खिडकी : रवींद्र पिंगे. विमल प्रकाशन, ६९३ नारायण, पुणे ३०. पृष्ठे. १२०. चाळीस रुपये.)

(डॉ. सुशीला पाटील, ज्ञानदीप, राठीनगर अमरावती ४४४६०३)

---

**साभार-स्वीकार**

English

१ GADYARAJA– Ian Rdeside, पॉप्युलर प्रकाशन मुंबई ३४ १-१९८९, पृ.– ३१२

---



अनुक्रमणिका






# अंगणातील चांदणं : रवीन्द्र पिंगे

## चांदण्याची शीतलता देणाऱ्या व्यक्ती

डॉ. गं. वि. नेर्लेकर

'व्यक्तिचित्रे' हा वाङ्मय प्रकार सध्या अधिक लोकप्रिय होत आहे. पु.ल. देशपांडे, व.पु. काळे, यांनी अनेक व्यक्तिचित्रे सादर केली आहेत. रवींद्र पिंगे यांनी १०० हून अधिक व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. **शतपावली, देवाघरचा पाऊस, लामणदिवे ...** याच पठडीतला **अंगणातलं चांदण** हा १७ व्यक्तिचित्रांचा संग्रह आहे.

पिंगे हे काव्यात्म वृत्तीचे आहेत. बा.भ. बोरकर, कवी यशवंत, सदानंद रेगे, अनंत काणेकर, कॅप्टन लिमये, पु.भा. भावे, नाटककार कालेलकर यांच्याविषयीचे मृत्युलेख म्हणजे त्या त्या व्यक्तिमत्त्वाचा भावपूर्ण शोधच. दैवी आशीर्वाद लाभलेल्या कविवर्य बोरकरांचा सहवासही सुखद असे. त्यांची कुठलीही कविता वाचा. चांदण्यात चक्कर टाकून आल्याचा भास होतो. पिंगे म्हणतात, 'लामणदिव्यासारखी संथ तेवत राहणारी निसर्गदत्त काव्यप्रतिभा व झऱ्याच्या पाण्यासारखे पिढ्यांमधून झिरपत आलेले घरंदाज संस्कार यामुळे कविता रसाळ व भावपूर्णच उतरे.' निर्व्याज चिंतनशील वृत्ती, निसर्गाची ओढ, भाषाप्रेम व अध्यात्म्याशी जवळीक व स्वप्नाळू काव्यात्म प्रवृत्ती हे बोरकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे पैलू सहजपणे टिपले आहेत.

काणेकरांचा रुबाबदार पोषाख, हसतखेळत जगण्याची विनोदी वृत्ती, प्रवासाची आवड, निरागसता, समंजस वृत्ती इ. चे दर्शन घडवून त्यांच्यापासून आपण काय शिकलो हे पिंग्यांनी सूचकपणे सांगितले आहे. काणेकर स्वतःच्या मर्यादा जाणणारे होते. त्यांच्या मते, 'बहरात फुला आणि ऋतू पालटल्यावर शांत राहा. दुसऱ्याच्या गुणांबद्दल सदैव अगत्य भाव दाखवा.'

प्रा. ल. ग. जोग यांच्यासंबंधीचा लेख लाजवाब उमटला आहे. जोगांचे कोकणीपण, विद्यार्थिप्रेम, अध्यापनकौशल्य, कोठल्याही टोळीत सामील न होण्याची वृत्ती, संशोधन वृत्ती, शुद्ध चारित्र्य, धीरगंभीर वृत्ती, निरासगता, इ. पैलूंचे दर्शन घडवून म्हणतात की विद्यार्थ्यावर अपार प्रेम करणारा जोगांसारख्या प्राध्यापक विरळाच.

कविवर्य कुसुमाग्रज, व. पु. काळे, माधव मनोहर, उमाकांत ठोमरे, व. दि. कुलकर्णी यांची ठसठशीत, गुणगौरवपर पण नेमस्त व्यक्तिचित्रे आहेत. डॉ. व. दि. कुलकर्णी यांचा भिडस्त स्वभाव, त्यामुळे लोक त्याचा कसा फायदा उठवतात ते मिष्किलपणे पिंगे सांगतात. माधव मनोहर यांचा जिव्हाळा, ज्ञान, जीवनदृष्टी,

फटकळपणा, अभ्यासू वृत्ती, मार्गदर्शन यांमुळे अनेकांच्या आयुष्यात चांदणं फुललं असं ते म्हणतात. यशवंतराव चव्हाण यांचे व्यक्तिचित्र म्हणजे अल्पाक्षरी अभिजात शब्दलाघवच वाटले.

गुणग्राहकता, कृतज्ञता, सखोल ग्रंथाभ्यास, डोळस निरीक्षण, निरागस मैत्री, मधुकर वृत्ती यामुळे त्यांचे लेखन प्रासादिक, आटोपशीर व काव्यपूर्ण झाले आहे. हे सर्व लेखन एक प्रकारच्या जिव्हाळयातून निर्माण झाले आहे. त्यामुळे त्याला चांदण्याची शीतलता प्राप्त झाली आहे.

(अंगणातलं चांदणं– रवींद्र पिंगे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, चाळीस रूपये)

(डॉ. गं.वि. नेर्लेकर, ७, कांजूर विनायक सोसायटी, भांडुप पूर्व, मुंबई ७८)

# एक पानीः शांता शेळके

## वाचकांशी संवाद साधणारी प्रसन्न स्वगतं

चंद्रशेखर रामराव पाटील

प्रथमदर्शनी प्रेमात पडावं अशी पार्श्वभूमी असलेलं 'एक पानी'चं मुखपृष्ठ! पानापानांचा चॉकलेटी रंगाचा चौकोन नि त्यातून खाली वळलेले एक छोटेसे हिरवे पान, तेही मूळ चौकटीबाहेर; पण पार्श्वभूमी मात्र सफेत! प्रस्तावना वाचण्यापूर्वी शीर्षक नि मुखपृष्ठच आजकाल पुस्तकाचं स्वरूप सांगून टाकतं, याचं हे प्रत्यंतर! पुस्तकाकडं आकृष्ट व्हायला सरवटे यांचं हे मुखपृष्ठच अधिक कारणीभूत झालं.

जेव्हापासून जाणीवपूर्वक वाचायची सवय लावून घेतली तेव्हापासून प्रस्तावना प्रथम, नंतर मूळ पुस्तक, या सवयीला अनुसरून 'थोडेसे एक पानीविषयी' हे लेखिकेचे विचार प्रथम वाचले. ललित मासिक वाचत असे. तेव्हा, खरोखर या सदराबद्दल मनात उत्कंठा असायची. शेळकेबाईसारख्या सिद्धहस्त लेखिकेने थोडक्यात परंतु मर्मग्राही शब्दातून व्यक्त केलेले विचार वाचून मन अन्तर्मुख होई. केशवसुतांच्या कवितेची ती प्रसिद्ध ओळ आठवे, "साध्याही विषयात आशय किती मोठा पहा आढळे" एखादे संस्कृत सुभाषित. पंडिती काव्यातील एखादी कविता अगर त्यातील काही चरण या प्रत्येकावर 'एक पानी' सदर लिहिले गेले आहे. 'नैमित्तिक एक पानी'ही खूप आहेत. उदा. दि. बा. मोकाशींवरील 'पाचवी खुर्ची', किंवा पु. शि. रेग्यांवरील 'मधाचे पक्षी'.

वैयक्तिक अनुभव मोजके नि अर्थगर्भ शब्द यांच्या सुंदर मिलाफाचे दर्शन 'एक पानी'तून घडते. लेखिकेचा जुन्या मराठी वाङ्मयाचा सूक्ष्म अभ्यास मनाला विस्मित

करतो. पाठांतराची आवड, संतवाङ्मयातील काव्य किंवा अभंगांची अवतरणे, लेखिकेने त्यावर केलेले भाष्य विचारास चालना देतात.

त्या प्रस्तावनेत म्हणतात, "आपण सदर लिहिणारच आहोत तर त्याचे स्वरूप काही वेगळे असावे, मुख्यत्वे माझ्या वाङ्मयीन अभिरुचीचे काही निराळे परिमाण त्याला देता यावे, असेही मला वाटत होते."

शेळकेबाईंचे हे लिखाण आवळीच्या झाडाच्या डहाळीसारखे आहे. वीस-बावीस छोटी जोडपाने आणि त्याला म्हणायचं मात्र आवळीचं एक पान! डहाळी नाही म्हणायचं!

लेखिकेचा विनय- किंवा विनय म्हणण्यापेक्षा अभ्यासू, विद्यार्थिवृत्ती विस्मित करते. (त्या मानानं आपला व्यासंग किती अधुरा आहे हेही क्षणभर मनात डोकावून जातं!) त्या म्हणतात, 'एकपानी'तले सर्व लेख एकत्रितपणे पुन्हा वाचले तेव्हा माझ्या वाङ्मयीन आवडीनिवडीची, अभिरुचीची मलाच नव्याने ओळख पटल्यासारखे झाले."

पिकासो म्हणे, 'लहान मुलाने गमतीने ओढलेल्या रेघेतली सहजता, मुक्त निर्भरता इतक्या वर्षानंतरही मला अद्याप साधलेली नाही.' हीच विनयवृत्ती मला स्वतःला शेळकेबाईंच्या वरील विधानात जाणवली.

संस्कृतप्रचुर, बोजड, आपण काहीतरी नवे सांगत आहोत असा आव आणणारी भाषा येथे नाही. अगदी सहजतेनं त्यांनी आपल्या 'एक पानीं'चे समारोप केले आहेत. त्यामुळं तर वाचकांशी सुसंवाद साधला गेला आहे. अनंत काणेकरांच्या 'पिकली पानें'ची मला तीव्रतेनं आठवण झाली. फक्त दोन्हींत फरक असा, की काणेकरांचे- त्यांना तात्त्विक विरोध करणारे त्यांचे 'गणूकाका' त्यांच्या प्रत्येक लघुनिबंधात आहेत नि इथे मात्र लेखिकेचेच दुसरे व्यक्तिमत्त्व आहे. आरशातील समोरासमोरील प्रतिबिंबेच जणू! सूक्ष्मसा फरक- बिंब आणि प्रतिबिंब यातील जसा असतो तसाच!

माझ्यासारख्या सामान्य वाचकाला साहित्य, भाषा, तिचे गुण वगैरे वगैरे काही गणिती बुद्धीने सांगता येणार नाही. कारण समीक्षा वेगळी आणि वाचकाची प्रतिक्रिया निराळी! तरी पण मुद्दाम लिहावेसे वाटते, कुठेतरी मनाला स्पर्श करणारे हे लिखाण आहे. तर्कशक्तीला आवाहन करणारे आहे नि अन्तर्मुख करून आत्मपरीक्षण करावयास लावणारे आहे. जीवनातील प्रत्येक विषयाला स्पर्श करणारे व विचारप्रवर्तनाची निश्चित दिशा दर्शविणारे विषयवैविध्य, सहज व अकृत्रिम भाषाशैली यामुळे हे लेखन आनंद मिळवून देणारे वाटते.

मात्र माझ्यासारख्या नव्या पिढीतील वाचकाला अपरिचित अशा काही गोष्टी यात आढळल्या, जाणवल्या, त्यावर किंचित काळ विचार करावा लागला. उदा. जुन्या कवितांतील दाखले, रेंदाळकरांच्या वैराण जीवनातील संघर्षांचे उल्लेख, 'पाचवी खुर्ची'तील नुसतेच निर्देशित केलेले मराठी समीक्षक, यातील काहींवर अधिक प्रकाश हवा होता.

अलीकडच्या लेखकांच्या शब्दवैशिष्ट्यांबद्दल (वगैरे...चा लेख) लिहिताना त्यांनी भाऊ पाध्ये व इतरांचा उल्लेख केला आहे. मात्र कुठेही स्त्रीलेखिकांच्या शब्दवैशिष्ट्यांचा उल्लेख नाही. त्यांनी ते लिखाण वाचण्याइतपत महत्त्वाचं मानलं नाही, की अनुल्लेखानंच त्यांचा परामर्श घेतलाय हे कळत नाही. विशिष्ट मध्यमवर्गीय, पांढरपेशा लेखिकांचे लिखाण त्यामुळं 'टाइप्ड' वाटतं इकडे का बरे शेळकेबाईंनी लक्ष दिलं नाही? भारी, (खूप या अर्थी) बाई ग, जास्तीचं...असे विशिष्ट शब्द त्या लिखाणात वारंवार येतात. त्यामुळं रसहानी होत नाही काय? आधुनिक काव्य, नाटके, चरित्रे, आत्मचरित्रे, संगीतमैफिली, प्रदर्शने..पुस्तकपरीक्षणे, अशा सर्वांवरती 'एकपानी'त त्यांचे विचार हवे होते. एकूण पुस्तकाचं बाह्य रूप, चौकोनी आकार, प्रत्येक पृष्ठावर सरवटे यांनी मांडलेली काळी चौकट; केवळ पाना-दीड पानाचं सरळ सुंदर, स्वाभाविक लेखिकेचं स्वगत! हे सारं आकर्षक.

मुखपृष्ठावर शांता शेळके असं सुंदर निळ्या रंगातलं नाव आहे. पण अनुस्वार पोकळ देऊन शुद्धलेखनाची चूक नाही का झाली? मराठी भाषेतील पुस्तक आणि पोकळ अनुस्वार म्हटल्यावर दूरदर्शनच्या छोट्या पडद्यावर जे दुर्दैवी, अशुद्ध मराठी लेखन दिसते त्याची आठवण झाली. कदाचित मुखपृष्ठ म्हणून भाषेचा, व्याकरणाचा, सुलेखनाचा विचार न करता चित्राची मांडणी आणि त्याचे सौंदर्य याचा विचार करून अनुस्वार पोकळ देण्याचे स्वातंत्र्य चित्रकार श्री. सरवटे यांनी घेतले असावे.

(एक पानी : शांता शेळके, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. साठ रुपये)

(चंद्रकिशोर रामराव पाटील, ९९, व्यंकटपुरा, सातारा ४१५००२)

# मराठी जगत : सं. मधू मंगेश कर्णिक

## जागतिक मराठी परिषदेच्या निमित्ताने मराठी विश्वाचा वेध

**दादूमिया**

अडीच-तीन वर्षांपूर्वी न्यू जर्सी येथे भरलेल्या अखिल अमेरिका बृहन्महाराष्ट्र मंडळाच्या अधिवेशनात मी भाग घेतला होता. त्या वेळी बऱ्याच मंडळींनी त्यांच्या तरुण मंडळींसाठी "एका छत्राखाली मराठी अस्मिता वेगवेगळया क्षेत्रात थोडक्यात प्रदर्शित करणारा एखादा मराठी ग्रंथ सांगा," अशी विनंती केली होती. "असा ग्रंथ इंग्रजीत असेल तर उत्तम, नाहीतर मराठी चालेल," असेही त्यांनी सांगितले. दुर्दैवाने अशा एकाही ग्रंथाची शिफारस मी करू शकलो नाही. इंग्लंड व युरोपात मला हाच अनुभव आला.

भारतात परतल्यावर मी ही घटना शिवसेना प्रमुख बाळासाहेब ठाकरे यांच्या कानी

टाकली व मराठी भाषकांची या क्षेत्रांतील दुर्बलता व असहायता व्यक्त केली. राजकारणाच्या रामरगाड्यात ते स्वतः मला मदत करू शकणार नव्हते, हे मी जाणून होतो. त्यानंतर शिवसेनेच्या मनोहर जोशींनी अखिल मराठी भाषकांची जागतिक परिषद मुंबईत लौकरच भरविण्याचा आपला मनोदय सर्व मराठी पत्रांतून व्यक्त केला होता. पुढे ही जागतिक परिषद मनोहर जोशींच्याऐवजी महाराष्ट्राचे मुख्यमंत्री शरद पवार यांच्या अध्यक्षतेखाली १२ व १३ ऑगस्ट १९८९ रोजी मोठ्या थाटात भरली. विरोधक 'संयुक्त महाराष्ट्रा'साठी लढले व मेले. त्यांचा मंगल कलश मात्र यशवंतराव चव्हाणांनी आणला, त्या घटनेची मला मला आठवण झाली. महाराष्ट्र टाइम्स व इतर काही मराठी वृत्तपत्रांनी त्याविरुद्ध तोफा डागल्या. त्या युद्धाच्या गर्जनेत व आरोळ्यांत मराठी अस्मिता दिमाखाने दाखविणारी ही जागतिक परिषद मोठ्या दिमाखाने संपन्न झाली.

सोहळा आला व गेला; पण त्याचे अत्यंत चांगले फळ 'मराठी जगत्' या पावणे चारशे पृष्ठांच्या सुरेख छपाईच्या व भक्कम बांधणीच्या ग्रंथरूपाने जागतिक परिषदेने बहाल केले. माधव गडकऱ्यांनी मधू मंगेश कर्णिक यांच्या खांद्यावर ही जबाबदारी सोपविली व अत्यंत समर्थपणे कर्णिकांनी ती हाताळली, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडे आहेत.

सुरुवातीस वर्णन केलेल्या माझ्या परदेशस्थ मित्रांना आता सुरक्षितपणे मी या ग्रंथाची शिफारस करू शकतो. हा ग्रंथ परिपूर्ण नाही. संपादकीयात म्हटले आहे : "क्रीडाक्षेत्र, स्त्रीजीवन, युवाजीवन, ग्रामजीवन या (महत्त्वाच्या) विषयांचा मूळ संकल्पनामध्ये अंतर्भाव होता, पण पृष्ठसंख्येची मर्यादा पाळताना हे विषय नाइलाजाने मागे ठेवणे भाग पडले. फ्रान्स, पश्चिम जर्मनी यांसारख्या परदेशांतील मराठी माणसांबद्दल माहिती प्रयत्न करूनही वेळेवर हाती आली नाही." मात्र जी माहिती प्रसिद्ध झाली आहे ती एवढी ऑथेंटिक, मोलाची व नेटकी आहे की, हा ग्रंथ वाचल्यावर 'मेरा भारत महान' खरा, पण 'महाराष्ट्र अतिमहान' आहे अशी धन्यता नकळत वाटू लागते.

राष्ट्रपती वेंकटरमण, पंतप्रधान राजीव गांधी व मुख्यमंत्री शरद पवार या तीन बड्या मंडळींच्या शुभेच्छा या ग्रंथास लाभल्या असल्या तरी हा ग्रंथ सरकारी नाही हे मला खास नमूद करावेसे वाटते.

कोल्हटकरांचे 'बहु असोत सुंदर संपन्न की महा' व गोविंदग्रजांचे 'मंगल देशा! पवित्र देशा!' हे महाराष्ट्र गीत आरंभीच येते. २७० पृष्ठांच्या पहिल्या भागात १४० पाने लोकसंस्कृती, तीस पाने लोकजीवन, ८० पाने लोकव्यवहार व तीस पाने संकीर्ण विषयासाठी दिली आहेत. दुसऱ्या भागात पन्नास पाने भारतातील वेगवेगळ्या प्रांतांत राहणाऱ्या तसेच इंग्लंड, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, मॉरिशस, जपान इ. परदेशांतील राहणाऱ्या मराठी माणसांविषयी सुरेख माहिती आढळते. एवढी मजेदार माहिती एका ग्रंथात सामावलेला दुसरा ग्रंथ माझ्या पाहण्यात नाही.

वि. वि. चिपळूणकरांनी 'महाराष्ट्र देशाची शैक्षणिक प्रयोगशाळा' या लेखात १५०

वर्षांची वाटचाल, वाढ व समस्या यांचे विवेचन अधिकारवाणीने केले आहे. पुस्तकी शिक्षणापेक्षा व्यवसायी व तांत्रिक ज्ञानावर भर हवा, परीक्षांचे महत्त्व कमी करावे, किमान क्षमता विद्यार्थ्यांत यावी, इंग्रजी माध्यमाच्या नव्या जाणिवेबरोबर मराठीचेही ज्ञान हवे या त्यांच्या सूचना विचार करण्यासारख्या जरूर आहेत. काही वैशिष्ट्यपूर्ण मराठी शाळा-कॉलेजे– संस्थांचे त्यांनी वर्णन केले आहे. कोणालाही त्यांचा अभिमान वाटेल.

उषा देशमुखांनी मराठी भाषिक राज्यांतील मराठीच्या आजच्या वस्तुस्थितीवर उत्तम प्रकाश टाकला आहे. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी मराठी रंगभूमी ह्या महाराष्ट्राच्या 'आत्मा' असलेल्या विषयावर काल, आज व उद्या या स्वरूपाचे विवेचन केले आहे. अशोकजी परांजपे यांनी 'प्रयोज्य मराठी लोककला' व वसंत साठे यांनी 'मराठी चित्रपट' यांची रूपरेषा वर्णन केली आहे. १८५७ साली मुंबईत जे. जे. आर्ट स्कूल स्थापन झाले. त्याआधीची कार्ले, भाजे, अजिंठा, वेरुळ ही महाराष्ट्राची अमर कला लेणी आहेत. दोन महायुद्धे, स्वातंत्र्यकाळ व आजचा काळ यांत दृश्यकलेत बरीच स्थित्यंतरे घडून आली. त्याचे प्रा. संभाजी कदम यांनी सम्यक् दर्शन घडविले आहे.

दिनकर गांगल यांनी आपल्या लेखाच्या सुरुवातीस ९५ वर्षांपूर्वी पुण्यात ग्रंथोत्तेजक सभेची स्थापना झाली त्याचे उद्दिष्ट उद्धृत केले आहे : मराठी भाषेत ग्रंथ कमी होतात याचे कारण मराठी लोकांत ग्रंथकर्तृत्वशक्ती कमी आहे हे नाही, तर ग्रंथवाचनाभिरुची कमी आहे हे होय. म्हणून आज ग्रंथवाचनाची गोडी उत्पन्न केली पाहिजे. उपयुक्त व मनोरंजक ग्रंथ तयार करून ते अल्प किमतीत लोकांस विकत देता येतील, अशी तजवीज केली पाहिजे." गेल्या ९५ वर्षांत ही रड आज तशीच आहे. ती तशी का आहे त्याचे उत्तम दिग्दर्शन गांगल यांनी केले आहे. नरहर कुरुंदकर यांनी 'ग्रंथ व्यवहारातील लबाड्या' हे एक स्वतंत्र प्रकरणच वर्णिले आहे. ग्रंथव्यवहारातील कप्पेबंदपणा वाढला, ग्रंथप्रदर्शने वाढली, ग्रंथयात्रा वाढल्या वगैरे गांगलांची निरीक्षणे मुळातून वाचावी.

मराठी पत्रकारितेचे पूर्वीचे दारिद्र्य व आजची श्रीमंती द्वा. भ. कर्णिकांना खटकते. "अद्ययावत् छापखाना, चकचकीत मशिन्स, सुरेख वळणदार प्रुफे, डोळ्यांत भरण्यासारखी छपाई, छायाचित्रांची खैरात, एकामागून एक निघणाऱ्या आवृत्त्या, 'दिल्ली दूर आहे,' असा आक्रोश करणाऱ्या आपल्या पत्रकारांना सातासमुद्रापलीकडून सतत येणारे संदेश, थोरामोठ्यांबरोबरचे जागतिक प्रवास आणि क्षणोक्षणी राज्यकर्त्यांची झोप उडवून देणाऱ्या आकस्मिक बातम्यांचे धक्के, ही सर्व आमच्या वर्तमानपत्राची भूषणे आहेत," असे द्वा. भ. म्हणतात. ग्रामीण बातम्यादेखील आज वृत्तपत्रांत छापून येतात याविषयी ते समाधान व्यक्त करतात.

शंकर सारडा यांनी १९ पानांत मराठी साहित्यास चांगला न्याय दिला आहे. दरवर्षी महाराष्ट्र सरकार ५०० कोटी रुपये शिक्षणावर खर्च करीत आहे तरी मराठी पुस्तकांची संख्या गेली २५ वर्षे दरसाल १२०० च्या दरम्यानच घोटाळत आहे, ही खंत ते व्यक्त

करतात. मराठी साहित्यातील निरनिराळे नवे प्रवाह व लाटा त्यांनी उत्तम प्रकारे दाखवल्या आहेत. उदा. मर्ढेकर युग, ललित व दलित युग, स्त्रीमतवादी चळवळ, अनियतकालिके, समीक्षा वगैरे. आत्मचरित्राबावत ते परखडपणे लिहितात, "आत्मशोधाच्या आणि आत्मप्रतिमेच्या शोधाचा प्रयत्न न करता केवळ आत्मकेंद्रित अहंभावाने दुसऱ्यावर दोषारोप करण्याचा खेळ काही वाचकांचे कुतूहल चाळवतो. चरित्रांच्या दृष्टीनेही बरेच असमाधान वाटते." दलित लेखनाविषयी तितक्याच परखडपणे ते म्हणतात, "दलित आत्मकथनांची दखल विशेष आस्थेने घेतली गेली. ती खळबळ उडवणारी ठरली. परंतु दलित कथा बाबूराव बागूल यांच्या पुढे विशेष सरकली नाही. दलित नाट्यसंमेलने भरत असली तरी प्रेमानंद गज्वी, दत्ता भगत अशी मोजकीच नावे डोळ्यांसमोर येतात." दलित लेखकांनी एकसूरी अतएव यांत्रिक वा साचेबंद बनून भागणार नाही असेही ते बजावतात. सर्व मराठी रसिकांनी 'मराठी साहित्य' प्रकरण खास वाचावेच, अशी माझी नम्र शिफारस आहे.

'महाराष्ट्राचे संगीत' (डॉ. अशोक रानडे), 'महाराष्ट्राची शिल्पकला' (प्रा. विठ्ठल शानभाग) व 'संवाद कुसुमाग्रजांशी' (प्रकाश जोशी) ही तीन प्रकरणे मौलिक आहेत.

'लोकजीवन' पद्मजा फाटक व राजा जाधव यांनी सजविले आहे. १६ पानांत परदेशस्थ मुले व सुनांविषयी आपणास काय वाटते याच्या छोटेखानी केस स्टडीज त्यांनी सादर केल्या आहेत. जयवंत दळवी, नानासाहेब गोरे, डॉ. वि. म. दांडेकर, कृष्णाबाई मोटे, प्रकाशक वा. वि. भट आदी मंडळींच्या मुलाखती खास वाचाव्यात. १२ पानांत आंबेडकरी प्रेरणा, दलित समाज जीवन आणि प्रवर्तनाचा वेध या प्रकरणांत जाधव खूप काही सांगून जातात. 'महारेतर चांभार, मांग, भटक्या– विमुक्त जातिजमाती यांच्याकडे दुर्लक्षच केले जाते', 'बौद्धांनी धर्म बदलला आहे म्हणून जातीयवाद्यांचा रोष पत्करला आहे', 'दलित पँथरचे नेतृत्व अर्धेकच्चे असल्याने पँथर शिवराळ तोंडाचीच राहिली', वगैरे परखड निरीक्षणे अस्वस्थ करणारी आहेत.

जयंत नारळीकरांचा 'विज्ञान आणि तंत्रज्ञानाची महाराष्ट्रातील गेली चार दशके' व न्यायमूर्ती प. बा. सावंत यांचा 'महाराष्ट्रातील न्यायव्यवस्था' हे दोन लेख जिज्ञासूंनी मुळातून वाचावेत. विशेषतः पृ. १९१ वरील न्यायालयातील भ्रष्टाचार व वकिली व्यवसायावरील निरीक्षणे वाचनीय आहेत.

डॉ. भा. र. साबडे यांनी १९६० नंतरचे बदलते औद्योगिक चित्र चांगले रंगविले आहे. मराठी माणूस हा धंदे-व्यवसाय यापासून दूरच राहिला आहे व बहुतेक सर्व उद्योग बिगर मराठी लोकांच्या हाती आहे हे त्यांचे निरीक्षण कटू असले तरी सत्य आहे. मराठी माणसाचे प्रत्यक्ष कर्ज हाती पडण्याआधी काय हाल होतात त्याचे चित्रही आढळते.

डॉ. जयंतराव पाटील यांनी महाराष्ट्रातील शेती हा विषय छान हाताळला आहे. महाराष्ट्रातील पिके, न मिळणारे भाव, जलसिंचनातील अडचणी, शेतीचे उत्पादन वाढते



अनुक्रमणिका

ते कसे, रेशीम किंवा फलफूल बागा वगैरे माहिती उद्‌बोधक आहे. डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांचा 'व्यापार-उद्योग आणि मराठी माणूस' हा लेख परखड व दिशादर्शक आहे. 'व्यवस्थापना'चा अभाव, दूरदृष्टीचा अभाव, लोकसंपर्काचा अभाव हा लेख मुळातूनच वाचला पाहिजे व आपल्या मुलाबाळांकडून वाचवून घेतला पाहिजे. याचा १०-११ वीच्या मराठी पाठ्यपुस्तकात समावेश व्हायला पाहिजे! तीच गोष्ट प्रा. राम जोशी यांच्या 'महाराष्ट्राचे राजकारण : एक दृष्टिक्षेप' या लेखाची. शिवसेना व शरद जोशी यांच्या शेतकरी संघटना या दोन पक्षांची वाटचाल हे त्यांना 'चमत्कार' वाटतात. 'महाराष्ट्र : संदर्भ ग्रंथसूची' अविनाश सहस्रबुद्धे यांनी फार परिश्रम घेऊन बनविलेली दिसते.

३०० वर्षांपूर्वी दुर्गादेवीचा दुष्काळ पडला व तेव्हापासून मराठी मंडळी महाराष्ट्राबाहेर जरूर म्हणून पोटासाठी बाहेर पडू लागली असे डॉ. बळवंत पाटील व ॲड. माधवराव मेहेरे यांनी बृहन्महाराष्ट्राची जडणघडण या लेखात सांगितले आहे. गुजराथ-माळव्यातील मुलुखगिरी व दक्षिण भारतातील बृहन्महाराष्ट्र आमच्या मराठी शिपायांनी स्थापला. झाशी येथे १९२६ साली पहिले व गतवर्षी गांधीनगर येथे शेवटचे, अशी बृहन्महाराष्ट्राची अधिवेशने भरली. 'मायमराठी' मासिकाचे (सं. प्र. तेलंग) कार्य व मुंबई शाखा (बृहन्महाराष्ट्र!) यावर त्यांनी प्रकाश टाकला आहे. बृहन्महाराष्ट्र परिषदेचे अध्यक्ष वसंतराव साठे यांची मुलाखत विजय नाईक यांनी घेतली आहे. श्री. बा. जोशी यांचे बृहन्महाराष्ट्रातील समस्यांवरील केलेले प्रकट चिंतन विचारप्रवर्तक आहे. गड्या, आपुला गाव बरा, अभिसरणाची प्रक्रिया, मराठी मंडळांची पहिली ७५ वर्षे व काही सूचना वाचनीय आहेत.

मनोहर मराठ्यांनी प. बंगालमधील मराठी माणूस व त्याच्या समस्या यावर लिहिले आहे तर तारा केळकर पाणिग्रही यांनी ओरिसामधील मराठी माणसावर. शांतिनेकतन व महाराष्ट्र यांचे संबंध किती व्यापक आहेत हे वीणा आलासे यांचा लेख वाचल्यावर प्रथमच लक्षात येते. श्रीधर शंकर लिमये यांनी तमीळनाडू व महाराष्ट्र यांच्या संबंधांवर छोटा लेख लिहिला आहे. य. ना. मोघे यांचा ग्वालेरमधला मराठी माणूस व द. पं. जोशी यांचा हैदराबादेतील मराठी माणूस वाचनीय आहे. हैदराबादेतून 'स्वाध्याय संशोधन पत्रिका' व 'पंचधारा' त्रैमासिक निघते हे भूषणावह आहे. 'महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरचा हे विकल्प आम्हाला न्यूनत्वाचे वाटतात,' असे जोशी सांगतात. "सहकार्य, विचारविनिमय, कार्यसिद्धी व भारतीयत्वाची अखंड उपासना हे निरपवादपणे आमचे मानदंड आहेत." दादूमियांचा 'गुजरातेतील महाराष्ट्र' हा लेख गुजराथेतील मराठ्यांचा तेजस्वी इतिहास सांगतो. गायकवाडांनी गुजराथला गुजराती अस्मिता दिली, गुजराथेतील आद्य उद्योगपती सर्व मराठी होते, व्यायाम व क्रीडाक्षेत्र, लष्कर व संगीत ही मराठी मक्तेदारी, राजकारण व अर्थकारण या क्षेत्रात मराठ्यांना दूधभात. संकटात सर्व बड्या मराठी कलावंतांनी व सारस्वतांनी बडोद्याकडे हात पसरला होता, पण आज गुजराथमधील

मराठी मंडळींना अवकळा आली आहे, ती दूर केली पाहिजे असा आशावादी पण प्रेरक सूर त्यात आहे. अंदमानातील धडपडणारी मराठी माणसे (जालंदर सोनुने) हा लेख वाचनीय आहे.

'संस्कृतिसंघर्षातील मराठी अमेरिका' हा 'गुजराथेतील मराठी' लेखाप्रमाणे विजिगिषू लेख माधव गडकऱ्यांनी संपन्न केला आहे. 'तमसेच्या तीरावरचा मराठी माणूस' हा मुकुंद सोनपाटकी यांचा अस्सल निरीक्षणांनी युक्त लेख आहे.

जपानमध्ये मराठी भाषा शिकवितात. काय सांगता तुम्ही? त्यासाठी डॉ. नरेश मंत्री यांचा लेख वाचाच. १९५१ मध्ये बडोद्याचे बिनिवाले पहिल्यांदा जपानात स्थायिक झाले. देवजी पडिया यांचा मॉरिशसच्या मराठी माणसाचा १५० वर्षांचा इतिहास ताजा करणारा लेख तडफदार व स्फूर्तिदायक आहे. दलित आता येथे राज्यकर्ते झाले आहेत! मॉरिशस मराठी मंडळी फेडरेशनला १९ लहानमोठ्या संस्था संलग्न आहेत यावर विश्वास बसेल तुमचा? सरकारी शाळेत ९० मराठी शिक्षक? ३० मराठी पुरोहित? 'अफगाणिस्थानातील मराठे' हा प्रतिभा रानडे यांचा लेख अंगावर रोमांच उभे करतो, आणि पानिपतचा संदर्भ वाचला की मन विषण्ण करतो. 'मस्कतची मराठी मंडळी' या फिरोझ रानडे यांच्या लेखनाची शैली छान आहे. पु. लंच्या कथावाचनाचा जाहीर कार्यक्रम! धन्य तो मराठी माणूस, धन्य त्याचे मराठी विश्व! अमेरिकेत महाराष्ट्राला मदत करण्यासाठी हे यशाचे धनी यशवंत कानिटकर 'अमेरिकेत महाराष्ट्र फौंडेशन' स्थापन करतात.

प्रत्येकाने संग्रही ठेवावा असा हा ग्रंथ आहे.

(मराठी जगत्– जागतिक मराठी परिषद, लोकसत्ता कार्यालय, नरीमन पॉइंट, मुंबई. संपादक : मधू मंगेश कर्णिक, पृष्ठे ३८०, शंभर रुपये.)

(दादूमिया, पितृछाया, खारीबाव, बडोदा.)

---

### धर्म

**सार्थ श्री दुर्गाशप्तशती**– द. ह. जुन्नरकर, शारदा साहित्य, २८/अ अंबर चेंबर्स, पुणे २, १-१९८९, पृ-३००, किं. ८०/–

---

---

### नाटक

१) **मृगजळ**– डॉ. श. रा. राणे, रत्नदीप प्रकाशन, उपासना सहनिवास, फैजपूर, १-१९८९, पृ. ७५, किंमत–२५/–

---

# लोकरंग : सं. नलगे– पानतावणे

## ग्रामीण ललितगद्य रंगशैलीचा भावरम्य आविष्कार

डॉ. बाबूजी सपकाळ

स्वातंत्र्योत्तर काळात मराठी साहित्यास अनेक धुमारे फुटले. ग्रामीण आणि दलित साहित्याने आपल्या स्वयंभू गुणवैशिष्ट्यांनी स्वतंत्र स्थान निर्माण केले. कथा, कविता, कादंबरी या वाङ्मयप्रकाराबरोबरच ललित गद्य लेखनाचाही भावरम्य आविष्कार मराठी वाचकांच्या प्रत्ययास येऊ लागला. प्रवासवर्णन, सामाजिक चिंतन, व्यक्तिचित्रण, कथात्मक गद्य, काव्यात्मक लेखन अशा नानापदरी अभिव्यक्तीचे प्रत्यंतर प्रा. चंद्रकुमार नलगे आणि डॉ. गंगाधर पानतावणे यांनी संपादित केलेल्या लोकरंगमध्ये येते.

'ग्रामीण जीवनाचा मागोवा घेणाऱ्या ललित लेखांचा एक वाङ्मयीन अनुबंध संकलित व्हावा, अशा प्रकारच्या नव्या ललित लेखनाचा अभ्यास व्हावा' असा संकल्पाने हा ग्रंथ संपादित झालेला आहे.

'लोकरंग' म्हणजे आनंदाच्या डोहाचे पारदर्शक आरस्पानी रूप आहे. ग्रामीण ललितलेखनाचे एक नवे लेणे मराठी शारदेने आत्मसात केले आहे.

या सर्वच लेखकांनी जे पाहिले, जे अनुभवले, जे ऐकले त्याचे प्रत्ययकारी व जिवाभावाने चित्रण केलेले आहे. त्या त्या लेखकाच्या आत्माविष्काराचा परिसस्पर्श त्यांच्या लेखनास झाल्याने लेखन एकसूरी वाटत नाही. 'बाळपणीचा काळ सुखाचा' शब्दांकित करीत असताना काव्यात्म, भावरम्य लेखनशैलीचा आगळा आविष्कार वाचकांनाही आनंद देऊन जातो.

शहरी जीवन, सततची धावपळ, अनेक व्यथावेदना, नाना तऱ्हेच्या चिंता आणि विवंचना यांनी घेरलेल्या मनास पुलकित करणारे, विरंगुळा-विसावा देणारे हे लेखन आहे. आनंदाबरोबरच बहुश्रुतता प्रदान करणारे, मनोरंजनाबरोबर ग्रामीण संस्कृतीचे, निसर्गाचे, रीतीभातींचे, अनेक कथा-दंतकथांचे ज्ञान देणारे असे हे ललित निबंध ग्रामीण ललित गद्य लेखनशैलीचा भावस्पर्शी आनंदविभोर करणारा आविष्कार आहेत.

गदिमांनी आपल्या साहित्यात व गीतांत अवतरणारा माणदेश, तिथली बाभळीची फुले, माळ, माणसे यांचे प्रतिबिंब कसे पडले आहे, याचे मनोज्ञ दर्शन घडविले आहे; तर धाकट्या पातीने व्यंकटेश माडगूळकरांनी नवेगावच्या पाऊलवाटेने जाताना अभयारण्यातील पशु-पक्षी यांचा मानवी जीवनाच्या संदर्भात अचूक वेध घेतला आहे. तोही तितकाच वेधक आहे.



अनुक्रमणिका






शंकरराव खरात यांनी ग्रामीण जीवनातील नव्या भौतिक विकासाचे व परिवर्तनाचे स्वागत करून ग्रामीण मानवी जीवनात खऱ्या अर्थाने परिवर्तन झाले पाहिजे, अशी अपेक्षा व्यक्त केली आहे. रूढीग्रस्ततेच्या गाळात रुतलेला समाज नव्या प्रकाशाच्या दिशेने जावा, भोवतालचा अज्ञानाचा अंधार नाहीसा व्हावा असे मनोगत त्यांनी व्यक्त केले आहे.

शंकर पाटलांनी 'पाऊलवाटां'चे नानाविध आविष्कार काव्यात्मकतेने रंगविले आहेत. वाटांचे नाते माधव आचवलांच्या 'रेषां'शी मिळते जुळते आहे, समांतर आहे. मानवी जीवनाशी समकक्ष असणाऱ्या या 'पाऊलवाटा' सजीव होऊन आपल्याशी– लेखकांशी हितगुज करतात.

रणजित देसाई यांनी ग्रामीण गरीब शेतकऱ्यांचे भावविश्व तिथल्या मातीशी कसे बांधलेले असते याचे कथात्मकतेने दर्शन घडविले आहे.

आनंद यादव यांनी 'बावीस एकरी'मध्ये आपले बाळपणीचे शेत, सवंगडी यांच्या दर्शनातून हरवलेल्या जीवनाचे दुःख मांडले आहे. मधुकर केच्यांनी वऱ्हाडी भाषेत ग्रामीण जीवनातील साध्याभोळ्या माणसांचे दर्शन घडविले आहे.

शिवाजी सावंत यांनी 'डेरेदार पिंपरीच्या गारेगार सावलीसारखी' असणारी 'खडकावरची म्हातारी' आणि केशव मेश्राम यांनी 'शापित राजपुत्रा'सारखा भासणारा सखाराम यांची व्यक्तिचित्रे सादर केली आहेत.

कुसुमावती देशपांडे यांच्या 'चंद्रास्त'मधील वहिनी आणि शांता शेळके यांच्या 'गाणे' मधील सुलोचना ह्या 'डेस्डिमोना'च्या प्रतिमा ठराव्यात इतक्या कारुण्यपूर्ण आहेत.

कोकण आणि गोवा ह्या प्रदेशातील निसर्गसौंदर्य सारखेच असले तरी तिथल्या माणसांची वृत्ती-प्रवृत्ती मात्र कशी वेगवेगळी आहे याचे चित्रण सुभाष भेंडे यांनी केलेले आहे. कोकणातला माणूस वरून काटेरी पण आतून रसाळ असणाऱ्या फणसासारखा गोड! गोवा तर कलावंतांचे आगर! कोकण आणि गोवा इथला प्रदेश, इथले लोकजीवन इथे मूर्तरुपास आले आहे.

प्रा. चंद्रकुमार नलगे यांच्या काव्यात्म, प्रासात्मक शब्दशैलीने गतिमान रूप घेऊन ग्रामीण जीवनाचा जिवंत अनुभव साकार केला आहे. सरोजिनी बाबर यांनी ग्रामीण स्त्रीची दुःखे मुखर करण्याचा प्रयत्न केला आहे. लालित्यापेक्षा वैचारिक पातळीवरचे हे त्यांचे लेखन ग्रामीण स्त्रीची कथा मांडते. महादेव मोरे यांनी सीमाप्रदेशातील 'म्हाईच्या दिवसा'मधून लोकजीवन/संस्कृती उभी केली आहे.

लोकरंगमध्ये ग्रामीण ललितलेखनाचे प्रातिनिधिक रूप प्रकट होते.

(लोकरंग– संपादक चंद्रकुमार नलगे, गंगाधर पानतावणे. सुरेश एजन्सी, पुणे. पृष्ठे १४४. तीस रुपये.)

(डॉ. बापूजी सपकाळ, कोल्हापूर.)

# नरक सफाईची गोष्ट : ठाकूर-खडस

## नरेचि केला हीन किती नर!

सौ. मालती देऊळगावकर

स्वातंत्र्यानंतर भंग्याची मुलगी राष्ट्रपती होईल व हरिजन पंतप्रधान होईल हे म. गांधींचे स्वप्न स्वातंत्र्याची चाळीस वर्षे उलटली तरी अपूर्णच राहिले आहे. परंतु दलितांच्या एका पिढीने शिकून साहित्याच्या क्षेत्रात नवे दालन उघडले. भंगी मात्र शिक्षणात मागेच राहिले. कारण भंगी निर्मूलन झालेच नाही. अरुण ठाकूर व महमद खडस यांनी अतिशय कष्ट घेऊन, प्रत्यक्ष पाहणी करून, भेटून, बोलून, यासंबंधीच्या साहित्याचे अवलोकन करून 'नरकसफाईची गोष्ट' हा शोधनिबंध लिहिला. विषयाच्या नावीन्यापेक्षा, सामाजिक बांधिलकीपेक्षा कुठेतरी वाटणाऱ्या अस्वस्थतेचा व भंग्याबद्दल वाटणाऱ्या माणुसकीचा स्रोत यात दिसून येतो.

भंग्याना जन्मभर व पिढ्यानपिढ्या सोसाव्या लागणाऱ्या नरकवासाचा इतिहास मात्र मुळापासून सापडत नाही. 'बौद्ध संघाचा परिचय' यात एका भंग्याच्या मनोव्यथेचा उल्लेख धर्मानंद कोसंबी यांनी केला आहे. मुस्लिम राजवटीत शहरे वाढल्यावर व म्युनिसिपालिटीची स्थापना झाल्यानंतर पायखाने साफ करण्यासाठी भंग्यांची आयात उत्तरेकडून– पंजाब व गुजराथमधून करण्यात आली.

भंग्यांना सहानुभूती मिळण्यापेक्षा न्याय मिळावा हा मूळ हेतू पुस्तकात आहे. तो कितपत साध्य होईल हा प्रश्नच आहे. फ्लॅटपद्धतीत राहत्या घरात संडासाला देवघर कम स्वयंपाकघराजवळ जागा मिळाली; पण भंगी मात्र अस्पृश्यच राहिला. सेनापती बापट, म. गांधी, आप्पासाहेब पटवर्धन, भाई नावरेकर, बाबासाहेब बर्वे या मंडळींनी पर्याय शोधून भंगीमुक्तीचा प्रयत्न केला. या कामाची प्रतिष्ठा वाढविण्यासाठी स्वतः भंगीकाम केले. पण तो उद्देश सफल झाला नाही.

गाड्यावरील झाकण उघडून त्यात मैल्याच्या बादल्याच्या बादल्या ओतताना, गळके डबे डोक्यावरून नेताना भंग्यांना घाणीचे सचैल स्नान घडते. नरकसफाईचे काम करणे व प्रत्यक्ष नरकासारख्या कोंदट घाणेरड्या घरात राहणे, यामुळे त्यांचे आयुष्य घटते व विविध रोगांना तोंड द्यावे लागते. घाण आपण करायची व दुसऱ्याला सक्तीने साफ करायला लावायची हा विचारच अमानुष आहे. निर्ढावलेल्या सवर्णाचे मन गेंड्यापेक्षा बोथट व बधिर आहे.

अनुसूचित जाति जमातींना शिक्षण व राखीव जागांची सवलत मिळली तशी सवलत



अनुक्रमणिका

भंग्यांना घेता आली नाही. त्यांच्या कामाची झालेली कोंडी पुस्तक वाचल्याशिवाय कळणार नाही. सुटका करून घेण्याची जिद्द ही 'घरा'साठी सोडावी लागते. अस्पृश्यातील अस्पृश्य म्हणून समाज त्यांच्याकडे पाहतो.

स्वातंत्र्यसैनिकाप्रमाणे गेली १००/१५० वर्षे लोकांच्या आरोग्यासाठी रौरवात खितपत पडलेल्या भंग्यांनाही कृतज्ञतेची वागणूक शासनाकडून मिळावी असे लेखकांचे मत आहे व ते खरे आहे. त्यांना हक्काचे स्वच्छ घर मिळाले पाहिजे.

हिंदूपेक्षा भंगी लोकांशी मुस्लिम बरे वागतात, असा सर्व भंग्यांचा अनुभव आहे, म्हणून बऱ्याच भंग्यांनी स्वेच्छेने मुस्लिम रीतिरिवाज व धर्म स्वीकारलेला दिसतो.

मेघवाल, मलकाना, लालबेगी, वाल्मीकी, उलालखोर आदी भंग्यांच्या जातीतील फरक लेखकांनी दाखवला आहे. दलितांप्रमाणेच लग्न, मर्तिक, नवस यासाठी कर्ज काढून त्यात जन्मभर भंगी पिचत राहतात व व्यसनी बनतात.

गंगा माणसांची पापे धुऊन काढते म्हणून पवित्र, तर भंगी प्रत्यक्ष माणसाची घाण धुऊन काढून अपवित्र कसा, हा प्रश्न सामान्यांना जाणवायला हवा.

मुखपृष्ठावर नाकाला पदर लावून मैलाचा डबा डोक्यावर घेतलेली मेहतराणी आहे. त्याऐवजी ती घाण नेत असताना तिच्याकडे पाहून नाकाला हातरुमाल लावून तुच्छ नजरेने पाहणारे, थुंकणारे व दूर पळणारे लोक दाखवता आले असते तर जास्त समर्पक वाटले असते. ८९ साली प्रकाशित झालेल्या पुस्तकात हे पुस्तक समाज प्रबोधनाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेच, पण वाचल्यावर बधिर मनाला संवेदनशील बनविण्याचे वास्तव यात आहे.

(नरक सफाईची गोष्ट– अरुण ठाकूर, महमद खडस, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. चाळीस रुपये.

(सौ. मालती देऊळगावकर, सरस्वतीनगर, लातूर ४१३५३१)

---

**आजीव सभासद**

*(पुण्याबाहेरील)*

रामदास गणपत चाफाडकर (सावईवेरे गोवा), सदाशिव वझे (म्हापस गोवा), विजय जाधव (पिंपरी), मनाली गाडगीळ (पिंपरी), सौ. वीणा गर्भे (पिंपरी), श्री. धोंडू चिंचवडे (पिंपरी), प्रभा रा. कुलकर्णी (मंगसुळी) (नाडगौडा), जगदीश बंडू कुलकर्णी (अकोला), प्रो. सौ. शीतल आ. बुरघाटे (अमरावती), सतीश द. कानडे (येवला), दिनकरभाई पु. उपाध्याय (येवला), य. गु. देशमुख (येवला), अ. र. देसाई (येवला), ज. शे. पटणी (येवला), म. वा. सराफ (ठाणे), राजा स. जाधव (मालाड), स. गं. गुप्ता (येवला), प्र. एं. झळके (येवला), ल. रा. कांबळे (येवला), ल. च. राठी (येवला),



अनुक्रमणिका

# बहुरूपी महाराष्ट्र : रामचंद्र देखणे
## लोकभूमिकांचा बहुरूपी परिचय

अरुण जाखडे

डॉ. रामचंद्र देखणे यांचे 'बहुरूपी महाराष्ट्र' हे पुस्तक संशोधन व माहितीपूर्ण आहे, तसेच मनोरंजक आहे.

ज्यांनी मराठी लोकसंस्कृती घडवली, जोपासली, आपल्या लोककलांमधून लोकांचे मनोरंजन केले आणि कळत नकळत लोकप्रबोधन घडविले अशा लोकभूमिका ह्या पुस्तकात आपणास भेटतात. त्यांची उत्पत्ती, निर्मिती व परंपरा, त्या वेळची सामाजिक परिस्थिती व कामगिरी यांची माहिती मिळते.

वासुदेव, शकुनी, पांगुळ, कडकलक्ष्मी, पोतराज, कोल्हाटी, गोंधळी, पिंगळा, वाघ्यामुरली, बैरागी, भुत्या, जंगम, बहुरूपी, सरवदा, बाळसंतोष, भराडी, चोपदार, जोगी-जोगतीण, वैद, गारुडी, भांड, जागल्या व जोशी इ. २३ लोकभूमिकांची शास्त्रशुद्ध माहिती दिली आहे. त्यांच्या उत्पत्तीविषयी संस्कृत साहित्यात असलेल्या लोककथा, परंपरा, त्यांचा पेहराव, वेष सांगून आध्यात्मिक व सांस्कृतिक प्रबोधनाचे विश्लेषणही केले आहे.

अध्यात्म आणि साहित्य, काव्य व नाट्य, लोककला व लोकवाङ्मय, प्रपंच व परमार्थ यांचे संतुलन यांचा परामर्श घेताना एकनाथांनी लोकभूमिकांच्या मुखी घातलेला कवनांचा उल्लेख केला आहे.

या लोकभूमिका भारुडातून भेटतात. भारूड हे रूपक काव्य असून त्यांचा वाच्यार्थ एक पण लक्ष्यार्थ भिन्न असतो.

लोकभूमिकांतून महाराष्ट्राचे संस्कृतिदर्शन घडते. समाजात फारशी प्रतिष्ठा नसली तरी लोकभूमिकांनी आपली लोककला आजही जिवंत ठेवली आहे. प्रचार, प्रसार आणि मनोरंजनाची माध्यमे बदलल्यामुळे आज ह्या लोकभूमिका ग्रामीण भागातही तुरळकपणेच भेटतात. लेखकाची भूमिका संशोधकाची वा संकलकाची नसून, दीर्घ काळ उपेक्षा होत असूनही लोककला जपणाऱ्यांच्या कौतुकाची आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचे बहुरूपत्व जाणून घेण्यासाठी हे पुस्तक उपयुक्त आहे.

(बहुरूपी महाराष्ट्र- डॉ. रामचंद्र देखणे, पुणे साहित्य वितरण, २७३, शनिवार, पुणे. पृष्ठे २०४. पंचेचाळीस रुपये.)

(अरुण जाखडे, ३६ / ११, निवारा, पांडुरंग कॉलनी, पुणे ४)



अनुक्रमणिका

# अलिबाबाची हीच गुहा : दिलीप चित्रे

## परदेशस्थ मराठी माणसापुढील मूलभूत समस्या

सौ. शुभा साठे

'हिमगंध' हा कवितासंग्रह प्रसिद्ध असलेल्या कवी दिलीप चित्र्यांचा नाटककार म्हणून आपल्याला परिचय होतो तो त्यांच्या 'अलिबाबाची हीच गुहा' या त्यांच्या नावीन्यपूर्ण विषयावरील दोन अंकी नाटकाद्वारे. नाट्यलेखनाचा हा त्यांचा पहिलाच प्रयत्न!

गेली २०-२१ वर्षे चित्रे यांचे अमेरिकेत वास्तव्य आहे. तिथे त्यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी मिळून 'पश्चिमा इन्कॉर्पोरेटेड' संस्था काढून नाटके बसविली. 'माहेराहून उधार आणलेल्या' शिदोरीवर अनेक कार्यक्रम केले. पण अशा उधारीपेक्षा अमेरिकेतील भारतीयांच्या प्रश्नांवर नाटक लिहून ते सादर केले तर, अशी कल्पना दिलीप चित्र्यांच्या मनात आली व त्यातूनच अलिबाबाची हीच गुहा हे नाटक सिद्ध झाले.

या नाटकाला ठरीव कथानक नाही. माधव आणि शालू हे अमेरिकेत स्थायिक झालेले भारतीय जोडपे. बॉबी आणि हर्षी ही त्यांची मुले. शालू आपल्या भारतीय संस्कारांना, संस्कृतीला जपणारी. मुलांनाही वळजबरीने 'शुभं करोती' शिकवणारी. त्यांच्यावर मराठी संस्कार करणारी. याउलट माधव! तो म्हणतो, ज्या मंत्रांचा, शब्दांचा अर्थच आपल्याला कळत नाही त्याचा उच्चार करण्यात काय अर्थ आहे? मराठी संस्कार मुलांवर लादण्यात काय तथ्य आहे? कारण ते अमेरिकेत जन्मलेले आणि अमेरिकेतच वाढणार. मराठीला विसरणार आणि अमेरिकन होणार. असा या जोडप्यातील संघर्ष! हा संघर्ष रंगवताना माधव आणि शालूची दोन मनेही टिपली आहेत. मुलांना बळजबरीने 'शुभं करोती' म्हणायला लावणारी शालू माधवला मात्र 'मॅक' म्हणते. त्याने अजागळासारखे न वागता अमेरिकन स्टाईलने वागावे आणि 'शालू-शालू' न म्हणता 'सॅली' म्हणावे, म्हणून आग्रह धरते. तर, मुलांवर मराठी संस्कार लादू नको म्हणणाऱ्या माधवला मात्र 'मॅक', 'सॅली' हे प्रकार आवडत नाहीत. आणि सुट्टीच्या दिवशी सूट व गळयाला फासासारखा आवळलेला घट्ट टाय घालून पार्टीत फिरण्यापेक्षा बडे गुलाम अली खाँची ठुमरी, बेगम अख्तरची गझल किंवा वसंतरावांचा मारवा ऐकत शांत बसून राहावसे वाटते. हे दोन पदर अतिशय खुबीने प्रकट केले आहेत.

श्री आणि त्याच्या पत्नी राणी हे दोघे १७-१८ वर्षांनी आपल्या या मित्राच्या भेटीसाठी अमेरिकेत येतात. त्यांना अमेरिकन जीवनाबद्दल आकर्षण, कुतूहल आहे. भारतीयांना

परदेशांबद्दल वाटणारी ही मानवसुलभ मोहाची प्रवृत्ती व परदेशस्थ भारतीयांच्या मनातली मायभूमीची ओढ यांची विविध रूपे वेधकपणे अनेक गीतांतून, स्वप्नदृश्यांतून या नाटकात मांडली आहेत.

भारतीयांच्या मनात असलेले परदेशाविषयीचे आकर्षण आणि एकदा तरी परदेशवारी हवी ही इच्छा दाखवण्यासाठी या नाटकात पुढारी, मास्तर, ब्राह्मण, पोलिस, कारकून इ. समूहांचा उपयोग केला आहे. त्याद्वारे विचार मांडण्याची कल्पना चांगली आहे. क्वचित पोलिस खाते व ब्राह्मण मंडळींचे विडंबनही केले आहे. श्राद्ध, सत्यनारायण पूजा, उपवास यांचे विडंबन करून भारतीय अंधश्रद्धांवर प्रहार केला आहे. भारतातील भ्रष्टाचार, लाचलुचपत, दादागिरी इ. प्रकार विनोदाची झालर लावून मांडले आहेत. मात्र अमेरिकेतील कृष्ण-कृत्ये वा तेथील समस्या यांचे चित्रण येथे आढळत नाही. निरनिराळया व्यसनांच्या आहारी जाणारी तरुण पिढी ही आज तिकडील मोठी समस्या आहे; पण तिचा उल्लेखही येत नाही.

दुसऱ्या अंकातील दुसरा प्रवेश हा नाटकाचा गाभाच होय ! यात लेखकाने अनेक मूलभूत प्रश्न माधव– शालू व श्री– राणी यांच्या चर्चेद्वारे मांडले आहेत. लेखकाजवळ मात्र या प्रश्नांची समर्पक उत्तरे नाहीत. श्री भारतात राहून पैसे कमावतो व घरात चार-सहा नोकरही ठेवू शकतो. पण माधव– शालू मात्र घराचे, कारचे हप्ते व मुलांची शिक्षणं यामुळे कामाला बाई ठेवू शकत नाहीत. 'आमच्या नशिबात मात्र कधी एखाद्या दिवशीसुद्धा आयता चहाचा कप नसतो!' ही शालूची खंत आहे; तर आपण भरपूर पैसे कमावतो पण त्यासाठी भरपूर कष्टही करतो. जी कामे इकडे घरबसल्या फोनवर होतात; त्यासाठी आपल्याला रक्त आटवावे लागते, गयावया करून शेवटी मूठ दाबावी लागते, ही श्रीची खंत आहे. रोजच्या जीवनातल्या साध्या साध्या समस्यांनी जीव मेटाकुटीला येतो व माधव मात्र यातून सुटतो असे श्रीचे मत आहे. पण यावर माधव विषण्ण हसतो व म्हणतो, "कुणास ठाऊक सुटलो की अडकलो! कुंपणापलीकडलं शेत हे नेहमीच हिरवंगार दिसतं डोळयांना. पण त्या हिरवळीतून चालायला सुरुवात केल्यावरच पायाखालच्या दलदलींची आणि बोचणाऱ्या काट्यांची जाणीव होते." माधवच्या या वक्तव्याद्वारे स्वतः लेखकाचीच खंत तर बोलकी होते.

एकदा धनाच्या, सुखाच्या लोभापायी अलिबाबाच्या गुहेत शिरल्यावर बाहेर पडण्याचा मार्ग बंद झाल्यामुळे ही मंडळी मनातल्या मनात तडफडत– धडपडत तर नाहीत? राणी अमेरिकेत वास्तव्याला येण्याच्या गोष्टी करते तेव्हा शालू तिला कळवळून सांगते, "असला विचार मुळीच करू नकोस. ज्या गोष्टींच्या आकर्षणापायी तुम्हाला इथे यावेसे वाटतेय त्या गोष्टी मिळवायला फार प्रचंड किंमत मोजलेली आहे आम्ही..." असा हा नाट्यविषयाचा गाभा! पण प्रत्यक्ष रंगभूमीवर प्रयोगाचा विचार करता, पहिल्या अंकाने प्रेक्षकांवर घातलेली मोहिनी हा प्रसंग कमी करतो.

नाटकाचा शेवट काहीसा अनपेक्षित वाटतो. माधवचे जे स्वप्न आहे ते थोडे कृत्रिम वाटते. कधीतरी चमत्कार होऊन आपल्या पिढ्यांचे वारसदार आमच्या नात्याचे ध्वज हाती धरून बंड करून उठतील व आत्मशोधाच्या प्रयत्नात तुमच्या परसदारात गाडलेली आमची नाळ हुडकून काढतील व तुमच्या-आमच्या वारसदारांचे नष्ट झालेले पाश पुन्हा घट्ट व्हायला लागतील– हा आशावाद या संपूर्ण नाटकात कृत्रिम व उपरा वाटतो.

'अलिबाबाची हीच गुहा' हे नाटकाचे नाव अतिशय समर्पक व योग्य आहे. अलिबाबाच्या गुहेत कासीम शिरला तो संपत्तीच्या लोभाने. आणि आत शिरल्यावर, दार बंद झाल्यावर गुहा उघडण्याचे मंत्र माहित नसल्याने तो आतच अडकतो. मग बाहेर पडण्याची इच्छा असूनही बाहेर पडू शकत नाही. कोणी शिक्षणासाठी, कोणी अनुभवासाठी, कोणी नोकरीसाठी तर कोणी आणखी काही कारणाने या गुहेत शिरला. आपापल्या ध्येयसिद्धीनंतर मायदेशी परतण्याची प्रत्येकाची इच्छा. तिथले ते सोडवेना आणि इथले हे धरवेना अशी त्रिशंकूसारखी अवस्था. पण हळूहळू जीवनाच्या दिशा निश्चित होतात व परतण्याचा मार्ग बंद होतो. तरीही मागे ठेवलेला देश, समाज, भाषा, संस्कृती याविषयीचे प्रेम उरतेच. आपल्यामध्ये आणि त्या सगळयांमध्ये एक जबरदस्त दरी निर्माण झालीय व ती दिवसेंदिवस रुंदावतच जाणार ही जाणही आहेच. दोन्ही दगडांवर पाय ठेवून नव्या-जुन्याचा सुवर्णमध्य काढण्याची माधव-शालूची केविलवाणी कसरत अतिशय समर्पक शैलीत इथे प्रकट झाली आहे.

बारीकसारीक प्रसंगांतून, वाक्यांतून भारतीय संस्कृतीची खिल्ली उडवलेली कुठे कुठे खटकत राहते

(अलिबाबाची हीच गुहा– दिलीप चित्रे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पंचवीस रुपये)

सौ. शुभा शशांक साठे, के.टी.पी.एस. वसाहत, व्ही आय / १९/११३, कोराडी, नागपूर ४४११११.

---

## आजीव सभासद

बा. दी. देशमुख (येवला), ज. गो. सोमवंशी (येवला), नि. अ. पटणी (येवला), सु. मु. गुजराथी (येवला), दि. त्र्यं. टिपरे (येवला), अ. उ. उके (येवला), म. मा. कायस्थ (येवला), मो. गो. वडे (येवला), मा. ध. लोणारे (येवला), सौ. शर्मिला दि. देसाई (आकुर्डी), क. हि. शर्मा (पिंपरी), सु. बा. सस्कर (येवला), सौ. अलका गुप्ते (जळगाव), एम. जी. भोळे (जळगाव), बी. सी. चौधरी (जळगाव), सौ. सु. म. साळुंखे (जळगाव), वि. घ. ठाकरे (जळगाव), सौ. उ. दि. पाटील (जळगाव), अशोक शालू (पिंपरी) श्री. वि. आपटे (सरूड-कोल्हापूर), वसंत वनमाळी (गोरेगाव मुंबई), कुल्ली सदाशिव त्र्यं. (बुलढाणा), भालचंद्र गुजर (धुळे), प्रा. सु. श्री. पांढरपांडे (नागपूर), सौ. मनीषा पोतदार (पेण), माधव पोतदार (पेण), मुळे श्री. रा. (येवला), लालू दुर्वे (कल्याण),



अनुक्रमणिका

# यात्री : सुधांशू

## इथे माझे कुणी नाही, आहे सारे पलीकडे

प्रा. माधव माळी

'दत्त दिगंबर दैवत माझे' या गीताने महाराष्ट्रभर पोहोचलेले कवी सुधांशू– 'पद्मश्री ह. न. जोशी' यांचा यात्री हा नवा ७१ कवितांचा संग्रह.

पत्नी, कन्या, नातू, जीवनातील गोड-कडू अनुभव, सृष्टीची विविध रूपे, परमेश्वराचे अस्तित्व, यांत घडणारा सौंदर्याचा साक्षात्कार या कवितांतून शब्दबद्ध झाला आहे.

सुधांशू यांची कृष्णामाईवर अपार श्रद्धा. 'हे स्थळ' या कवितेत आपल्या औदुंबर स्थळाविषयीचे प्रेम प्रकटलेले आहे. इथे आईची ममता मिळते. सकाळ-संध्याकाळ, दिवसा-रात्री शांतीचे चांदणे बरसते, कैवल्याचा सुगंध दरवळत असतो, असे त्यांना वाटते. आषाढाचे दिवस त्यांना स्वप्नांचे दिवस वाटतात. त्यांनी सृष्टीला तेज, धरणीला करुणा, अग्नीला पावित्र्य, वृक्षाला शांत सावली, घनतिमिराला शांती मागितली आहे.

उतार वयातील भावस्थितीबद्दल ते लिहितात, 'उन्हे जशी दूर दूर जाऊ लागतात, तशी सुखे वितळू लागतात. छाया पसरत याव्यात, तशा निराशा दाटतात. पण यातूनच एखादी मंद प्रकाशाची कोर हळूच समोर येते आणि त्या एवढ्याशा धाग्यानेही उद्याची स्वप्ने मन विणू लागते.'

एकटे असताना त्यांचे मन आकाशाकडे झेपावते, जनसमुदायात असताना मात्र पायांत बेड्या पडल्यासारखे जाणवते. इथे माझे कुणी नाही, आहे सारे पलीकडे असा त्यांना भास होतो.

ईश्वर आपल्याला वेगवेगळ्या अवस्था देऊन आपली परीक्षा घेतो. कधी गळ्यात स्तुतींचे हार घालतो तर कधी उपहासांच्या चिंधोट्या. सुधांशू त्याकडे समाधान वृत्तीने बघतात.

"मी मात्र सुखात मग्न
मी जाणले आहे-
तो जे जे देतो त्यातून
त्याच्या कृपेचाच सुगंध दरवळत आहे!"

कवीची खात्री आहे की कधीतरी आपले नाते ईश्वराशी जडेल.

परमात्म्याशी जडेल नाते



अनुक्रमणिका

अनाहताचे घुमतील सूर
अमृताला येतील पूर

खडीसाखर तोंडात टाकल्या टाकल्या तिची चव कळते त्याप्रमाणे सुधांशूंच्या कवितेची ओळ वाचल्या वाचल्या तीमधील भाव व अर्थ लगेच आकळतो. रसिक मनाशी त्यांची कविता चटकन संवाद साधते.

(यात्रीः सुधांशू, दिलीपराज प्रकाशन, पुणे. वीस रुपये)

(प्रा. माधव माळी, रामकृष्ण परमहंस महाविद्यालय, उस्मानाबाद)

---

### आजीव सभासद

उषा सु. नाडकर्णी (नागपूर), सौ. स्मिता श. राजवाडे (रत्नागिरी), सौ. नीलिमा व. सावंत (सावंतवाडी), न. दे. परळीकर (नेरूळ नवी मुंबई), सौ. कल्पना अ. अग्रवाल (भुसावळ), सौ. मीनाराणी गुर्जर (ठाणे), श. कृ. भोसले (ठाणे), मनोहर श्रीखंडे (अंबरनाथ), ए. डी. कर्णिक (मुंबई),

### आजीव सदस्य

*(पुणे शहर)*

नारायण रामदास वैद्य (पुणे), दिलीप दादाराव माने (पुणे), महेश वसंत कारेकर (पुणे),अनिल रमेश दहिवाडकर, माधवी म. कुलकर्णी, नीता गोविंद लेले, वाकडे अच्युत हरिभाऊ, सं. पां. पाटील, रवीन्द्र भट, डॉ. मीनाक्षी वसंत बरवे, विनीता अशोक देशपांडे, परळीकर गिरीश गोविन्द, सौ. ज्योत्स्ना दाते, सौ. माधुरी संजय पाचपोर, शरच्चंद्र गद्रे, मंगल वि. केतकर, सौ. आ. सु. शिंदे, सौ. प्राची प्र. गोखले, कि. श्री. पटवर्धन, मि. म. साठे, प्र. वि. कुलकर्णी, नि. गो. हिरवे, सुरेश चंद्र पाध्ये

---

### देणगी

म. सा. परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाला वा. गो. आपटे इस्टेट ट्रस्टतर्फे नुकतीच रु. १०,०००/- (रु. दहा हजार) ची देणगी मिळाली आहे.

*परिषद याबद्दल ट्रस्टची फार आभारी आहे.*

# ंध रडतो पिंपळावरः अमीर आठवले

## ा वर्गातील भ्रमनिरासाच्या कविता

शंकर सारडा

अमीर आठवले यांचा 'समंध रडतो पिंपळावर' हा पहिलाच काव्यसंग्रह. ब्राह्मणी नाक्षमतेत वाढलेल्या तरुणाला अवतीभवती मूल्यांचा ऱ्हास द्रुतगतीने होत असल्याचे ' जाणवते आणि त्यामुळे त्याला सिनिसिझमचा झटका येतो. ढोंगीपणाचा उबग ब्राह्मणी मूल्यव्यवस्थेवर दलित-मुस्लिम-आंग्ल वा ब्राह्मणेतर संवेदनांचे जे आघात ा, त्यामुळे इतरांशी संवाद साधणेही त्याला अवघड होते. एखादा सोवळा कोपरा वा ी आटपाट नगरची कहाणी जपत राहतो. (माझ्यातला ब्राह्मण) बुद्धिजीवी वर्गाची ाट होत आहे; आणि बुद्धिजीवी वर्ग स्वतःच भिक्षुकी वृत्तीच्या आहारी जाऊन ीवरची शिते चाटत आहे, दुसऱ्यांच्या जिलब्या मोजत आहे, शिळ्या कढीचे भुरके आहे, निंदानालस्तीमध्ये रस घेत आहे, याबद्दलची चीडही कवीच्या मनात आहे (जीवी), किळसवाण्या गोष्टींची पुनरावृत्ती होत गेली की त्यांची सवय व्हायला ो; संवेदना बोथट होतात. पहिल्या दिवशी पानात पडलेली पाल किळसवाणी वाटते, या दिवशी साधीसुधी वाटते तर तिसऱ्या दिवशी गोजिरवाणी. असा मनोभूमिकेत घडत जातो. (उखाणा).

चांगुलपणा, गुणवत्ता, निष्ठा, कर्तृत्व यांना एका जमान्यात काही प्रतिष्ठा होती. ी उपासना होत होती. परंतु सध्याच्या काळात ह्या मूल्यांचीही अवहेलना झालेली आहे. ल उत्तम गोष्टींच्या बरोबरीने हिणकस गोष्टीही मिरवू लागल्या, पण त्याची कोणाला ाही. हिऱ्याच्या खड्याला कथलाचं कोंदण खुपत नाही, तळपत्या तलवारीचं गंजलेलं खटकत नाही, मोत्यांसारख्या अक्षरांसाठी मळका खलिता वापरताना संकोच वाटत मस्तवाल घोड्याला बिननालेचा खूरही थांबवत नाही याबद्दलची रुखरुख कवीच्या ा आहे (सवार), ही मूल्यांची घसरण इतकी अंगवळणी पडत आहे की डावंउजवं करायचं हाच सवाल पडतो. डावी चप्पल झिजली तर उजवी चप्पल काय दिमाख दाखवणार? हात विटाळला तर उजव्यानं देवपूजा कशी करावी? (डावंउजवं), एकेकाळी ाकशी सोन्याचा आग्रह धरणारे लोक आखूड झालेली काठी टाकून देत होते; वायफळ ली चर्चा रोखत होते, मवाळ झालेली दारू ओतत होते आणि उतारवयाला लागलेली दूर लोटत होते. आज असा आग्रह धरणार्याची फसगत होते. हंडी थाटात फोडली तर आंबट निघतं. पत्त्यांचा डाव मांडला तर गाढव बनावं लागतं. मूठ मारली तर

आपल्यावरच उलटते. लाडात पदर खेचावा तर सपाट छातीच बघायला मिळते.(कशाला).

या बदललेल्या मानसिकतेमुळे जे काही करायचे ते दिखाऊपणासाठी, ही वृत्ती वाढीला लागते. कपडे घालायचे ते लाजेखातर नाही, तर मिरवण्यासाठी. ज्ञान मिळवण्यासाठी विद्वान व्हायचे नाही; कीर्तीसाठी व्हायचे. प्रेमासाठी प्रेयसींची आराधना करण्याऐवजी केवळ वासनापूर्ततेचे साधन म्हणून तिला वापरायचे, असे प्रकार चालू होतात. (कशासाठी). सार्वत्रिक भ्रष्टाचाराची लागण अशी भयावह आहे, की लाखो रुपयांच्या आमिषालाही न बधणारी सचोटी आता पाच पैशांसाठीही चळते, हजारो धमक्यांना न जुमानणारी मान एका साध्या नजरेपुढे झुकते; वेदाभ्यासाने आलेले शहाणपण फालतू पोथ्यांनी निकाली निघते. (अशी कशी).

अमीर आठवले यांनी आपल्या मानसिक ओढाताणीची अशी एकापुढे एक स्टेटमेंट्स देणे म्हणजेच कविता करणे असा समज करून घेतला आहे. त्याच त्या ठराविक निरीक्षणांना वेगवेगळ्या कोनांतून पेश केले आहे. आपल्याला जाणवलेल्या सामाजिक दुटप्पीपणावर कडवट, प्रक्षुब्ध प्रहार करण्याची त्यांची इच्छा असावी. परंतु हे प्रहार म्हणजे काव्य ठरतेच असे नाही. निसर्ग, व्यक्ती, वैयक्तिक सुखदुःख यामध्ये त्यांना रस नाही. सर्वसामान्य स्वरूपाची विसंगती पकडण्यावरच त्यांचे लक्ष केंद्रित झालेले आहे. सगळी सृष्टी वैराण झाली असताना निवडुंग मात्र बेफिकीर राहून हसत असतो; तशा प्रकारची बधिर आत्ममग्नता कवीला खटकते (निवडुंग). अशा आत्मसंतुष्ट नार्सिसिस्ट वृत्तीचे वाभाडे काढताना त्याला आवेश चढतो. नकोत पुष्ठे बिनव्यासाचे, उरोज आमुचे ताठ राहिले, नको तुताऱ्या नको ढोलकी, शंख आमुचे खूप वाजले यासारख्या ओळींतून तो जळजळीतपणे प्रकटही होतो.

वेड्या तुघलकाचे गाणे गाताना कवी सृष्टिक्रम बंद पाडण्याची आपली प्रतिज्ञा प्रकट करतो. ग्रहगोल फिरू नयेत, सूर्य उगवू नये, झाडांना पालवी फुटू नये, ढग बरसू नयेत अशी व्यवस्था हा तुघलक करतो आहे. मांजर आडवे गेले तरी काम फत्ते होते आणि पिंड-श्राद्धाविना पितर शांत होतात, असेही त्याच सुरात येऊन जाते.

सुंदरबन ही एक 'दृश्य' कविताही प्रेक्षणीय आहे.

हे निराळे मंत्र माझे म्हणणाऱ्या या तरूणाच्या जीवनातले स्वतःच्या निखळ अनुभवांचे वेध घेण्याचे आणि त्याला शब्दांत आणण्याचे पुढचे पर्व सुरू होईल तेव्हा कवी म्हणून काही वेगळेपण त्यात आहे की नाही याचा अंदाज लागेल. हा संग्रह म्हणजे केवळ 'मौजेखातर माणसं मारेन, तत्त्वासाठी नाही'च्या चालीतला. 'गमतीखातर शब्द खरडीन, काव्यासाठी नाही' असा शब्दच्छल आहे.

(समंध रडतो पिंपळावरः अमीर आठवले, श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०. पृष्ठे ५२. तीस रुपये.)

# नवभोजनः अच्युत रामशास्त्री

## नवेपणाला सामोरे जाताना होणारी घुसमट

शंकर सारडा

श्री. अच्युत रामशास्त्री ह्या टोपण नावाने अच्युत कुलकर्णी हे लेखन करतात. मूळ कोल्हापूरकडील; पण सध्या वास्तव्य मध्यप्रदेशातील गुणा जिल्ह्यातील मुंगावली येथे. १९३७ साली त्यांचा पहिला काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला; पण पुढे लेखन मागे पडले. गेल्या काही वर्षांत पुन्हा ते लेखनाकडे वळले; आणि वय ऐंशी वर्षे असूनही पुस्तकरूपाने हे लेखन स्वतः प्रसिद्ध करण्याची त्यांची हौस कायम आहे..

### नवकाव्याची टर

नवकाव्याची टर उडवण्यासाठी काही विडंबनात्मक कविता त्यांनी लिहिल्या. त्यांपैकी ३६ कवितांचे 'नवभोजन' घेऊन ते काव्यरसिकांपुढे आले आहेत. 'कसेही काहीही लिहावे; आणि तिला कविता म्हणावे, म्हणजे झाली ती नवकविता, अशी त्यांची धारणा आहे. तिच्यात धोतराचा भरघोसपणा नाही; पँटीचा आटोपशीरपणा नाही, साडीचा सुडौलपणा नाही, अंबाड्याचा घरंदाजपणा नाही, बॉबकटचा सुटसुटीतपणा नाही, किंवा पाठवेणीचा आकर्षकपणा नाही, असा त्यांचा समज आहे. नवकवितेत पिंजारलेल्या केसांची गुंतागुंत असते असे ते म्हणतात; आणि नवकवितेला लोकप्रियता लाभली तर कुसुमाग्रज-अनिल तांबे-केशवसुत-मोरोपंत-वामन पंडित या सर्वांना कोण विचारणार, असा प्रश्न त्यांना पडतो. म्हणून ते 'घ्या नवकाव्य हवे जसे/ लुंगे नेसावे तसे' असे सांगून ते हे आपल्या नवकाव्याचे नमुने सादर करायला सिद्ध झाले आहेत. अर्थात नवकाव्याचे विडंबन करण्याच्या नादातही त्यांना दुर्बोध प्रतिमांची नक्कल करणे जमले नाही वा सोपी गोष्ट अवघड करण्याची किमया साधलेली नाही. मध्यमवर्गीय माणसाची भीरुता, सावधगिरी आणि नव्या सुधारणांबद्दलची वा नव्या विचारांबद्दलची साशंकता या कवितांतून जागोजाग प्रकट होते. 'शतपावली' करताना पुस्तके, लेखन, भाषण, स्वातंत्र्य, पंजाब, काश्मीर, ग्रेनाडा, महागाई, इहलोक, परलोक यांबद्दलचे विचार मनात येतात. पण 'स्वैपाक झाला-जेवायला चला' असा आवाज आला की पाय भोजनगृहाकडे वळतात आणि चिंतन तिथल्या तिथे थबकते.

मुलाने डायनिंग टेबल आणले. घर आधुनिक झाल्याने सर्वांचीच कळी खुलते. पण भुरका घेण्याच्या नादात शर्टावर आमटीचे थेंब उडतात; मागून वाढप्याच्या हातून कढत










आमटीचे पातेले अंगावर सांडते, असा अनुभवही ते नोंदवतात.

कीर्तनामध्ये ब्रह्म आणि माया यांची मोठी दिलखुलास चर्चा चालते, नामस्मरणाने भवसागर पार करण्याची खात्रि दिली जाते; पण नंतर अचानक आलेल्या पावसातून घरी जायला मात्र छत्री नसल्याने सारेजण तिथेच अडकून पडतात, असा दैवदुर्विलास 'कीर्तन'मध्ये आढळतो, तर भाऊबीज झाल्यावर दिवाळी संपल्यावर भविष्यात काय होणार यांची चिंता लागून राहते. आपल्याला हयात असताना कोणी मान देत नाही; पण मेल्यावर आपण भूत होऊ. मग मात्र आपली सर्वत्र स्मारके होतील अशी मनोराज्येही कवी घोळवतो. (भूत).

### मध्यमवर्गीय आशाअपेक्षा

एका स्त्रीचे हृदय चोरले; पण पोलिसांचा व कोर्टकचेरीच्या भीतीने ते कुलुपबंद करून ठेवले. नंतर बघायला गेलो तर ते हृदयच गायब झालेले, असा अनुभव 'हृदयचौर्य' कवितेत येतो.

मध्यमवर्गीय माणसाच्या आशाअपेक्षांचे चित्रण 'अडसर मला घालू नकोस' यात येते. शिक्षण, नोकरी, विवाह, वास्तू, कार, या गोष्टी मिळतात; पण कुठे तरी विघ्न येऊन ह्या सर्व गोष्टींची मजा जाणार तर नाही ना, असी धास्तीही वाटत राहते. मोठेपणाची स्वप्ने पडतात; वृत्तपत्रात फोटो यावा असे वाटते; मुले आवडतात; फुले आवडतात– पण थोडा वेळच. कारण मुलं म्हणजे क्षणाची वत्सलता पण अनंत काळची कटकट. तेव्हा त्याबाबतही संयम हवाच. अर्थात लग्न, नोकरी, मोठेपणा या चक्रातून जाऊनही आपल्या अलिप्तपणाचा आणि वैराग्याचा दावा मांडायला हा निवेदक मोकळा आहेच. सुखदुःखे अनुभवूनही त्यांच्याशी समरस नाही झालो असे तो म्हणतो आणि 'मी तर संन्याशी मुलखानिराळा– जगात असूनही जगावेगळा' असा आपला परिचय देतो. भवसागर पार करायचा त्याचा निर्धार आहे.

काही कथासदृश कल्पनाही या कवितांतून येत जातात.

राजा झाल्याचे स्वप्न पडते; पंतप्रधानांनी राज्यात आबादीआबाद आहे म्हटल्यावर शेजारच्या राज्यावर स्वारी करावी असे राजा सांगतो. आगळीक केल्याशिवाय स्वारी का करावी या प्रश्नावर राजा कडाडतो. 'राजकारणात तुम्ही बेवकूफ आहात; युद्धाला भिताय. बांगड्या घाला. सैन्याला काम नसेल तर ते ठेवायचे कशाला?' जाग आल्यावर मात्र कळते की शत्रूने स्वारी केली आहे.

पाटा-वरवंटा आपल्या भूमिका बदलतात, त्यामुळे माणसे त्रस्त होतात. चटणी वाटली जाईना. पुरण बारीक होईना! माणसे विष्णूला शरण जातात. भगवान विष्णू म्हणतातः 'तुम्ही माणसेच सगळी कामे उलटी करता. डोक्याचे सोडून ढुंगणाला गुंडाळता. बायकोला नोकरीला लावून स्वतः बेकार होता. पोलिस जनतेच्या रक्षणाऐवजी शोषण करतात; मंत्री



अनुक्रमणिका






गरिबांची सेवा न करता स्वतःची तुंबडी भरतात. हे वर्तन आधी सुधारा. मग पाटावरवंट्याची तक्रार सांगा.' विष्णूंनी केलेली ही कानउघाडणी ऐकून लोक म्हणतातः 'कलियुगात देवही बिघडले.'

एक भक्त देवाची भक्ती करतो. देव त्याला स्वर्गात नेतो. देव भक्ताला वर मागायला सांगतो. भक्त म्हणतो, 'मज खुर्चीची आहे लालच.' देव तथास्तु म्हणतो. भक्त खुर्चीवर बसतो. संसारसुखाबरोबर स्वर्गसुखालाही पारखा होतो (भक्ती). असा दैवदुर्विलास रंगवणेही कवीला प्रिय आहे.

मंदिर बांधण्यासाठी गावकरी श्रम घेतात. पुढाऱ्याच्या आग्रहाने गोल दगड मूर्ती म्हणून वसवतात. काही दिवसांनी देऊळ सुने पडते. पुजारी उपाशी राहू लागतो. पुढार्यांचे अनुयायी हळहळतात. (मंदिर).

जुनी सनातन मूल्ये व जुनी नेमस्त जीवनपद्धती अंगवळणी पडलेल्या व्यक्तीला नव्या बदलांना व बदलत्या संदर्भांना सामोरे जाताना अडखळल्यासारखे, चुकल्यासारखे होते. ते अवघडलेपण विनोदाच्या साहाय्याने सुसह्य करून घेण्याचा वयस्क कवीचा प्रयत्न दाखवणाऱ्या या कविता.

(नवभोजन-अच्युत रामशास्त्री, मुंगावली, जिल्हा गुणा (मध्यप्रदेश). वीस रुपये)

---

# अग्निशिखा : सुगंधा शेंडे

## प्रत्येकाचे आयुष्य म्हणजे पूर्वनियोजित तुरुंगच.

---

**सुलभा हेर्लेकर**

---

अलीकडे दलित साहित्यात पुरुषांप्रमाणेच स्त्रियाही आघाडीवर आहेत. 'फिपुली' ही कादंबरी लिहिणाऱ्या सुगंधाताई शेंडे या पहिल्या दलित लेखिका आहेत. त्यांची प्रवृत्ती कवीची आहे. हळुवार सुबक शैली, तलम मनोविष्कार, आणि अभिव्यक्तीचा साधेपणा त्यांच्या काव्यात आहे. 'अग्निशिखा' हा त्यांचा चौथा काव्यसंग्रह. या संग्रहात एकूण शंभर कविता आहेत. अठरा धान्यांचे कडबोळे असे त्याचे स्वरूप आहे.

शब्दांच्या अर्थ छटा एकाच वेळेस अनेक सामाजिक संदर्भांची परिमाणे व्यक्त करतात.

बारेती कणा! कसा चिरडला जातोस । धुळीत मिसळतोस । ना कुणाचे लक्ष वेधतोस, पाऊल खुणा । जपून ठेवतोस । आल्या गेल्याचे । स्वागत करतोस (ज्ञानधरती : पृष्ठ १०१)

घणाचे घाव घालूनही पोटाचा आक्रोश, भुकेसाठी सारखा तडफडतोय ही वेदना अशी

प्रकट होते.

प्रत्येक दिवस उगवे रिता
किती त्याच्या सांगू कथा
पिंगा घिरट्या, घिरट्या पिंगा
रिकामे मन भारीच व्यथा! (व्यथा : पृष्ठ. ३२)

रिकामे मन हळुवार होऊन जाते. स्वतःच्या कोषातून बाहेरच्या जगाकडे पाहताना ही कविता गहन गर्द होत जाते. समाजातील, विशेषतः दलित समाजातील दुःखाची पिळवणूक पाहून कासावीस होते. विद्रोही बनते. पण तिथेही शब्द ज्वालांच्या स्वरूपात न येता ठिणगीच्या रूपात प्रकट होतात.

ठिणगी ठिणगी उसळते आहे
हातात घेऊ
ओच्यात वेचू
ही सारी सूर्यफुले (पृ. ३६)

सूर्यफुलांना हातात घेण्याची ही अभिनव कल्पना. हात जळत राहिले तरी हातातील फुले मात्र सूर्यकिरणांनी फुलायलाच हवी. दलितांची ही पिढी उलटली तरी नवीन येणाऱ्या पिढीला प्रकाश मिळावा ही भावना! दलितांचे आजवरचे गुलामीचे, गरिबीचे लाजिरवाणे जीवन ही कविता सौहार्दाने रेखाटते.

आला आला पूर, मिटे चुलीतला धूर
लाचारीची लक्तरं निथळती
गाड्यात पाणी, वाडग्यात पाणी
उकळतो उफाळतो आसव डोह (पृ. ९०)
कुणी करावा शोक कुणासाठी
कुणी रडावं कुणासाठी
अंधाराने मिटले डोळे
प्रकाशाचेही आले डोळे (पृ. १०४)

यातील आर्तता मन वेधून घेते. कवितेतील प्रतिमाही नावीन्यपूर्ण आहेत. मिटल्या डोळ्यांपुढे अंधारच असतो, पण 'प्रकाशाचे डोळे येणे' ही कल्पना मार्मिक आहे. साधेपण हा या कवितेचा स्थायीभाव आहे. संस्कृतीच्या उगाचच गप्पा मारणाऱ्यांचे किंवा दिमाख दाखवणाऱ्यांचे वर्णन करताना मात्र उपरोध उपहास जाणवतो.

मोराची पिसे लावून, डोमकावळा झाला मोर
सुसंस्काराचे स्तोम लेवून, कुणी काय होईल थोर! (पृ. ५२)
अंग झाकण्या ना धडका, अन्यायाने उठे भडका
कसली विद्या कसले ज्ञान, भरल्या पोटी गप्पा जाण (पृ. ४६)

अशा ओळींतून समाजातील विरोध, विषमता उपहासपूर्ण शैलीत व्यक्त होते.

एकूणच ही कविता आदिम संस्कृतीचा शोध घेत आहे. सुगंधाताईंची 'फिपुली' ही कादंबरीही याच अनुभवांनी बांधलेली आहे. नियती आणि आत्मस्वातंत्र्य यातील रस्सीखेच संपत नाही. प्रत्येकाचे आयुष्य म्हणजे पूर्वनियोजित स्वतंत्र तुरुंगच!

जो तो देतो आश्वासनं
पोटाला खाणं, अंगभर लेणं
काल तसं आज, तेच जिणं
पस्तावणं, धास्तावणं (पृ. ३४)

सामाजिक, जाणिवेच्या कवितेपेक्षाही कवयित्री रमते तिच्या भावविश्वात! निसर्गाच्या सौंदर्यात!

निसर्गाच्या सानिध्यात कवयित्रीचे मन उचंबळून येते.

झरझर झरते सरिता, खळखळ ताला धरते
झुलती राने, हलती पाने, निजता हिरवळ पांघरते (पृ. ५)
नीळ निळाई गगन मगन नीलिमेत डुंबले
सलज्ज! जलजा सजली साजते प्रत्यांग फुलले (पृ. ५)

अशा कितीतरी ओळी सांगता येतील.

कवयित्रीने ग्रामीण जीवनापासून बरेच संकेत घेतले आहेत. लोकगीतसदृश रचना त्यामुळे अनेकदा आढळते.

अंगनी आभाळ शोभते निळी निळी काय
माझे लाडाचे गौराई चूडा भरून जाय (पृ. ४)

असे अनेक विषय असल्यामुळे संग्रहात एकसूत्रीपणा राहिला नाही. प्रत्येक कविता निराळी, विषय वेगळा. घाईघाईने गाठोडे बांधून रेल्वे स्टेशनवर जावे आणि सर्व वस्तू बाहेर याव्यात, त्या गोळा करायला गेल्यावर सापडलेल्या वस्तू! दलित कवयित्रींमध्ये 'सांगण्यासारखे' काही असलेला हा 'काव्यसंग्रह'. त्या म्हणतात–

आले कसे ते कळले नाही
गेले तेही कळले नाही
सावल्या सावल्या, छाया पडछाया
अमिट छाप पाडल्याविना राहिल्या नाही!

(अग्निशिखा : सुगंधा शेंडे, वासंती हिरेखण, नागपूर १५. पृष्ठे १२९. चाळीस रुपये.)

(सुलभा हेर्लेकर, विष्णुसदन, धनतोली, अभ्यंकर मार्ग, नागपूर)

*

# आता होऊन जाऊ द्या : लोकनाथ यशवंत

## माणुसकीच्या प्राप्तीसाठी केलेल्या युद्धाची गाथा

प्रा. भगवान भोईर

'अस्मितादर्श' हे केवळ साहित्यिक मासिक नसून दलित चळवळीचे वैचारिक केंद्र आहे. १९८९ चा 'अस्मितादर्श' वाङ्मय पुरस्कार चंद्रपूरचे तरुण कवी लोकनाथ यशवंत ह्यांच्या 'आता होऊन जाऊ द्या' काव्यसंग्रहास मिळालेला आहे. लोकनाथ यशवंत दलित कवींच्या तिसऱ्या पिढीचे प्रतिनिधी आहेत. आंबेडकरी प्रेरणेतून लिहिणारे दलित कवी मनोरंजनापेक्षा सामाजिक बांधिलकीच्या जाणिवेने समाजपरिवर्तनासाठी लेखन करतात. म्हणून दलित कवी हा केवळ कवी नसून तो नेताही आहे. लोकनाथ यशवंत ह्या तिसऱ्या पिढीचा नेता आहे. त्यांची कविता म्हणजे दलित चळवळीच्या बोलका इतिहास आहे.

माणुसकीच्या प्राप्तीसाठी केलेल्या 'युद्धाची' ही कविता आहे. हजारो वर्षांपासून ज्यांच्या वाट्याला केवळ दुःख नि अश्रूच आले, त्यांच्या वेदनांची ही कविता आहे. सर्व प्रकारच्या विषमतेतून दलित समाजाला मुक्त केले पाहिजे, त्यांच्यासाठी 'आता काही तरी केलेच पाहिजे,' ह्या जाणिवेतून ही कविता निर्माण झाली आहे. म्हणून ही नव्या 'क्रांती'ची कविता आहे. नवे क्रांतिकारी जग निर्माण करण्याचे स्वप्न पाहणारी ही कविता आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्या प्रज्ञासूर्याचा उदय झाला नि दलितांच्या झोपड्यांत 'जागृती' चा नवा प्रकाश आला. वर्षांपासून कोंडलेली सगळी गुरे 'कोंडवाड्या'च्या भिंती तोडून बाहेर येताहेत. कमजोरांना दुनिया जगू देत नाही, आपण आपल्या शरीरात लोखंड उतरवून घ्यायला हवे, ही नवी स्वसंरक्षणाची जाणीवही दलितांमध्ये निर्माण होत आहे.

पूर्वी जोहार करणाऱ्या हातांमध्ये आता तीक्ष्ण हत्यारे दिसत आहेत. अनादिकाळापासून एक प्रस्थापित काठी सतत दलितांच्या पाठीवर होती. आता क्रांतीचा विचार देणारी ही कविता ज्वालाग्राही आहे. आपण ज्या वातावरणात जगतो ते किती चुकीचे, असंबद्ध आहे. त्यात परिवर्तन हवेच, हा मन्वंतराचा विचार या कवितांतून व्यक्त झाला आहे.

त्यांच्या मनात जेव्हा येईल तेव्हा ते लाथा हाणतात
सवयीने आपणावरही परिणाम होत नाही.
बिनधास्त बसूनच असतो.
त्यांचा व्यवहार आपल्याशी वाट्टेल तसा

आणि आपण बसूनच.
इथपर्यंत त्यांचे फार झाले
आणि आपलेही पुष्कळ झाले.
आता आपण उठून उभं राहिलंच पाहिजे!

कवी सुप्त दलित समाजाला जागे करीत आहे. हे स्वतःकडे नेतृत्वही घेत आहे.

'आता मी एक म्होरक्या
आणि मागे एक समूह.'

"माझ्या एका हाकेत लाखो माणसांचा आक्रोश
साध्या चालण्यातही करोडो पावलांचा समूह."

हा करोडो पावलांचा समूह आता आपले न्याय्य हक्क मागण्यासाठी सरकारी कचेऱ्यांवर 'मोर्चे' नेऊ लागलाय.

मोर्चात किती शक्ती असते ते 'मोर्चा' कवितेत सांगितले आहे.

"पहिल्या पावसाची शपथ, खरं सांगतो
काल गल्लीतून लहान मुलांचा मोर्चा निघाला.
सगळयांचा एक ताल, एक आवाज
डोळयांत काळया शिरांचा थयथयाट
वृद्ध नेहमीसारखे चिडीचूप
लहान मुलांचे रडण्याचे स्वप्न मला दररोज यायचे.
संपूर्ण गल्लीत रडण्याचा आवाज
सगळे असह्य आणि स्वप्न तुटून जायचे
या मोर्चाची पूर्वी कुठेही जाहिरात झाली नाही
अथवा कुणी काहीही बोललं नाही
हे कधीतरी होणार होते
गावात काही घडणार होते
लहान मुलांचा मोर्चा
रक्तवाहिन्यांसारखा गावात पसरला.
आणि आश्चर्य,
सगळयांच्या जिभेला शब्द फुटले"

दलित चळवळीची विविध रूपे–विरूपे दाखविता येतात. धारदार आत्मटीकाही आढळते. दलित चळवळीची शोकांतिका कवी पुढील शब्दांत सांगतोय,

"अटीतटीच्या वेळी मोर्चातून आम्ही पळ काढला
रस्त्यावरील एका धक्क्याने आम्हाला गांडू म्हटले"

इतकी स्वच्छ आत्मटीका दलित कवितेत अलीकडे येऊ लागली आहे. आत्मटीकेनेच

दलित चळवळ सशक्त होणार आहे. आत्मटीका पचवून घेतली नाही तर चळवळ मृतप्राय होते. कवी जागल्याची भूमिका घेत आहे.

या कवितेत सर्वत्र उपरोध– गर्भता ठासून भरलेली आहे. एकच उदाहरण पाहा–

'या शहराच्या विषमतेविषयी
तू सध्या एकही प्रश्न विचारू नकोस
इथे झुंबराच्या दुकानातच अंधार असतो.'

लोकनाथची कविता अलंकारांनी नटवलेली नाही. आशयसंपन्नता हेच तिचे सौंदर्य आहे. ही कविता पारदर्शी आहे. प्रतिमांचा गुंता नसल्याने ही कविता हृदयाला भिडते.

'नफिसा' आणि 'मिर्झा गालिब' या दोन कविता लोकनाथ यशवंतामधला एक हळवा कवी, सौंदर्यपूजक कवी दाखवणाऱ्या आहेत. तरीही 'गालिब, तुझी सामाजिक विषमतेवर लिहिलेली एखादी गझल आहे का?' हाच सामाजिक विचार लोकनाथ यशवंतांच्या कवितेचा गाभा आहे!

(आता होऊन जाऊ द्या– लोकनाथ यशवंत. मुक्तछंद प्रकाशन, नागपूर. पृष्ठे. ७५. पंचवीस रुपये.)

(प्रा. भगवान भोईर, बी. एन. एन. कॉलेज, भिवंडी.)

# १९८९ मधील मराठी पुस्तके

## एक धावती नोंद

**शंकर सारडा**

१९८९ मध्ये प्रसिद्ध झालेल्या मराठी पुस्तकांची रास माझ्यासमोर आहे. त्यांची विषयवार मांडणी केलेली आहे. त्यावरून ध्यानात येते की, कादंबऱ्यांची संख्या नेहमीप्रमाणेच सर्वात जास्त आहे. परंतु विशेष आश्चर्यजनक बाब म्हणजे आत्मकथनात्मक, व्यक्तिचित्रात्मक आणि चरित्रात्मक पुस्तकांची संख्या नजरेत भरावी इतकी मोठी आहे.

आत्मचरित्रात्मक लेखन करणाऱ्यांमध्ये आता केवळ साहित्यिक, राजकीय कार्यकर्ते, सामाजिक नेते, कलावंत हेच नसून, विविध व्यवसायांतील व्यक्ती आढळतात. (सहली आयोजित करणारे राजा ट्रॅव्हल्सचे राजा पाटील, हाफकिन इन्स्टिट्यूटमधील शास्त्रज्ञ डॉ. पु. ज. देवरस, फाइव्हस्टार हॉटेल– एअरलाइन्स वगैरे ठिकाणी नोकरी करणाऱ्या प्रिया तेंडुलकर); आत्मवृत्तात्मक लेखन हे वृद्धापकाळी



अनुक्रमणिका

सिंहावलोकन करण्याच्या उद्देशाने करायचे किंवा आपल्या जीवनाच्या एकूण वाटचालीचा ताळेबंद मांडण्याच्या हेतूने करायचे हा समजही आता हळू हळू दूर होत असून, एखाद्या विशिष्ट टप्प्याचे, पर्वाचे वा घटनेचे चित्रण पेश करण्यासाठीही आत्मकथनात्मक लेखनाचा प्रकार वापरण्याची प्रवृत्ती आता फोफावत आहे. (वसुंधरा पटवर्धन यांनी आपल्याला आलेले अतींद्रिय अनुभव सांगण्यासाठी 'संघर्ष' लिहिले आहे, 'नाथ हा माझा' मध्ये कांचन घाणेकर-काशीनाथ घाणेकर यांच्या प्रणयाराधनाची व वैवाहिक जीवनाची माहिती आली आहे. प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांनी कम्युनिस्ट पार्टीचे कार्डहोल्डर म्हणून दहा वर्षे कम्युनमध्ये दिवस काढले, त्याची कहाणी 'हरवलेले दिवस' मध्ये आली आहे. सातारा ते कोल्हापूर हा ७२ मैलांचा प्रवास वयाच्या दहाव्या वर्षी पायी करावा लागला त्याची प्रौढ दृष्टिकोनातून सांगितलेली कहाणी ७२ मैलमध्ये आली आहे. इ इ.)

दलित आत्मकथनांनी या वाङ्मयप्रकाराला एक प्रकारे सर्व बंधनांपासून मुक्त केले आहे– असे श्रेय द्यायला हरकत नाही. वेगवेगळ्या क्षेत्रांतील व्यक्ती, लेखनाची पूर्वापार सवय वा परंपरा नसतानाही, आपले अनुभव मोकळेपणाने सांगायला पुढे येत आहेत, त्यासाठी 'घोस्ट रायटर्स'चीही मदत घेत आहेत आणि सर्वसामान्य वाचकांमध्येही अशा आत्मकथनांबद्दलची आवड विकसित होत आहे; अशा पुस्तकांची विक्रीही वाढत आहे असे आढळून येते. गतवर्षी नाच ग घुमा, झोंबी ही पुस्तके चांगली गाजली. खपली. १९८९ मध्ये हरवलेले दिवस, नाथ हा माझा यांना चांगली लोकप्रियता मिळाली. 'हरवलेले दिवस'ला साहित्य अकादमीचा पुरस्कारही मिळाला. (ह्या पुस्तकावर ऑक्टोबर ८८ हा प्रकाशनकाल दिला आहे. परंतु प्रत्यक्षात ते जानेवारी ८९ मधे बाजारात आले. त्यामुळे ८८ त्या साहित्य अकादमी पुरस्कारासाठी त्याची दखल घेतली गेली.)

### दलित आत्मकथने

१९८९ मधील दलित आत्मकथनांमध्ये तांडा (आत्माराम राठोड) हे भटक्या बंजारा समाजाचा जीवनपट रंगवणारे आत्मकथन लक्षवेधक आहे. महारवेटाळ (श्रीरंग रोडगे) सामान्य हकीकतीच्या पातळीवर कधी चढतच नाही. ७२ मैल (अशोक व्हटकर) कादंबरीच्या वळणावर अधिक जाते. दहाव्या वर्षी केलेल्या पायी प्रवासातील अनुभव सांगताना, त्या मुलाच्या त्या वेळच्या मनोभावनांचे प्रामाण्य मानण्याऐवजी, प्रौढपणीच्या जाणिवांचे आरोपण केल्यामुळे काहीसा गोंधळ झालेला आहे. 'आम्हीही इतिहास घडवला' मध्ये ४४ दलित कार्यकर्त्या भगिनींचे आंबेडकरी चळवळीतील भेदक अनुभव मुलाखतीद्वारा चित्रित केले आहेत.

माझा गाव कुठाय (योगेंद्र मेश्राम) हे कादंबरीच्या अंगाने लिहिलेले, दलित तरुणाच्या आत्मशोधाचे अनुभवकथन आहे. हरिजन (शरणकुमार लिंबाळे) ही यंदाचीच निर्मिती. तमाशाच्या जगावरील छोटेखानी कादंबरी ग्रंथालीने काढली आहे.



अनुक्रमणिका

## इतर आत्मकथने

माझ्या संगीत जीवनाची वाटचाल (मालती पांडे), उषःकाल (उषा किरण), नाचतो मी नाचतो (कृष्णदेव मुळगुंद) ही कलावंतांची आत्मकथने यंदा प्रसिद्ध झाली. कोरा कॅनव्हास (प्रभाकर बरवे) हे केवळ आत्मकथन नाही. ते एक मुक्त चिंतन आहे.

डॉ. प्रफुल्ला गायतोंडे यांनी 'आत्मकथा' मध्ये पेनिश ते गोवामुक्ती या प्रकरणांची भावपूर्ण कथा सांगितली आहे. वीस चोक ऐंशी (नरुभाऊ लिमये), वेड्या मना तळमळशी (वामनराव कुलकर्णी), आहे तितुके देवाचे (रा. ना. गोडबोले), ही काही कार्यकर्त्यांची आत्मकथने.

केल्याने पर्यटन (राजा पाटील), मी एक न्यायाधीश (प्रतापराव वेहेरे), अनुभवाची शिदोरी (डॉ. पु. ज. देवरस), परवाचीच गोष्ट (विश्वास मेहेंदळे), घरजिव्हार (पद्माकर गोवईकर), पंचतारांकित (प्रिया तेंडुलकर), अरण्योत्सव-शिकारीचे दिवस (लालू दुर्वे) यातही स्वानुभवकथनावर भर आहे.

वसुंधरा पटवर्धन यांनी अक्कलकोट स्वामींच्या अतींद्रिय प्रभावाखाली झालेली घुसमट 'संघर्ष'मध्ये सांगितली आहे.

स्वानुभवांना कादंबरीचे रूप देण्याचा प्रयत्न एम टी आयवा मारू (अनंत सामंत), मी एक खलाशी (माधवी कुंटे) या दर्यावर्दी जीवनावरील पुस्तकांमध्ये केला गेला आहे. सामंतांची कादंबरी रंजकतेकडे झुकत असूनही, अत्यंत वास्तव तपशीलांनी भरलेली असून, उत्तम व्यक्तिरेखा, उत्तम संघर्ष चित्रण आणि विनधास्त कामविषयक दृष्टिकोन यांमुळे यंदाच्या सर्वोत्तम प्रथम कादंबऱ्यांमध्ये अग्रगण्य ठरेल.

## चरित्रात्मक पुस्तके

आत्मकथने आणि आत्मकथनात्मक कादंबऱ्या यांच्याप्रमाणेच चरित्रे आणि चरित्रात्मक कादंबऱ्यांची संख्याही यंदा विपुल आढळते.

नेताजी (वि. स. वाळिंबे), प्रभंजन (अनिरुद्ध पुनर्वसु), प्रबुद्ध (भा. द. खेर), रमावाई (ज्योत्स्ना देवधर), चिं. त्र्यं. खानोलकर (दीपक घारे) या चरित्रात्मक कादंबऱ्या यंदा प्रसिद्ध झाल्या. या सर्वच वाचनीय आहेत.

सावरकर– एक रहस्य (डॉ. द. न. गोखले), रमाबाई रानडे– व्यक्ती आणि कार्य (माधव श्रीनिवास विद्वांस), कार्ल मार्क्स (डॉ. भ. ग. बापट), कॉ. श्री. अ. डांगे (बाबुराव रणदिवे), राजर्षी शाहू (जयसिंग पवार), वि. का. राजवाडे (श. श्री. पुराणिक), बेनझीर भुत्तो (श्रीकांत मुंदरगी), एक अविस्मरणीय मामा (गंगाधर महांबरे), अण्णासाहेब लठ्ठे (य. दि. फडके), तिमिरातून तेजाकडे (एस के कुलकर्णी) ही चरित्रात्मक पुस्तके– उल्लेखनीय आहेत. गुरुदत्त– एक अशांत कलावंत (इसाक मुजावर) मध्ये अब्रार अल्वी या

लेखकाने सांगितलेल्या एकांगी आठवणीच तेवढ्या आल्या आहेत. पंडित नेहरूंचे हे जन्मशताब्दी वर्ष. पं. नेहरू विचारधारा (वि. म. भुस्कुटे), पं. नेहरू विचार दर्शन (नागोराव कुंभार) इ. पुस्तके या निमित्ताने निघाली.

गोष्ट पैसा फंडाची व एका नांगराची कहाणी (डॉ. भा. र. साबडे) ही पैसाफंड व किर्लोस्कर कारखाने यांची वाटचाल दाखवणारी पुस्तके.

'मस्तानी' हे द. ग. गोडसे यांचे पुस्तक केळकर पारितोषिकाचे मानकरी ठरले. मस्तानी ही नर्तकी नव्हती, छत्रसालाची ती कन्या होती. छत्रसालाच्या प्रणामी पंथामुळे ती अनौरस नव्हती, तिची प्रतिमा मुद्दाम डागाळली गेली असा गोडसे यांचा दावा आहे. पहिल्या प्रकरणात केलेले सर्व युक्तिवाद इतर प्रकरणांतून पुनःपुन्हा सांगितले आहेत आणि पाने उगाच वाढवली आहेत. त्यामानाने त्यांच्याच 'नांगी' असलेले फुलपाखरू, मधील बाजीराव पेशवा, पु. शि. रेगे, सोन्याबापू ढवळे, चिंतामणराव कोल्हटकर वगैरे व्यक्तिचित्रे अधिक रेखीव व आटोपशीर आहेत.

### व्यक्तिचित्रे

व्यक्तिचित्रे हा वाङ्मयप्रकार वृत्तपत्रांच्या उदार आश्रयाने फोफावत आहे. वाढदिवस, षष्ट्यब्दिपूर्ती समारंभ, पुरस्कार-सन्मान प्राप्ती, मृत्यू, इत्यादी घटनांच्या अनुषंगाने व्यक्तिविषयक मजकूर देणे क्रमप्राप्त ठरते. त्यामुळे परिचितांना संधी मिळते. गेल्या वर्षात अशा व्यक्तिविषयक लेखांचे संग्रह मोठ्या प्रमाणावर प्रसिद्ध झाले आहेत. पु. ल. देशपांडे यांचा 'मैत्र' हा गुण गाईन आवडीच्या धर्तीवरीलच असून ज्योत्स्ना भोळे, बेगम अख्तर वगैरे सुहृदांची भावस्निग्ध गौरवचित्रे त्यात आली आहेत. वडीलधारी माणसं (शांता शेळके), आगळीवेगळी माणसं (एस. एम. जोशी), नाळ (वसंत पोतदार) हे संग्रहही विशेष चित्तवेधक आहेत. पोतदारांचा बिनधास्तपणा चक्रावून टाकतो. अशी मने असे नमुने (शिवाजी सावंत), अनोळखी ओळख (गिरिजा कीर) मायादर्पण (संजीवनी खेर), अशी माणसं अशी साहसं (व्यंकटेश माडगूळकर), वेध व्यक्तित्वांचा (ज्योती दाते), इत्यादी पुस्तकांचाही निर्देश करायला हवा.

### ऐतिहासिक-पौराणिक कादंबऱ्यां

इतिहास-पुराणकालीन व्यक्तींच्या जीवनाचा कल्पनाप्रचुर वेध घेणाऱ्या कादंबऱ्यांची संख्या यंदाही लक्षणीय आहे. खंडोबल्लाळ (म. वि. गोखले), रणझुंज (गुरुनाथ नाईक), नरव्याघ्र (अनंत तिबिले), आम्ही तो बदनाम (इंदुमती शेवडे) या अशा कादंबऱ्या. उर्वशी (डॉ. अरुणा ढेरे) मध्ये उर्वशी-पुरुरवा कथा एका वेगळ्या संदर्भात काही मूलभूत प्रश्न निर्माण करते. अभिराम (बा. द. सातोस्कर) मध्ये कैकयीवरील दुष्टपणाचा डाग पुसून टाकून रामाला वनवासाला पाठवणे हा तत्कालीन भारताच्या आर्यीकरणासाठी विश्वामित्र

वगैरे ऋषिमुनींनी खेळलेला राजकीय डाव होता असे गृहीत धरले आहे. शिवप्रिया (शुभांगी भडभडे) म्हणजे पार्वतीचे एक चमत्कारिक व रटाळ चित्रण आहे. आधुनिकतेच्या नावावर काही हास्यास्पद स्पष्टीकरणे देणारे.

## महत्त्वाच्या कादंबऱ्या

१९८९ मधील उल्लेखनीय कादंबऱ्यांमध्ये शोधयात्रा (अरुण साधू), एम टी आयवा मारू (अनंत सामंत) यांचा खास निर्देश करावा लागेल. गेल्या २५/३० वर्षातील ध्येयवादी बुद्धिवान मराठी तरुणाची झालेली वाटचाल वेगवेगळ्या अंगांनी 'शोधयात्रा'मध्ये आलेखित करण्यात आली आहे. वामन मल्हारांच्या वैचारिक कादंबरीची परंपरा पुढे नेणारी ही सामर्थ्यवान कलाकृती आहे. 'एम टी आयवा मारू'मुळे दर्यावर्दी जीवनाचा जो भाग पुढे येतो तो अत्यंत वास्तव आणि विश्वासार्ह आहे. जहाजाचे स्वतःचे असे व्यक्तित्व- तेही प्रलयंकर-- त्यातून जाणवते. लेखकाची ही पहिलीच कृती, परंतु रचनेत कुठेही नवशिकेपणा नाही.

चक्रव्यूह (रंगनाथ पठारे), कॉम्रेड (भानू काळे), चरित्र (ज्ञानेश्वर नाडकर्णी), वारूळ (मधु मंगेश कर्णिक), आलेख (ल. ना. केरकर), तांदुळा (सुरेश द्वादशीवार), हाकुमी (सुरेश द्वादशीवार), नरजन्म (वसंत फेणे), तीन पानी डाव (विनायक राजगुरू), उद्ध्वस्त (भि. शि. शिंदे), भैरवी (ना. वा. फडके), अग्निपुष्प (रेखा बैजल), चिपाड (उत्तम बंडू तुपे), आकाशदूत (चिंतामणी लागू), आम्ही डिंका (कल्पना गोसावी-देसाई)-- यांचा खास निर्देश हवा. बाबा कदम यांची 'कंपॅनियन'ही लोकप्रिय कादंबरीही चांगली खपली.

यंदाच्या कादंबऱ्यांचे एक वैशिष्ट्य म्हणजे प्रदीर्घ कादंबऱ्या प्रकाशित करण्याची वाढती प्रवृत्ती. मनोरमा प्रकाशन, वसंत बुक स्टॉल वगैरे चारशेवरील पृष्ठांच्या कादंबऱ्यांची मागणी करीत आहेत. रणझुंज, नरव्याघ्र अशा प्रदीर्घ लांबीच्या कादंबऱ्यांना चांगली मागणी आहे. 'पानिपत'मुळे ऐतिहासिक कादंबऱ्यांना पुन्हा उठाव आला आहे. स्वामी, छावा, श्रीमान योगी, मृत्युंजय यांचा धडाका अर्थात चालूच आहे.

## वृत्तपत्रीय कादंबऱ्या

सध्या वृत्तपत्रीय कादंबऱ्यांचे प्रमाणही मोठे आढळते. वृत्तपत्रांत गाजलेली प्रकरणे, आंदोलने, अपघात, भ्रष्टाचाराचे नमुने वगैरे गोष्टींचा पार्श्वभूमीदाखल वापर करून कमी-अधिक काल्पनिक मालमसाला त्यात मिसळून वृत्तान्तवजा निवेदन करणाऱ्या चुरचुरीत, पटकथेप्रमाणे विविध दृश्ये रेखाटणाऱ्या कादंबऱ्यांची संख्या वाढत आहे. भोपाळ वायूगळतीवरील आकान्त (सुबोध जावडेकर), शहादे येथील आदिवासी चळवळीवरील आंदोलन (दीनानाथ मनोहर), सहकारी बँकिंग क्षेत्रातील एकूण भ्रष्टाचारावरील विषवृक्षाच्या मुळ्या (डॉ. वासुदेव मुलाटे), माडिया आदिवासी जीवनात



अनुक्रमणिका

नव्या सुधारणांचे प्रवाह हळूहळू येत राहिल्याने उडणारा संघर्ष रंगवणारी हाकुमी (सुरेश द्वादशीवार), शिक्षणक्षेत्रातरील ग्रामीण नेतृत्वाची पकड व त्यातून उद्भवणारे गैरप्रकार दाखवणारी आंदोलन (प्रमोद कर्नाड), ग्रामीण राजकारणाचे भ्रष्ट स्वरूप व त्यात सर्वच समाजाला लागणारी कीड दाखवणारी पाचर (रामचंद्र पठारे), जगबुडी (वामन पात्रीकर) वगैरे पुस्तकांचा निर्देश या संदर्भात करता येईल. वास्तववादी तपशील देण्यातील या लेखकांचा कटाक्ष स्तुत्य असला तरी वृत्तपत्रात जे वाचायला मिळते, तेच वेगळ्या सूत्रबद्ध स्वरूपात यात येते; त्यामुळे त्यातून नवे काही जीवनदर्शन घडत नाही; सध्याचा वाचक हा बराच बहुश्रुत व जाणकार असतो हे लक्षात न घेता, आपण काही वेगळे रहस्य प्रकट करतो आहोत अशा भ्रमात हे लेखक लिहीत असतात; त्यामुळे त्या पुस्तकांना माहितीच्या नवेपणाचे श्रेयही मिळत नाही वा नवे काही कलात्मक जीवनदर्शन दाखवल्याचे समाधानही लाभत नाही. स्वतःच्या अनुभवाचा घाट व पोत तपासून पाहण्याचा हा प्रयत्न अधिक साक्षेपी झाला व तत्कालीन हकीकतीच्या पातळीपेक्षा वेगळ्या पातळीवरून हे लेखन झाले तरच त्याला काही मोल लाभेल. ग्रंथालीने मराठीतील वृत्तपत्रीय कादंबऱ्यांचा नवलेखकांपुढे ठेवलेला आदर्श हा त्यांना चुकीच्या दिशेने नेत आहे, असा इशारा देणे क्रमप्राप्त आहे.

### कथासंग्रह

कथासंग्रहांच्या दृष्टीने ८९ साल हे मंदीचेच दिसते.

श्री. दा. पानवलकर यांच्या निवडक कथांचे संपादन प्रा. हातकणंगलेकर यांनी केले. सदानंद रेगे व दि. बा. मोकाशी यांच्या निवडक कथा अरविंद गोखले यांच्या प्रस्तावनेसह बाहेर पडल्या. शांताराम यांच्या निवडक कथांना डॉ. विलास खोले यांनी प्रस्तावना लिहिली आहे.

वि. स. खांडेकर यांच्या ययाती, अमृतवेल वगैरे कादंबऱ्यांच्या देशमुख कंपनीने नव्या आवृत्त्या काढल्या. मेहता पब्लिशिंग हाऊसने खांडेकरांचे पाकळ्या, जीवनकला, विद्युत्प्रकाश, अबोली, दवबिंदू हे कथासंग्रह एकदम बाजारात आणले. खांडेकरांचा नवा वाचकवर्ग आता तयार होत आहे असा याचा अर्थ घ्यायचा का?

रणजित देसाई यांच्या जुन्या कथासंग्रहातील कथा नव्या रूपात नव्या नावांनी (मेघ, आषाढ, वैशाख) काढण्यात आल्या. या संग्रहांची दखल त्वरेने घेण्यात बऱ्याच वृत्तपत्रांनी जागरूकता दाखवली.

लांडगा (राजेंद्र बनहट्टी), रंगसावल्या (एस. डी. इनामदार), परिपूर्ती (मालती जोशी), प्रतीती व खिडक्या (सानिया), दुस्तर हा घाट (गौरी देशपांडे), पूजा (आशा बगे) हे संग्रह विशेष उल्लेखनीय ठरतील.

जी. ए. कुलकर्णी यांनी उमेदवारीच्या काळात लिहिलेल्या 'कुसुमगुंजा' मधील कथा त्यांच्या भावी वाटचालीची पूर्वसूचना देतात. काही विलक्षण व्यक्तिरेखा व प्रसंगही प्रकट

करतात. 'निरोप', 'पिवळा पक्षी' वगैरे अंतिम पर्वातील छोटी भावकाव्ये हृदयस्पर्शी आहेत.

आमनेसामने (केशव मेश्राम), रंगकाचा (माधव कर्वे), चेहरा आणि मोहरे (ज्योत्स्ना देवधर), जर्म्स (उषा कोल्हटकर), सरल (वसुधा पाटील), रूममेट्स (माधुर वैद्य), पश्चिमगंध (ललिता गंडभीर), पालखी (अरुणा श्रीखंडे), डायग्नोसिस (डॉ. निशिकांत श्रोत्री), यात्रा (व. ह. पिटके), खिडकी (सुभाष अवचट), तोनापीही (नीता गद्रे), इस्पितळ व पतंग उडवणारा माणूस (सुकन्या आगाशे) इ. संग्रहांचीही वाचनीयता वेगवेगळ्या कारणांनी वाढलेली आहे.

## ललित लेखन

ललित लेखनाचे वेगवेगळे मासले व्यक्तिप्रकृतीच्या भिन्नतेमुळे आश्वासक ठरतात. पुन्हा झुळूक (मंगला गोडबोले), एकपानी (शांता शेळके), आणखी ठणठणपाळ (जयवंत दळवी), धार्मिक (अनिल अवचट), प्रकाशाची खिडकी (रवींद्र पिंगे), सावली, आनंद (प्रमोद नवलकर), रंगत (रत्नाकर मतकरी) हे संग्रह नजरेत भरतात.

निमित्त, फँटसी– एक प्रेयसी हे व. पु. काळे यांचे स्मृतिरंजन. चिरपरिचित. भावकुशल. क्वचित् नाटकीही.

प्रवासवर्णनात्मक पुस्तकात संगमरवरी प्रदेश (रमेश मंत्री), हवाई दैनंदिनी (राज्यश्री), भीमाशंकरचा नरराक्षस, बद्रीकेदारची निसर्गयात्रा (सुरेशचंद्र वारघडे), हसरे हाँगकाँग (वासंती घैसास) वगैरे मोजकीच भर पडलेली दिसते. पु. भा. भावे यांनी वेळोवेळी प्रवासात ठेवलेल्या टिपणांचे प्रवासिनी हे पुस्तक संपादनाच्या गलथानपणामुळे व सुमार छपाईमुळे आपले बरेच मोल गमावून टाकते.

## काव्यसंग्रह

बाबुलनाथ यांच्या १७१ विनोदी कवितांचे संकलन विनोदलहरी नावाने प्रसिद्ध झाले आहे.

हेमा लेले यांचा अंतरंग हा संग्रह 'तो आला; माझंच आयुष्य मला अभिप्रायार्थ देऊन गेला. पुन्हा तो येईल या आशेवर आयुष्य रंगत गेलं' असा सूर लावणारा आहे. 'चरित'मध्ये केशव मेश्राम यांनी व्याख्यानबाजीवर भर दिला आहे. हुंकार वादळाचे (भाऊ पंचभाई), आता होऊन जाऊ द्या (लोकनाथ यशवंत), युगारंभ (सुखराम हिवराळे), पोस्ट मार्टेम (ईश्वर नागरे), हुंकार विद्रोहाचे (एफ. सी. मोरे) या दलित काव्यातही व्याख्यानांचा मोह दिसतो. पीकपाणी (इंद्रजित भालेराव) मधील आदिवासी शेतकरी जीवनाची चित्रे बहिणाबाईंची सफाई व वृत्ती यांचे स्मरण देणारी आहे.

स्पंदन (सरला कुलकर्णी) हे एका गृहिणीचे गृहविश्व मोकळेपणाने प्रकट करणारे

कौतुकाचे काव्य. तेवढ्याच हौसेने लाटकरांनी सादर केले आहे.

हायकूचे दिवस आणि ऋतुचित्र (शिरीष पै), मंझधार (अनुराधा पोतदार) हे संग्रह सफाईदार, भावपूर्ण लपाछपीचे.

वा. रा. कांतांचे 'मावळते शब्द' आणि पाडगावकरांचे 'तुझे गीत गाण्यासाठी' हे प्रौढ संग्रह. अपेक्षित प्रतिमेला साजेसे.

कॉलम (विलास शेळके), रेमंथ (डॉ. शेजवलकर), समंध रडतो पिंपळावर (अमीर आठवले), नवोदय (अरुण बोऱ्हाडे), ओल्या जखमा (ल. स. रोकडे), झाड खिडकीएवढे (नंदकुमार पुरोहित), हे नवोदित कवींचे काही स्वागतार्ह संग्रह.

काझी सलीमची कविता (प्रदीप देशपांडे), सोविएत कविता (निरंजन उजगरे) हे अनुवादही लक्षणीय आहेत.

ओठावरली गाणी (रवींद्र भट) मध्ये गेल्या २०-२५ वर्षांत लिहिलेल्या गीतांचे व कवितांचे संकलन आहे. त्यांची गाजलेली गीतेही यात आहेत.

### इतिहास

इतिहासविषयक पुस्तकेही यंदा लक्षात घेण्याजोगी निघाली आहेत. रशियन राज्यक्रांती (वि. गो. दिघे), फ्रेंच राज्यक्रांती (ज. द. जोगळेकर), विसाव्या शतकातील महाराष्ट्र (य. दि. फडके), पोर्तुगीज-मराठा संबंध (स. शं. देसाई), गोवा मुक्तिसंग्राम (वामन राधाकृष्ण), पाकिस्तानचे जन्मरहस्य (नगरकर), काश्मीर– एक ज्वालामुखी (सेतु माधवराव पगडी), फाळणीचे दिवस (कादंबरी वजा).

### समीक्षा

डॉ. ना. ग. जोशी यांच्या निधनानंतर दहा वर्षांनी मौजने प्राचीन गीतमंजुषा हा संग्रह प्रसिद्ध केला आहे. तो त्यांच्या प्राचीन गीत भांडारच्या पुढचा टप्पा आहे.

डॉ. म. सु. पाटील यांची आदिबंधात्मक समीक्षा, बालकवींचे काव्यविश्व व सदानंद रेगे यांचे काव्यविश्व ही तीन पुस्तके एकदम बाहेर आली आहेत. मराठीत आदिबंधात्मक समीक्षेचा अभ्यास तुरळकच झालेला आहे. त्या दृष्टीने ही तीन पुस्तके स्वागतार्ह आहेत. सैद्धांतिक चर्चा व तिची प्रात्यक्षिक उपयुक्तता या दोहोंचा परिचय त्यामुळे होईल.

कुसुमाग्रज– साहित्यदर्शन हा उषा देशमुख यांचा ग्रंथ नावाप्रमाणेच व्यवस्थित दर्शन घडवतो. डॉ. पुंडे यांच्या कुसुमाग्रज–एक शोधमध्ये कथा-कादंबऱ्या-ललितलेख– यांचाच विचार आहे.

मराठीतील भेंड्यांच्या कवितांचे संकलन श्री. शं. ना. जोशी यांनी केले आहे (भंडी कवितेचा गोपाळकाला) मराठी गौळण मध्ये डॉ. वसंत जोशी यांनी या काव्यप्रकाराचे प्रथमच सर्वांगीण विवेचन केले आहे. शिवाय गौळणीही दिल्या आहेत.

डॉ. तारा भवाळकर यांची मिथक आणि नाटक व लोकनागर रंगभूमी ही दोन पुस्तके नाट्याचा उगम व स्वरूप यांचा मागोवा घेणारी आहेत.

कॉडवेलचा कलाविचार (अशोक जोशी), मराठी कॉमेडी व ट्रॅजेडी (माधव मनोहर), दलित साहित्य– पुनर्विचार (वी. रंगराव), नाटककार अत्रे (वसुंधरा देवस्थळी), वाङ्मय विमर्श (रा. श्री. जोग), मला दिसलेली नाटके (धों. वि. देशपांडे), साती ग्रंथ (कृ. पं. देशपांडे) दया पवार यांच्या साहित्याचा अभ्यास (भास्कर खांडगे), वाङ्मयीन निरीक्षणे (डॉ. दत्तात्रय पुंडे), मराठी शब्दसमीक्षा (मु. श्री. कानडे), गतशतक शोधताना (डॉ. स. गं. मालशे), साहित्य आणि सामाजिक संदर्भ (अंजली सोमण), साहित्यवेध (आशा सावदेकर), आस्वाद व समीक्षा (वि. शं. पारगावकर), पाचोळा आणि दहा समीक्षक (कोत्तापल्ले) इ. समीक्षात्मक पुस्तके त्या त्या लेखकाच्या कुवतीनुसार कमी-जास्त अभ्यसनीय ठरतील.

गाजलेल्या प्रस्तावना (सं. वि. ग. कानिटकर), भाषा-साहित्य व संशोधन (जोशी-अदवंत) महाराष्ट्रातील समाजपरिवर्तनाच्या दिशा (सं. रमेश पानसे), नैतिक अध्यात्मिक शिक्षण (अ. म. जोशी) ही पुस्तकेही विचारोत्तेजक आहेत.

दलित साहित्याचा व समाजाचा विचार करणारी पुस्तकेही यंदा बरीच आहेत. दलित साहित्य चिंतन (यशवंत मनोहर), आंबेडकर व दलित साहित्य (डॉ. भालचंद्र फडके), निबंधकार डॉ. आंबेडकर (यशवंत मनोहर), पोत आणि पदर (प्र. इ. सोनकांबळे), भटक्या जाती जमाती, भटक्याविमुक्तांचे अंतरंग (रामनाथ चव्हाण), दलित पँथर (शरणकुमार लिंबाळे), दलितांचा विचारसंघर्ष (अशोक गोडघाटे) इ. इ.

मराठी जगत (संपादक मधु मंगेश कर्णिक) हा जागतिक मराठी परिषदेनिमित्त प्रसिद्ध झालेला ग्रंथ– ३९ लेख त्यात आहेत. मराठी वाङ्मय, संस्कृती, लोकजीवन व देशापरदेशातील मराठी माणूस व भाषा यांचे यातून घडणारे दर्शन नवी अस्मिता देणारे आहे.

इतर उल्लेखनीय पुस्तके– पोलिस आणि समाज (वि. द. वागळे), आत्मोल्लास (विमला ठकार), महात्मा फुल्यांची बदनामी (हरी नरके), सत्यशोधनाची वाटचाल (बाबा आढाव), नरकसफाईची गोष्ट (खडस-ठाकूर), स्त्री आणि कायदा (बॅ. सुनीती पुंगलिया), चौफेर (माधव गडकरी), अस्वस्थ दशकाची डायरी (अविनाश धर्माधिकारी), चुंबकचिकित्सा (डॉ. ए. रझ्झाक), अभिनयशास्त्र (रुस्तुम अचलखांब).

### आत्मस्वरूपाचे भान

जागेच्या मर्यादेमुळे ही नोंद केवळ जंत्रीवजा होणे अपरिहार्य आहे. महत्त्वाची पुस्तके शक्यतोवर गळू नयेत असा प्रयत्न असला तरी काही ना काही त्रुटी राहतातच. काही पुस्तके १९८९ मधील असूनही बाजारात उशिरा येतात. त्यांची दखल घेणे शक्य होत नाही.

आत्मकथनात्मक-चरित्रात्मक पुस्तकांची आणि वास्तव घटना-व्यक्तींवर आधारित

वृत्तपत्रीय कादंबऱ्यांची वाढती संख्या लक्षणीय आहे. कल्पनारम्य प्रेमकथांच्या दुनियेतून बाहेर पडून वास्तवाला भिडण्यासाठी मराठी मानस आता सिद्ध झाले आहे. त्याला देशापरदेशातल्या घटना-परिस्थितीबद्दल व विविध व्यवसाय क्षेत्रातील जीवनाबद्दल कुतूहल आहे. तसेच आपले तरुण मध्यमवर्गीय चाकोरी सोडून विविध क्षेत्रांत मुलुखगिरीला जात आहेत. आपले अनुभव सांगण्यात त्यांना रस वाटतो. या सर्वांचे प्रत्यंतर आपल्या वाङ्मयात येत आहे. आत्मस्वरूपाचे भान येत आहे, आणि विश्वरूपाचा वेध घेण्याची प्रवृत्ती वाढत आहे. शोधयात्रा, एम. टी आयवा मारू, मी-डिंका, अग्निपुष्प इ. पुस्तकांमुळे हा व्यापक कॅनव्हास आपल्यापुढे प्रकट होतो.

आपला कर्तृत्वाच्या कक्षा आता महाराष्ट्र व भारत यांच्या सीमा ओलांडून विश्वाला गवसणी घालण्यासाठी उत्सुक आहेत. दूरदर्शन-वृत्तपत्रे यांसारखी माध्यमे सारे जग आपल्या घरात आणून आपल्या डोळ्यांपुढे उभे करत आहेत. त्यामुळे या माध्यमांपेक्षाही आपली आवाहकता व उपयुक्तता वाढवण्याचे आव्हान लेखक-प्रकाशकांवर पडणार आहे. हे आव्हान पेलण्याची जागरूकता आपल्यात आहे अशी ग्वाही देणारे हे वर्ष आहे; पुढची वाटचाल अधिक जोमदार व लक्षणीय होणार याचे आश्वासन देणारे हे वर्ष आहे.

(शंकर सारडा, प्राकृती प्रिंटर्स, ८५७ शनिवार पेठ, सातारा.)

# १९८९ मध्ये प्रकाशित झालेली पुस्तके

(दि. १५ ऑक्टोबर ८९ नंतर बाजारात आलेली पुस्तके)

**कादंबरी**

तांडा– आत्माराम राठोड
नरव्याघ्र– अनंत तिंबिले
आकाशदूत– चिंतामणी लागू
आम्ही तो बदनाम– इंदुमती शेवडे
सहवास– अनिल आठल्ये
चकवा– श्रीपाद काळे
कालप्रवास– अरुण गडकरी
तांदळा, हाकुमी– सुरेश द्वादशीवार

**कथा**

पश्चिमगंध– ललिता गंडभीर
होशियार– गोपाळ गोरवाडकर
प्रेरणी– शिवाजी मुंडे
पालखी– अरुणा श्रीखंडे
सरल– वसुधा पाटील
रंगसावल्या– एस. डी. इनामदार
सुगरनचा खोपा– प्रतिमा इंगोले
रूममेटस्– माधुरी वैद्य



अनुक्रमणिका







**काव्य**

पुन्हा यावे ज्ञानेश्वरा– रा. सो. सराफ
ओल्या जखमा– ल. स. रोकडे
काझी सलीमची कविता– प्रदीप देशपांडे
झाड खिडकीएवढे– नंदकुमार पुरोहित
हुंकार विद्रोहाचे– एफ. सी. मोरे
पोस्टमार्टेम– ईश्वर नागरे
युगारंभ– सुखराम हिवराळे
माळरानाच्या कविता– सुखराम हिवराळे

**समीक्षा**

गतशतक शोधताना– स. गं. मालशे
आस्वाद आणि समीक्षा– वि. शं. पारगावकर
साहित्य आणि सामाजिक संदर्भ– अंजली सोमण
वाङ्मयीन निरीक्षणे– दत्तात्रय पुंडे
साहित्यवेध– आशा सावदेकर
दया पवार-साहित्याचा अभ्यास– भास्कर खांडगे
पाचोळा आणि दहा समीक्षक– कोत्तापल्ले
सदानंद रेगे यांचे काव्यविश्व– म. सु. पाटील
सारस्वताचे झाड– राम शेवाळकर
रुचिभेद– राम शेवाळकर

**इतर**

अंगारा, देवाचे दिवे– राम शेवाळकर
प्रवासिनी– पु. भा. भावे
खंडो बल्लाळ– म. वि. गोखले
रमाबाई रानडे– माधव विद्वांस
मंथन– सं. चंद्रकुमार नलगे
दलितांचा विचारसंघर्ष– अशोक गोडघाटे
फ्रेंच राज्यक्रांती– ज. द. जोगळेकर
गोवा मुक्तिसंग्राम– वामन राधाकृष्ण
पं. नेहरू विचारदर्शन– नागोराव कुंभार
पं. नेहरू– विचारधारा– वि. म. भुस्कुटे

# कार्यवृत्त

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

**(१ जुलै १९८९ ते २१ डिसेंबर १९८९ अखेर)**

**साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम**

५ जुलै १९८९:– कै. र. वा. दिघे स्मृतिदिनी, डॉ. अंजली सोमण यांचे 'मराठी कथेतील स्थित्यंतरे' या विषयावर व्याख्यान झाले.

२० जुलै १९८९:– कै. वा. म. जोशी स्मृतिदिना निमित्त श्रीमती शांता शेळके यांचे 'कादंबरीकारांची दुसरी फळी' या विषयावर व्याख्यान झाले.

१४ जुलै १९८९:– रोजी आषाढी एकादशीनिमित्त 'श्री संत दर्शन' हा अभंग वाणीचा कार्यक्रम आयोजित केला होता. यात श्री. श्रीराम साठे, श्री. श्रीपाद भावे, श्री. मुकुंदराज गोडबोले, सौ. सुधा शिखरे यांनी भाग घेतला होता. या कार्यक्रमाचे निवेदन श्री. वसंत पावगी यांनी केले होते.

२२ जुलै १९८९:– रोजी कै. ग. ल. ठोकळ यांच्या स्मृतिदिनानिमित्त सुप्रसिद्ध ग्रामीण कथाकार श्री. रा. रं. बोगडे यांचे व्याख्यान झाले.

२१ ऑगस्ट १९८९:– सुप्रसिद्ध कथाकार कै. पु. भा. भावे यांच्या स्मृतिदिनानिमित्त, प्रा. सौ. माधवी चाफेकर यांचे "पु. भा. भावेः संस्काराचे दिवस" या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते. या वेळी कै. पु. भा. भावे यांच्या दोन कथांचे वाचन करण्यात आले.

२५ व २६ ऑगस्ट १९८९:– संत सावता महाराज यांच्या स्मृत्यर्थ दोन व्याख्यानेः– वक्ते श्री. यशवंत पाठक. विषयः- संत साहित्य व कीर्तन परंपरा.

१८/१९ सप्टेंबर १९८९:– कै. बालकवींच्या स्मरणार्थ 'आरती प्रभूः व्यक्तिमत्त्व आणि कवित्व' आणि 'नाटकार चिं. त्र्यं. खानोलकर' या विषयावर डॉ. सौ. माधवी वैद्य यांची व्याख्याने आयोजित करण्यात आली होती.

६ ऑक्टोबर १९८९:– कै. दत्तो वामन पोतदार यांच्या स्मृतिदिनानिमित्त श्री. स. मा. गर्गे यांचे 'मराठ्यांचा इतिहास आणि कोल्हापूरचे छत्रपती' या विषयावर व्याख्यान झाले.

२९ नोव्हेंबर १९८९:– थोर कवी कै. माधव ज्यूलियन यांच्या ५० व्या स्मृतिदिनानिमित्त नवोदित कवींचे कवि-संमेलन आयोजित करण्यात आले होते. यात

संमेलनाचे संयोजन तरुण कवी श्री. संतोष शेणई यांनी केले होते. या कवि-संमेलनात सर्वश्री दीपक करंदीकर, हेमंत जोगळेकर, जयंत भिडे, रामचंद्र देखणे, राजा दीक्षित, सुधीर कुवेर, नीलिमा गुंजी आदि कवींनी भाग घेतला होता.

३० नोव्हेंबर १९८९:– कै. आहिताग्नी शं. रा. राजवाडे स्मृतिदिनानिमित्त डॉ. प्र. न. जोशी यांचे 'आहिताग्नी राजवाडे यांचे विद्यापीठ' या विषयावर व्याख्यान झाले.

२९ व ३० डिसेंबर १९८९:– कै. श्री. म. माटे यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. श्याम मानव, नागपूर यांची 'अध्यात्म व विज्ञान' आणि 'बुद्धिप्रामाण्यवाद' या विषयावर व्याख्याने झाली.

का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला

'मासिक मनोरंजन'कर्ते का. र. मित्र यांच्या स्मृत्यर्थ दरवर्षीप्रमाणे यंदाही प्रा. शंकर वैद्य यांची रामायण व महाभारत या विषयावर दि.१९/१२/८९ ते २८/१२/८९ या मुदतीत दहा व्याख्याने आयोजित केली होती.

**नियोजित संमेलनाध्यक्ष डॉ. यु. म. पठाण यांचा सत्कार :**

पुणे येथे होणाऱ्या ६३ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष डॉ. यु. म. पठाण यांचा महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे म.सा.प चे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते शनिवार दिनांक २५/११/८९ रोजी प्रकट सत्कार करण्यात आला. याप्रसंगी श्री. शंकर पाटील, डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ. व. दि. कुलकर्णी व डॉ. हे. वि. इनामदार यांची श्री. पठाण यांच्या गौरवपर भाषणे झाली.

**पारितोषिके:**

**१. कै. ग. ल. ठोकळ पुरस्कार :-** ठोकळ कुटुंबीयांनी ठेवलेल्या ठेवीच्या व्याजातून या वर्षीपासून ग्रामीण मराठी साहित्याबद्दल रु. १००१ चा पुरस्कार देण्याची योजना सुरू करण्यात आली. या वर्षीचा हा पुरस्कार श्री. राजन गवस यांना त्यांच्या 'भंडारभोग' या पुस्तकास दि. २२/७/८९ रोजी प्राचार्य रा. रं. बोराडे यांच्या हस्ते देण्यात आला. पारितोषिक समितीत श्री. गं. ना. जोगळेकर आणि श्रीमती शांता शेळके यांनी काम पाहिले.

**२. म. म. द. वा. पोतदार** यांच्या स्मृतिदिनी त्यांच्या स्मृत्यर्थ ऐतिहासिक, वैचारिक वा साहित्याविषयक ग्रंथाला म. म. दत्तो वामन पोतदार; रु. २५० चे पारितोषिक देण्यात येते.

यंदाच्या वर्षी हे पारितोषिक प्रा. सदाशिव आठवले यांच्या 'रामशास्त्री प्रभुणे' या ग्रंथाला देण्यात आले.

पारितोषिक समितीचे सदस्य म्हणून श्री. स. मा गर्गे यांनी काम पाहिले.










३) **श्री. शंकर पाटील कथा / कादंबरी पारितोषिक** १९८८ मधील उत्कृष्ट कथासंग्रहाचे रु. २०००/- चे प्रस्तुत पारितोषिक आणि मानचिन्ह यंदा श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या 'कृष्णजन्म' या कथासंग्रहास दिनांक ९ ऑगस्ट १९८९ रोजी साहित्य संमेलनाध्यक्ष प्रा. के. ज. पुरोहित यांच्या हस्ते देण्यात आले. परीक्षकांतर्फे डॉ. विलास खोले यांचे भाषण झाले. परीक्षक समितीत डॉ. रेखा इनामदार-साने यांनी काम पाहिले.

या प्रसंगी श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी त्यांना मिळालेल्या रु. २०००/- च्या पारितोषिकाच्या रक्कमेत स्वतःचे रु. १०००/- घालून रु. ३०००/- मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांच्या पूरग्रस्त निधीस देणगी दिली.

## दिवाळी अंक स्पर्धा

१९८९ मधील पुढील तीन उत्कृष्ट दिवाळी अंकाला प्रत्येकी रु. १०१/- चे पुरस्कार देण्यात आले. 'श्री वत्स', नागपूर, संपादक आशुतोष शेवाळकर (विविध ज्ञान विस्तारकर्ते, रावसाहेब मोरमकर पुरस्कार)

**दीपावली :-** संपादक अशोक कोठावळे (मा. मनोरंजनकार का. र. मित्र पुरस्कार) 'किस्त्रीम' संपादक श्रीकांत महाबळ (कै. शं. वा. किर्लोस्कर पुरस्कार). या पुरस्काराबरोबरच दिवाळी अंकामधील उत्कृष्ट ललित लेखास कै. प्रा. अनंत काणेकर पुरस्कार (रु. २००) श्रीमती वासंती मुझुमदार यांना त्यांच्या 'साधना' या दिवाळी अंकातील 'पुरवणी पान' या लेखाबद्दल देण्यात आला पुरस्कार निवडीचे काम डॉ. अंजली सोमण, श्री. बापू वाटवे व सौ. वीणा देव (नियंत्रक) यांच्या समितीने केले.

**देणग्या :-** 'व्ही. जी. आपटे इस्टेट ट्रस्ट' या संस्थेच्या वतीने परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयासाठी रु. १००००/- ची देणगी देण्यात आली. ग्रंथालयातील कपाटे व नवीन ग्रंथांची खरेदी यासाठी सदर रकमेचा विनियोग करण्यात येणार आहे. परिषद या संस्थेची फार आभारी आहे.

**शाखासभा मेळावा :-** परिषदेचा काही शाखासभांचे प्रतिनिधी अणि परिषदेचे काही पदाधिकारी यांचा संयुक्त मेळावा श्रीरामपूर येथे दिनांक ३ डिसेंबर १९८९ रोजी आयोजित करण्यात आला होता. शाखांच्या प्रतिनिधींशी मनमोकळी चर्चा करण्यात आली व सर्व शाखांसाठी समान नियमावलीचा मसुदा तयार करण्यात आला. या मेळाव्याला परिषदेतर्फेश्री. राजेंद्र बनहट्टी (कार्याध्यक्ष), श्री. राजा फडणीस, श्री. गं. ना. जोगळेकर, श्री. चिं. शं.जोशी (कार्यवाह), श्री. पद्माकर शिरवाडकर आणि श्री. म. पां. भावे (ठाणे), श्री. किशोर पाठक (नाशिक), श्री. अरुण जाखडे (पिंपरी-चिंचवड), श्री. हो. पं. चौधरी (जळगाव), श्री. अशोक दास (इचलकरंजी), श्री. ल. रा. कांबळे (येवले) आणि श्रीरामपूर शाखेच्या कार्यकारिणी-मंडळाचे सदस्य हजर होते.

यापुढील शाखाप्रतिनिधी यांची सभा येवला शाखेमार्फत घेण्याचे येवला शाखेने



अनुक्रमणिका

दिलेले निमंत्रण स्वीकारण्यात आले.

या मेळाव्याने श्रीरामपूर शाखेने उत्तम आयोजन केले होते.

**कार्यकारी मंडळाची सभा-** या कालावधीत २४ सप्टें. १९८९ रोजी कार्यकारी मंडळाची सभा झाली. या सभेत मराठी वाङ्‌म्याचा इंग्रजी भाषेतून इतिहास या योजनेस मान्यता देण्यात आली.

**वार्षिक सभा :-** दिनांक २४-९-८९ रोजी वार्षिक सभा घेण्यात आली. या सभेत १९८८-८९ चे कार्यवृत्त, हिशोब पत्रे आणि १९८९-९० चा अर्थसंकल्प यांना मान्यता देण्यात आली. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष ग. प्र. प्रधान काही अपरिहार्य कारणामुळे या सभेस उपस्थित न राहिल्याने परिषदेचे उपाध्यक्ष श्री. हे. वि. इनामदार हे सभेच्या अध्यक्षस्थानी होते.

**विश्वस्त/पदाधिकारी बदल :-** परिषदेचे एक विश्वस्त श्री. वि.गं. माटे यांनी कार्यबाहुल्यामुळे परिषदेच्या विश्वस्तपदाचा राजीनामा दिला. या रिकाम्या झालेल्या विश्वस्तपदी श्री. श्री. दीक्षित यांची दि. २८-७-८९ पासून नियुक्ती करण्यात आली.

त्यामुळे श्री. म. श्री. दीक्षित यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कोषाध्यक्ष पदाचा राजीनामा दिला. या रिकाम्या झालेल्या कोषाध्यक्षपदी डॉ. म. वि. गोखले यांची नियुक्ती करण्यात आली.

श्री. म. श्री. दीक्षित व डॉ. म. वि. गोखले यांचे अभिनंदन.

## अ. भा. साहित्य महामंडळ

या वृत्तान्त कालावधीत महामंडळाच्या दोन सभा झाल्या. पहिली सभा ९ जुलै १९८९ रोजी पुणे येथे घेण्यात आली. या सभेत महामंडळाच्या नवीन घटनेला संमती देण्यात आली. ही नवीन घटना ९-७-८९ पासून अमलात आली. श्री. गं. ना. जोगळेकर यांच्या नियंत्रणाखाली घटक संस्थांतर्फे घेण्यात येणाऱ्या परीक्षाविषयक, प्रश्नांचा विचार करण्यासाठी समिती नेमण्यात आली. त्याचप्रमाणे मराठी साहित्य महामंडळाच्या प्रचलित असलेल्या शुद्धलेखनविषयक नियमांमधील उणिवा नाहीसा करणाऱ्या दृष्टीने एक 'शुद्धलेखन समिती' नेमण्यात आली. या समितीत डॉ. वि. भि. कोलते, प्रा. श्री. पु. भागवत, डॉ. व. दि. कुलकर्णी, डॉ. सुधीर रसाळ, प्रा. राम शेवाळकर, डॉ. वि. बा. प्रभुदेसाई, श्री. मो.रा. वाळंबे आणि डॉ. गं.ना. जोगळेकर (नियंत्रक) यांचा समावेश करण्यात आला. महामंडळाचे कार्य अधिक समावेशक आणि व्यापक करण्याच्या दृष्टीने महामंडळ आणि महामंडळाच्या घटक संस्था यांच्याखेरीज ज्या अनेक संस्था विविध प्रकारची साहित्य संमलने भरवीत असतात त्यांच्या पदाधिकाऱ्यांची किंवा प्रतिनिधींची बैठक बोलावून त्यांच्याशी संवाद साधण्याचे अधिकार महामंडळाचे अध्यक्ष श्री. राजेंद्र

बनहट्टी यांना देण्यात आले. त्याप्रमाणे या बैठकीची पूर्वतयारी करून अशी बैठक पुणे येथे दिनांक ७-१-१९९० रोजी बोलाविण्यात येणार आहे. याच सभेत ६३ वे साहित्य संमेलन पुणे येथे भरविण्याचे पुणे मराठी ग्रंथालय, पुणे यांचे निमंत्रण स्वीकारण्यात आले. त्याचप्रमाणे अध्यक्षीय निवडणुकीचे वेळापत्रकही मंजूर करण्यात आले.

मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांना भेटून, त्यांना महामंडळ व त्यांच्या घटक संस्था यांच्या मागण्यांसंबंधी समक्ष निवेदन देण्याचे बैठकीत ठरविण्यात आले.

याप्रमाणे दि. २३-९-८९ रोजी पुणे येथे मा. मुख्यमंत्री शरद पवार यांची महामंडळाच्या शिष्टमंडळाने भेट घेतली. श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या नेतृत्वाखाली गेलेल्या या शिष्टमंडळात, श्री. के. ज. पुरोहित, श्री. राम शेवाळकर, श्री. रमेश मंत्री, श्री. गं. ना. जोगळेकर आणि श्री. राजा फडणीस यांचा समावेश होता. श्री. शरद पवार यांनी शिष्टमंडळाचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले व त्याच ठिकाणी महामंडळाच्या पुढील मागण्या मान्य केल्याचे आश्वासन दिले. (१) महामंडळ व त्यांच्या घटक संस्था यांना प्रत्येकी एक लाख वार्षिक विनाअट अनुदान देणे. (२) महामंडळाच्या घटक संस्था घेत असलेल्या मराठीच्या परीक्षांना शासनमान्यता देणे. (३) विविध सरकारी समित्या व साहित्य संस्कृती मंडळ यांवर महामंडळ व त्यांच्या घटक संस्था यांचा प्रतिनिधी नेमणे.

महामंडळाची दुसरी सभा १ ऑक्टो. १९८९ रोजी औरंगाबाद येथे घेण्यात आली. या सभेत पुणे येथे होणाऱ्या ६३ व्या संमेलनाच्या कार्यक्रमाचा आराखडा ठरविण्यात आला. मा. शरद पवार, मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांनी महामंडळ व त्याच्या घटक संस्था यांच्या मागण्या मान्य केल्याबद्दल त्यांचे आभार मानण्यात आले.

राजा फडणीस/ गं. ना. जोगळेकर / चिं. शं. जोशी
कार्यवाह

---

## श्रद्धांजली

'भारतीय साहित्यशास्त्रा'चे कर्ते डॉ. ग. त्र्यं. देशपांडे यांचे १९ नोव्हेंबर ८९ रोजी निधन झाले. साहित्य अकादमीचा पुरस्कार त्यांना मिळाला होता.

इतिहास संशोधक ना. भा. नायक यांचे पणजी येथे १६ नोव्हेंबर ८९ रोजी निधन झाले.

'मराठी चरित्र व आत्मचरित्र' या ग्रंथाचे कर्ते श्री. अ. म. जोशी यांचे ५ नोव्हेंबर १९८९ रोजी निधन झाले.

जुन्या पिढीतील एक नामवंत प्रकाशक र. दा. यंदे यांचे २० सप्टेंबर १९८९ रोजी देहावसान झाले.

या सर्वांना आमची श्रद्धांजली.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

नववर्षाच्या शुभेच्छा !

अलिकडील काही वैशिष्ट्यपूर्ण प्रकाशने

**चित्कळा**
इंदिरा

**हमाल पंचायत**
वसंत देशपांडे

**'दुस्तर हा घाट' आणि 'थांग'**
गौरी देशपांडे

**प्रतीती**
सानिया

**स्वातंत्र्यवीर सावरकर : एक रहस्य**
डॉ. द. न. गोखले

**तुझे गीत गाण्यासाठी**
मंगेश पाडगावकर

**मैत्र**
पु. ल. देशपांडे

**हरवलेले दिवस**
प्रभाकर ऊर्ध्वरेषे

**जीप : एक पोर्ट्रेट**
सुभाष अवचट

**मौज**
**प्रकाशन गृह** खटाववाडी, मुंबई ४०० ००४.

अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Patrika Regd No. 6398/57
Tilak Road, Pune 411 030. • Phone 442963



६३व्या अ. भा. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

**डॉ. यू. म. पठाण**

हार्दिक अभिनंदन !

अनुक्रमणिका